सागर साहित्य : : : १०

# धुक्यांतून लाल ताऱ्याकडे!

अनंत काणेकर




वा. द. सातोस्कर, बी. ए.
मुंबई, १९४०

: प्रकाशक :
वा. द. सातोस्कर, बी. ए.
सागर साहित्य कार्यालय,
त्रिभुवन रोड, मुंबई ४.

: सेलिंग एजंट :
महाराष्ट्र ग्रंथ भांडार
पोर्तुगीज चर्च समोर
मुंबई ४.



**किंमत २। रु.**

ह्या पुस्तकाचीं पहिलीं १२ पृष्ठें व आर्ट प्लेट्स् श्री. ज. द. सातोस्कर यांनी सागर साहित्य छापखाना, त्रिभुवन रोड, मुंबई ४ येथें छापलीं व इतर सर्व श्री. कृ. ह. सहस्रबुद्धे यांनी श्री ज्ञानेश्वर प्रेस कोल्हापूर येथें छापलेलीं आहेत.

# शं.वा.कीय !

ता. २२ एप्रिल १९३७ रोजीं कॉटे व्हर्डे ही बोट मुंबई बंदरांतून सायंकाळच्या संधिप्रकाशांत बाहेर पडली. त्या वेळीं तिच्यावरील उतारूंमध्यें बत्तिशीच्या सुमाराचा एक महाराष्ट्रीय तरुण होता. विलायतच्या बोटीवरील हिंदी प्रवाशांत शिक्षणासाठीं निघालेले गर्भश्रीमंत विद्यार्थी, धंद्यासाठीं चाललेले व्यापारी अथवा मजा करण्यास निघालेले राजेरजवाडे व त्यांचा परिवार असेच मुख्यत्वे आढळतात. पण हा तरुण त्यांपैकी कोणत्याही यादींत मोडण्यासारखा नव्हता. त्याचा वेष साधाच. शरीरयष्टि सुटसुटीत, पण डोळ्यांत गांभीर्य व करारीपणा यांचें असें मजेदार मिश्रण खेळत होतें कीं, त्याला पहातांच इतर प्रवाशांना त्यांची ओळख करून घेण्याची साहजिकच इच्छा होई.

हे गृहस्थ म्हणजे महाराष्ट्राचे एक आवडते लेखक अनंत काणेकर हे होत. काणेकर निघाले ते मजेखातर नसले तरी एवढें मात्र खरें कीं त्यांना प्रवासाची संधि ताबडतोब आणून दिली गेली, ती अनेकांना मौज वाटण्यासारख्याच एका निमित्तानें. त्या वर्षाच्या मे महिन्यांत लंडन येथें बादशहा सहावे जॉर्ज यांचा राज्यारोहण समारंभ होता. व या अपूर्व समारंभाला दूरदूरच्या प्रेक्षकांना हजर रहातां यावें, एवढ्यासाटीं बोटींच्या कंपन्यांनीं सवलतीचीं परतीचीं तिकीटें ठेवलीं होतीं. त्याचा लाभ करून घेण्याचें काणेकरांनी मनांत आणलें.

त्याप्रमाणें काणेकर लंडनला गेले. पण पाच पाच पौंड देऊन व बारा बारा तास थंडीवाऱ्यांत कुडकुडत बसून मिरवणूक पहाण्याऐवजीं घरीं बसून त्यांनी व त्यांच्या मित्रांनी रेडीओवरच सर्व वर्णन ऐकलें. काणेकरांना याबद्दल कोणी अरसिक म्हणेल. पण वस्तुस्थिति अशी कीं, ते विलायतला गेले ते केवळ लंडन पॅरिसची शोभा पहायला नव्हे, तर या निमित्तानें रशियाला जाण्यास मिळालें तर पहावें एवढ्यासाठीं. त्यांच्यासारख्या माणसाला पॅरिसचा बुलेवार्द किंवा लंडनचें पिक्याडेली सर्कस भुरळ पाडण्याजोगें नव्हतें. बर्मिंगहॅम लिव्हर्पूलचे अवाढव्य कारखाने पहाण्यासहि ते मोठे उत्सुक नव्हते अथवा ऑक्सफर्ड केंब्रिजचीं विश्वविद्यालयें त्यांना आकर्षित करीत नव्हतीं.

काणेकरांनाच काय, पण जगाच्या पाठीवरील कोणत्याहि पुरोगामी विचाराच्या तरुणास विचारलें कीं, " तुला कोणता देश पहाण्याची उत्कंठा आहे ? " तर तो क्षणहि न थांबतां " रशिया " हेंच उत्तर देईल. गेल्या महायुद्धांत रशियांत क्रांति झाली. व समतेच्या तत्वावर नव्या प्रकारची समाजरचना तेथें केली गेली. तेव्हांपासून या देशानें सर्व जगाच्यापुढें पाऊल टाकून अनेक क्रांतिकारक सुधारणांनीं सर्वांना थक्क करून सोडलें आहे. यांत्रिक उत्पादनामुळें जगामध्यें भांडवलवाले व मजूर असे दोन वर्ग उत्पन्न होऊन त्यांच्यामध्यें तीव्र लढा सुरू झाला आहे. व त्याचे भयंकर परिणाम सर्व जगाला कसे भोगावे लागत आहेत हें आपण पहात आहोंतच. या सर्व असंतोषाचें, द्वेषाचें, जुलमाचें व दारिद्र्याचें मूळच राशीयानें उपटून काढलें आहे. नवी वर्गविहीन समाजरचना करण्याचा हा प्रयोग बेकारी

व दडपशाही यांनीं जर्जर झालेल्या अखिल मानवजातीस अत्यंत आल्हादकारक वाटावा यांत नवल नाहीं. पण मुठभर लोकांच्या हातीं सर्व सत्ता व संपत्ति एकवटून ठेवणाऱ्या साम्राज्यशाहीला रशियाचें हें वाढतें बळ व यश कसें सहन होणार? रशियाची ज्या ज्या प्रकारें बदनामी करितां येईल, त्या त्या प्रकारें त्यांनीं ती चालू ठेवली.

परंतु कोंबडें झाकून ठेवलें तरी सूर्य उगवण्याचा थोडाच रहाणार? रशियानें घडवून आणलेल्या प्रचंड सुधारणा या ना त्याप्रकारें जगाच्या निदर्शनास येत गेल्या, आणि त्यामुळेंच रशियाला भेट द्यावी, अशी तीव्र इच्छा अनेक तरुणांच्या मनांत उद्‌भवूं लागली. श्री. अनंत काणेकर हे अशाचपैकीं एक होत.

इतर देशांना भेट देण्याचें काम जसें सुलभ रीतीनें होऊं शकतें, तशी रशियाची तऱ्हा नाहीं. पण या अनेक अडचणी दूर सारून काणेकरांनी आपलें घोडें मॉस्कोच्य गॉर्कीपार्कमध्यें नेऊन भिडविलें, व त्यांच्या रशियच्या मुक्कामांत जेवढें जेवढें म्हणून पहातां येण्यासारखें होतें, तें तें त्यांनी पाहून घेतलें.

हिंदुस्थानचा किनारा सोडल्यावर रशियांतून परत वाटेला लागेपर्यंत काणेकरांनी तिकडून पाठविलेलें वर्णन "किर्लोस्कर" मासिकांतून त्या सालींच प्रसिद्ध झालें होतें. त्या वर्णनाच्या भरीला आणखी कांहीं नवा मजकूर घालून आज हें "धुक्यांतून लाल ताऱ्याकडे!" पुस्तक आपल्यापुढें येत आहे.

प्रवासवर्णन हा बहुतेकांच्या आवडीचा विषय आहे. तथापि काणेकरांसारख्या पुरोगामी विचारांचा खंदा लेखक आणि रशियासारख्या देशाचा प्रवास, असा योग क्वचितच जुळून येण्यासारखा आहे. त्यामुळें या पुस्तकानें वाचकांचें केवळ घटकाभर मनरंजन न होतां, त्यांच्या विचारांतहि पुष्कळ भर पडेल अशी खात्री वाटते.

— शं. वा. किर्लोस्कर



# तात्पर्य

तसेंच कांहीं कारण असल्याशिवाय ललित लेखकानें आपल्या पुस्तकाला प्रस्तावना लिहूं नये, असें माझें मत आहे. त्याच्या लिखाणावरूनच त्याला जें कांहीं सांगावयाचें आहे तें त्याच्या वाचकांना समजलें पाहिजे. ज्या ललितकृतीचे लेखकाला खुलासे द्यावे लागतात, ती तितक्या प्रमाणांत अयशस्वी आहे हें आपोआपच सिद्ध होतें. मात्र या नियमाला एकदोन अपवाद आहेत. एक, ललित कृतीच्या निर्मितीच्या कालासंबंधीं स्पष्टीकरण करणें केव्हां केव्हां आवश्यक असतें. उदाहरणार्थ, एखाद्या लेखकाच्या कथासंग्रहांतली एक गोष्ट त्याच्या वयाच्या विसाव्या वर्षी लिहिलेली असेल, तर दुसरी पन्नासाव्या वर्षी लिहिलेली असेल. लेखनकालाचा खुलासा लेखकानें केला नाहीं तर वाचक किंवा टीकाकार त्या दोन गोष्टींची अन्याय्य तुलना करण्याचा संभव आहे. तेव्हां वाचकांची दिशाभूल होऊं नये म्हणून ललित कृतीच्या अंतरंगासंबंधीं नसले तरी असले ऐतिहासिक खुलासे लेखकानें दिले पाहिजेत. दोन, प्रवास वृत्तासारखें लिखाण संपूर्णतया ललित प्रकारांत पडत नाहीं; आणि वाचकांना प्रवास-वर्णनाव्यतिरिक्त प्रवासांसंबंधींच्या अनेक गोष्टी जाणण्याची खरोखरच उत्कंठा असते, तिचें थोडें बहुत तरी समाधान लेखकानें करण्याचा प्रयत्न करावा. प्रवासाहून आल्यानंतर माझ्यावर उत्साही श्रोत्यांनीं आणि वाचकांनीं अनेक प्रश्नांचा

मारा केला. त्यांच्यासाठींच हे चार शब्द लिहीत आहें.

प्रवासाच्या खर्चाचा पहिला प्रश्न. या सर्व प्रवासाला मला एकोणीसशें रुपये खर्च आला. रशिया वगळला असता तर हा खर्च आणखी चारशें रुपये कमी झाला असता. प्रवाससंबंधीच्या आणि इतर लिखाणावर मी एवढे पैसे उभे करूं शकलों. यावरून युरोपचा प्रवास करावयाला श्रीमंती हवीच असें नाहीं; मराठी लेखकही युरोपला जाऊन येऊं शकतो हें स्पष्ट होईल.

प्रश्न विचारणारे आणखी दोन जातींचे लोक होते. एक, उच्च विद्या काय ती सर्व परदेशांत आहे असें समजणारे न्यूनगंडानें ग्रस्त झालेले लोक; आणि दोन, परदेशाला जायचें म्हणजे परत आल्यावर पन्नासाचा पंचावन रुपये तरी पगार होईल अशी कांहीं तरी पदवी आणलीच पाहिजे अशी ठाम समजूत असलेले,—जगांतल्या सर्व गोष्टींची किंमत रुपये, आणे, पैमध्यें करणारे क्षुद्र मनोवृत्तीचे लोक. टिळक, राजवाडे, यांच्यासारखे, जागतिक विद्वानांच्या मांडीला हक्कानें मांडी लावून बसणारे महाराष्ट्रीय विद्वान शिकण्यासाठीं कधींच परदेशीं गेले नव्हते, हें पहिल्या जातीचे हे लोक विसरतात; आणि आपण रहातों हें जग कितीही खर्च करून पाहिलें तरी कमीच, इतकें सुंदर आहे, हें दुसऱ्या जातीच्या लोकांच्या गांवींही नाहीं.

ज्यांना तात्पर्य पाहिजेच त्यांना मात्र मी तात्पर्य सांगूं शकतों. या प्रवासानें मला दोन धडे शिकवले. एक, पृथ्वी वाटोळी आहे. आणि दोन, माणुसकी सर्वत्र सारखीच आहे !

ल्हानपणापासून क्रमिक पुस्तकांत ज्या सामान्य गोष्टी आपण वाचतों त्या शिकण्याकरतां दहाबारा हजार मैलांचा प्रवास आणि कित्येक हजार रुपये खर्च मला करावा लागला, हें वाचून पुष्कळांना हंसूं कोसळेल. पण हंसण्यासारखें त्यांत कांहींच नाहीं. क्रमिक पुस्तकांच्या कागदावर मरून पडलेलीं आणि त्यामुळें सामान्य वाटणारीं हीं सत्यें प्रत्यक्ष अनुभवानें एकदम जिवंत होतात आणि भलतेंच जगड्व्याळ स्वरुप धारण करतात. म्हणूनच या अनुभवांकरतां करावा लागणारा खर्च आणि परिश्रम कांहींच नव्हेत असें मला वाटतें. मुंबईहून मी निघालों, आणि जगांतलीं अनेक सुंदर शहरें पाहिल्यानंतर मुंबईच मला अधिक सुंदर वाटली; आणि मी मुंबईलाच उत्कंठित अंतःकरणानें परत आलों. मुंबईहून निघालेला माणूस शेवटीं मुंबईलाच परत येतो, तेव्हां पृथ्वी वाटोळी नाहीं कां ?

आपले हिंदी लोक आपल्यासारखेच काळे, गरीब आणि म्हणून भले आहेत; जगांतल्या इतर लोकांच्या भलेपणाबद्दल काय सांगावें, असें साहजिकच मला वाटे. पण आतां पोलंड म्हटलें, कीं उभ्याआडव्या रेघांचा नुसता नकाशा डोळ्यासमोर उभा रहात नाहीं; वॉर्सा—बर्लीन एक्सप्रेसमध्यें मध्यरात्रीं मोठ्या सौजन्यपूर्वक मला झोंपायला जागा करून देणारा तो मध्यमवयस्क पोल गृहस्थ माझ्या डोळ्यासमोर उभा रहातो. अमेरिकेचें नांव निघालें, कीं बॉल्टिक 'समुद्रांत तुम्ही उष्ण देशांतले आहांत, तुम्हाला ही थंडी सहन होणार नाहीं' म्हणून आपल्या अंगांतलें लेदर जॅकेट माझ्या अंगावर चढवणाऱ्या अमेरिकन मुलीची कृतज्ञतेनें

आठवण होते. आणि बर्लीनविषयीं कुणी बोलूं लागला कीं क्रूरकर्मी हिटलर आणि त्याचे उग्र चेहऱ्यांचे जर्मन साथीदार डोळ्यापुढें येत नाहींत, तर कॅफे कॉशविट्झमध्यें माझ्याजवळ उभा राहून आस्थापूर्वक मला खाण्यापिण्याचा आग्रह करणारा हर डायेट्रिच् मला दिसतो. हा दुसरा धडाही कमी मोलाचा आहे असें मला वाटत नाहीं. प्रवासाचे आणखी 'नफेतोटे' सांगतां येत नाहींत. पण उत्तर किंवा दक्षिण ध्रुवाकडल्या बर्फमय प्रदेशांत कसलीही विद्या मिळण्यासारखी नसली, किंवा पगारवाढ देणारी कुठलीही पदवी घेणें शक्य नसलें, तरी शक्य असेल तेव्हां केवळ तो रम्योदात्त देखावा पहाण्याकरतां म्हणून तिथेंही जाण्याची मला अजून बलवत्तर इच्छा आहे.

ता. २४।२।४०

— **अनंत काणेकर**



# प्रकाशकाचें पान.

प्रसिद्ध होणार, होणार, म्हणून गाजत असलेलें हें पुस्तक एकदाचें आज प्रकाशांत येत आहे. दोन वर्षांपूर्वी श्री. काणेकरांचे ह्या प्रवासवर्णनाचे लेखांक जेव्हां किर्लोस्करमधून यावयाला सुरवात झाली त्याच वेळीं अशा तऱ्हेचें पुस्तक काढण्याची मनीषा मी लेखकाजवळ व्यक्त केली. श्री. काणेकरांनीही ताबडतोब आपली संमति दिली व लगेच पुस्तक काढावें असें ठरलें. पण कोणत्या ना कोणत्या कारणांमुळें ह्या पुस्तकाच्या प्रसिद्धीकरणास इतका विलंब झाला कीं त्यानंतर काणेकरांचींच दुसरीं दोन पुस्तकें मी प्रसिद्ध केलीं, आणि प्रस्तुत प्रवासवर्णन मागें राहिलें. शेवटीं आज हें संकल्पित पुस्तक वाचकांच्या हातीं देण्याचा सुप्रसंग येत आहे.

ह्या पुस्तकप्रकाशनाच्या कामीं मला पुष्कळांचें सहाय्य झालें आहे. श्री. काणेकरांना प्रवासवर्णन लिहिण्यास ज्यांनी प्रथमतः प्रवृत्त केलें त्या श्री शंकरराव किर्लोस्कर यांनी प्रस्तावनेदाखल चार शब्द लिहून पुस्तकाच्या आकर्षकतेंतच भर घातली ह्याबद्दल त्यांचे मी मनःपूर्वक आभार मानतों. पुस्तकाची छपाई काळजीपूर्वक केल्याबद्दल ज्ञानेश्वर प्रेसचे चालक श्री. कृ. ह. सहस्रबुद्धे, मलपृष्ठावरील आकर्षक चित्र काढून दिल्याबद्दल सुप्रसिद्ध चित्रकार श्री. डी. डी. दलाल, काणेकरांच्या फोटोची विशिष्ठ आणि सुंदर मांडणी करून दिल्याबद्दल मुंबईतील एक कल्पक कलावान श्री. सी. व्ही. गुप्ते, तसेंच पुस्तकाची सेलिंग एजन्सी घेऊन किरकोळ विक्रीच्या कर्मकटकटींतून मुक्तता केल्याबद्दल "महाराष्ट्र ग्रंथ भांडार" चे उत्साही चालक श्री. शं. वा. कुळकर्णी, या सर्वांचा मी ऋणी आहे.

ता. १२।३।१९४०

—वा. द. सातोस्कर

# सा ग र सा हि त्य

## आमचें वाङ्मय.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | सागराच्या लाटा | प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई | १ रु. |
| २ | गुलाब गेंद | जयवन्तराव सरदेसाई | १२ आणे |
| ३ | वादळांतील नौका | प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई | १ रु. |
| ४ | कुळागर | सं.— बा. द. सातोस्कर | १ ,, |
| ५ | वैमानिक हल्ला | भा. वि. वरेरकर | १। ,, |
| ६ | निशिकांतची नवरी | अनंत काणेकर | १० आणे |
| ७ | तुटलेले तारे | ,, ,, | १ रु. |
| ८ | कारंजाचे तुषार | व्यं. अ. पै रायकर | १। ,, |
| ९ | किनाऱ्यावर | प्रो. वि. द. साळगांवकर | १ ,, |
| १० | धुक्यांतून लाल ताऱ्याकडे | अनंत काणेकर | २। ,, |
| ११ | उंबराचीं फुलें | ह. वि. देसाई | १ ,, |

४ आणे प्रवेश फी भरून कायम ग्राहक होणाऱ्यास 'साहित्या'चें प्रत्येक पुस्तक पाऊणपट किंमतीस मिळेल.

'सागर साहित्य' कार्यालय
त्रिभुवन रोड, मुंबई ४



लेनिनग्राडमधील
लेनिनचा भव्य पुतळा

# विलायतेच्या वाटेवर–

प्रवासवर्णनाचीं पत्रें लिहावयाचीं म्हणजे अलीकडे मला भीतीच वाटते. त्यांतल्या त्यांत विलायतच्या प्रवासासंबंधीं पत्रें लिहिणारांची तर आतां मोठीच कुचंबणा झाली आहे. इतक्या लोकांनीं आणि इतक्या तऱ्हेचीं विलायतच्या प्रवासाचीं वर्णनें आतांपर्यंत मराठींत लिहिलीं आहेत, कीं त्याच विषयावर पुन्हा लेखणी चालवावयाची म्हणजे मोठी जबाबदारीच आहे.

दुसरी अडचण अशी, कीं ललितलेखन करणारा लेखक प्रवासाचें वर्णन करतो आहे, तेव्हां कांहींतरी अलौकिक आणि अद्‌भुतरम्य असें वाचावयाला मिळणार, अशा आशेनें वाचणाऱ्या वाचकांना सामान्य आणि ठराविक गोष्टी आपण सांगत बसलों तर आपण त्यांची दारुण निराशा करणार अशी एकसारखी वाटणारी भीति. खुद्द प्रवाशाचीच केव्हां केव्हां, किंवा अधिक खरें बोलावयाचें म्हणजे बहुतेक वेळां, अशी निराशा होते. वर्ड्‌स्वर्थ कवीनें 'Yarrow Unvisited' आणि 'Yarrow Visited' या कवितांतून वर्णिलेला अनुभवच बहुधा प्रवाशाच्या वांट्याला येतो. प्रवासाला निघण्यापूर्वी बहारीचीं कल्पनाचित्रें आपण आपल्या डोळ्यांपुढें रंगवून ठेवलेलीं असतात; पण सत्यसृष्टि आणि कल्पनासृष्टि यांतला फरक दुरून साजरे दिसणारे डोंगर आणि जवळून पहातां स्वतःच्या खडकाळ रुक्षतेचें प्रदर्शन करणारे डोंगर यांच्यामधल्या फरकाइतकाच तापदायक असतो.

अशा तऱ्हेच्या विचारांनीं भंडावून सोडल्यामुळें काय लिहावें आणि कसें लिहावें या फिकिरींत मी होतों. इतक्यांत 'लंडन टाइम्स'चा तारीख १५ मेचा अंक माझ्या हातांत आला. सहज चाळतां चाळतां 'James

Agate Crosses the Atlantic' या नांवाचा एक मथळा माझ्या दृष्टीला पडला. जेम्स ॲगेट हा इंग्लंडमधला एक प्रख्यात टीकाकार असून इंग्लंडच्या रंगभूमीवर येणाऱ्या नवीन नाटकांवरील त्याच्या चुरचुरीत आणि झणझणीत लेखांनीं विलक्षण लोकप्रियता मिळविली आहे. तो नुकताच अटलांटिक महासागर ओलांडून अमेरिकेला गेला. त्यानें लिहिलेल्या तेव्हांच्या प्रवासवर्णनाचा तो पहिला लेखांक होता. या लेखाच्या सुरवातीलाच मीं जी भीति व्यक्त केली आहे तीच त्यानेंहि व्यक्त केली आहे. एक मोठा लेखकहि आपल्यासारखाच या बाबतींत फिकिरींत पडला हें वाचून खरोखरीच मला मोठें समाधान वाटलें.

उगाच कांहींतरी अद्‌भुतरम्य आणि काव्यमय लिहिण्याचें ढोंग करून खोटा आभास निर्माण करण्यापेक्षां आपणाला मजेदार वाटणाऱ्या आपल्या दैनंदिनींत टिपून ठेवलेल्या गोष्टी त्यानें तारीखवार जशाच्या तशा दिल्या आहेत. जेम्स ॲगेटलाच गुरु करावयाचें मीं ठरविलें आहे. विलायतचा प्रवास अनेकांनीं केलेला असला, ठराविक स्थळें अनेकांनीं पाहिलेलीं असलीं आणि प्रवासांत घडणाऱ्या बहुतेक गोष्टीहि सारख्याच असल्या तरी प्रत्येक व्यक्तीला प्रत्येक वेळीं कांहींतरी विशिष्ट असे वैयक्तिक अनुभव येणारच. झालें तर मग. हे अनुभव कांहीं झालें तरी वेगळे असणार; आणि म्हणून वाचकांना ते थोडेबहुत मनोरंजक आणि उद्‌बोधक वाटण्याचा संभव आहे.

* * *

## ता. २२ एप्रिल १९३७–

*मि. महम्मूद जफर आणि डॉ. रशिदाजहान.—जगाच्या रंगभूमीवरील चित्रविचित्र पात्रांचा तांडा.*

संध्याकाळीं सातच्या सुमाराला मुंबईचा धक्का सोडून बोट चालूं लागली. किनाऱ्यावरून हातरुमाल हालवून आपल्या प्रियजनांना निरोप देणाऱ्या मंडळींचा घोळका अस्पष्ट होत होत हां हां म्हणतां अदृश्य झाला. मनाला अगदीं खिन्न आणि एकाकी वाटून मला कांहीं सुचेनासें झालें होतें. सर्व

मंडळी आपापल्या केबिनमध्यें गेली होती. साडेसातचा सुमार झाला होता. 'कॉंटे व्हर्डे'च्या लांबच लांब डेकवर एकटाच उभा राहून पाणी कापीत झपाट्यानें बोट पुढें जात असतांना पाण्यावर दूरच दूर दिसणाऱ्या फेंसाच्या पट्टीकडे मी शून्यपणें पहात होतों. आजूबाजूला कोणीच ओळखीचें दिसत नसल्यामुळें मी अगदीं बावरल्यासारखा झालों होतों.

थोड्या वेळानें मी वरच्या डेकवरून खालीं माझ्या केबिनकडे जावयाला निघालों, तों वाटेंतच मि. महंमूद जफ्फर आणि त्यांची बायको डॉ. रशीदाजहान यांची गांठ पडली. मला खरोखरच अतिशय आनंद झाला. लखनौ येथें अखिल भारतीय पुरोगामी लेखकसंघाच्या पहिल्या अधिवेशनाच्या वेळीं या मंडळींची आणि माझी ओळख झाली होती. त्या वेळेला महंमूद हे अमृतसरच्या एका कॉलेजांत प्रोफेसर होते. सहा महिन्यांपूर्वी कॉलेजमधली आपली नोकरी सोडून जवाहरलाल नेहरूंचे ते प्रायव्हेट सेक्रेटरी झाले आहेत. डॉ. रशीदा ही डॉक्टर असली तरी एक उत्तम तरुण लघुकथालेखिका म्हणून ऊर्दू वाङ्मयांत प्रसिद्ध आहे.

दोघेंहि नवराबायको अत्यंत बुद्धिवान्, खेळाडु वृत्तीचीं आणि प्रेमळ असल्यामुळें माझ्या मनावरील एक धोंड उचलल्यासारखें झालें. बोटीवर वेळ कसा जाईल याची विवंचना आतां करावयाला नको. स्वतः महंमूद हे वयाच्या अकराव्या वर्षापासून ऑक्स्फर्ड बी. ए. होईपर्यंत अकरा वर्षें इंग्लंडमध्यें होते. त्याचप्रमाणें यापूर्वी तीनचार वेळां त्यांचा युरोपचा प्रवास झालेला असल्यामुळें त्यांची सोबत प्रवासांत येणाऱ्या कोठल्याहि अडचणीला मला उपयोगी पडणार आहे. डॉ. रशीदाचें व्हिएन्ना येथें ऑपरेशन व्हावयाचें आहे, म्हणून तिला घेऊन ते युरोपला जात आहेत. जवाहरलाल नेहरूंकडून त्यांनीं सहा महिन्यांची रजा घेतली आहे. ऑक्टोबरमध्यें ते हिंदुस्थानास परत जातील.

बोटीवर प्रत्येकानें आपलें जेवणाचें टेबल पहिल्याच दिवशीं ठरवून टाकावयाचें असतें; आणि पुढें बारा दिवस त्याच टेबलावर बसावयाचें. महंमूद, रशीदा आणि मी यांनीं खिडकीजवळील कोंपऱ्यांतलें एक टेबल तिघांसाठीं राखून ठेवण्याची व्यवस्था केली. रात्रीं जेवण झाल्यानंतर वरती स्मोकिंग रूममध्यें मी आलों. जरा स्वस्थ चित्तानें आजूबाजूला पहावेंसें

आतां मला वाटत होतें. सेकंड इकॉनॉमिक वर्गांतल्या उतारूंचा आमचा हा तांडा खरोखरच मासलेवाईक आहे. कांहीं पंजाबी आणि सिंधी वयस्क उतारू धोतरांत डेकवर फिरत आहेत. डेकवर जोराचा वारा असल्यामुळें त्यांच्या धोतराचे सोगे इतस्ततः फडफडत आहेत; आणि अतिरिक्त शिष्टाचारांना सवकलेल्या पण पैसे नसल्यामुळें आमच्या सेकंड इकॉनॉमिक क्लासनें प्रवास करणें ज्यांना भाग पडलें आहे अशा डेकवर बसलेल्या कांहीं फॅशनेबल युरोपियन बायांवर आमचे सिंधी आणि पंजाबी म्हातारे चांगलाच सूड उगवीत आहेत. त्या बिचाऱ्या दिङ्मूढ होऊन डेकवर ऐटींत येरझाऱ्या घालणाऱ्या आमच्या स्ववस्त्राभिमानी बांधवांकडे पहात आहेत !

या लोकांना पाहिलें, कीं आपण कोंकणच्याच बोटीवर आहोंत असा क्षणभर मला भास होतो, आणि मुंबईत आमचे मित्र मारे गप्पा सांगतात, कीं विलायतेला जातांना इतके कपडे पाहिजेत आणि असले सूट पाहिजेत आणि तसले बूट पाहिजेत ! जरा आमच्या डेकवर येऊन पहा म्हणावें ! एक खूपच लठ्ठ आणि अतिशय ठेंगणी म्हातारी बाई—ती मुसलमान असावी असें आम्हांला पहिल्यांदा वाटलें; नंतर ती बंगाली आहे असें आम्हांला कळलें—टेबलावर जेवतांना कांट्या–चमच्यांचा इतका गोंधळ करीत होती, कीं बिचारे इटालियन वेटर हतबुद्ध होऊन तिच्याकडे पहात होते. डॉ. रशीदा म्हणते, कीं ही बाई एडनला जात असावी; ही युरोपला खास जात नसावी ! आमची बोट एडनला उभीच रहात नाहीं ही माहिती मीं रशीदाला सांगितल्यावर तिचा नाइलाज झाला.

त्या सिंधी आणि पंजाबी गृहस्थांपैकीं एक व्यापारी असून दुसरा लाहोरला शिंप्याचा धंदा करतो. दुसरा एक अपटुडेट बुटासुटांत वावरणारा पंजाबी लाहोरला हेअरड्रेसरचा म्हणजे न्हाव्याचा धंदा करतो. त्याच्याबरोबर एक युरोपियन मुलगी आहे. पहिल्यांदा आम्हांला ती त्याची बायको वाटली; पण ती त्याची बायको नाहीं. त्याच्या सलूनमध्यें काम करणारी ती एक अँग्लो–इंडियन मुलगी आहे. इंग्लंड दाखवावयाला तिला तो नेतो आहे म्हणे ! फ्राउलिन मार्थ नांवाची एक डॅनिश मिशनरी म्हातारी कोपनहेगनला जात आहे. अलाहाबाद येथील घोडेस्वारांच्या

पलटणींतला एक उंच धिप्पाड इंग्लिश ऑफिसर थोड्याच दिवसांत मद्रासच्या गव्हर्नरांच्या शरीरसंरक्षकाच्या जागेवर नेमला जाणार आहे. त्यापूर्वी तीन महिन्यांची रजा घेऊन तो इंग्लंडला जात आहे. मिशीला पीळ देत सारा दिवस तो डेकवर फिरतो. दिवसांतून दोनदां स्विमिंग पूलमध्यें पोहतो, आणि बीरच्या बाटल्या फस्त करीत बोटीवरील दोन चवचाल दिसणाऱ्या युरोपियन बायांशीं—त्या जर्मन असाव्यात—चाळे करीत असतो!

एक तुर्की जोडपें आणि त्याची छोटी मुलगी आमच्या बोटीवर आहे. तीं फ्रेंच असावींत असें पहिल्यांदा आम्हांला वाटलें; पण आमच्यापैकीं राजानी नांवाच्या पर्शियन् जाणणाऱ्या एका उतारूनें त्यांना पर्शियन बोलतांना ऐकलें आणि त्यांच्याशीं दोस्ती केली. तो गृहस्थ इराणमध्यें नोकरीला आहे; आणि बऱ्याच वर्षांनीं आपल्या बायकोला तुर्कस्थानला नेतो आहे. दोघेंहि नवराबायको शांत आणि सुस्वभावी दिसतात. त्यांची मुलगीहि गोड आणि गुटगुटीत आहे. बोटींतील रेडिओवर बँड वाजूं लागला, कीं ती मुलगी स्वतःशींच डुलते आणि नाचूं लागते. एक रुंद छातीचा मजबूत दिसणारा जर्मन उतारू निळा चष्मा लावून डेकवरील आरामखुर्चीवर पहावा तेव्हां डोळे मिटून स्वस्थ पडलेला असतो. त्याला पाहिलें कीं स्टेफान झ्वाइगच्या 'अमक्' या गोष्टींतल्या नायकाची मला आठवण होते. तो तसल्याच कांहींतरी दुःखांत तर नाहीं ना? जर्मन, तुर्की, डॅनिश, सिंधी, पेशावरी, गुजराथी, मराठी, मुसलमान, हिंदु... आहोंत कीं नाहींत आम्ही जगाच्या रंगभूमीवरील चित्रविचित्र पात्रांचा तांडा?

* * *

## ता. २३ एप्रिल—

*प्रवास एजंटांची लबाडी.—मुलींचें प्रदर्शन करणारा बोलका म्हातारा.—म्हैसुरी दुकटें.—विलायती बोटीवर वांग्यांचीं भजीं!*

कालच्या तारखेचीं पानें आजच रात्रीं लिहिल्यामुळें आजच्या दिवसांत नजरेला आलेल्या बऱ्याच गोष्टी वर येऊन गेल्या आहेत. माझें केबिन दोन माणसांचें आहे. पण त्यांत मी एकटाच असल्यामुळें सबंध

केबिनचा मीच राजा आहें. मात्र गोऱ्या प्रवास-एजंटांची थोडीशी अश्लाघ्य व्यवसायनीति जनतेच्या डोळ्यांसमोर आणल्यावांचून माझ्यानें रहावत नाहीं. केबिनमधल्या 'ए' आणि 'बी' बर्थ्स्पैकीं 'ए' बर्थ मीं मागितली असतां—आणि तीसुद्धां दोन महिने आधीं—त्यांनीं मला ती बर्थ गेल्याचें सांगितलें होतें; आणि 'बी' बर्थ दिली होती. त्याच-प्रमाणें आपल्या गिऱ्हाइकाला आपण शक्य तितकी उत्तम व सोयीची जागा मिळवून देतों, अशी बढाई हे लोक मारतात. पण बर्थच्या समोर पोर्टहोल असलेल्या कितीतरी केबिन्स मोकळया पडलेल्या असतांनाहि पोर्ट-होल एका कोंपऱ्यांत असलेली केबिन त्यांनीं माझ्यासाठीं ठेवली होती !

अर्थात् केबिनमध्यें दुसरा कोणी उतारू न आल्यामुळें माझी चैन झाली ही गोष्ट वेगळी. कांहींकांहीं चारचार बर्थस् असलेल्या केबिन्समध्यें एकएकच उतारू होता. कॉरोनेशनमुळें मनस्वी गर्दी आहे म्हणून कंपन्यांनीं मुंबईत चालविलेली ओरड लबाडीची होती. माझा अनुभव मी इतरांना सांगूं लागलों तेव्हां त्यांनींहि तीच तक्रार केली. त्यांचा उलटा न्याय असा आहे म्हणे, कीं अगोदर अर्ज करणाऱ्याला वाईट जागा देऊन टाकतात आणि शक्य तितक्या चांगल्या जागा हातांत राखून ठेवतात. म्हणजे चांगल्या जागांचा मोह घालून शेवटीं शेवटीं येणारीं गिऱ्हाइकें स्वतःच्या कंपनीला मिळवितां येतात !

आज डेकवर उभा राहून समुद्राकडे पाहूं लागलों तेव्हां पाण्याचा रंग इतका सुंदर दिसत होता, कीं सबंध समुद्र जणुं काय गाळीव निळया काळ्या शाईचा केला आहे ! कोंकणला किंवा गोवें—कारवार बाजूला जातांना बोटींतून जो समुद्र दिसतो, त्याचा रंग हिरवा दिसतो. पण अरबी समुद्राच्या या भागांतील पाण्याचें निळेंपण कांहीं असामान्यच आहे. पाण्याची खोली या बाजूला फार असल्यामुळें कदाचित् पाण्यावर ही अप्रतिम निळी छटा येत असावी.

आज ब्रेकफास्ट घेऊन सकाळीं नऊदहा वाजण्याच्या सुमारास डेकवर फिरत असतांना एक और व्यक्ति आम्हांला भेटली ! त्याचें नांव जमालशेठ. चेहरा आणि शरिराची ढब हुबेहूब आगाखाना-सारखी आहे. मोठा गमत्या आणि बोलका आहे म्हातारा. तो

रंगूनचा रहिवासी आहे. ब्रह्मी वाद्यें वाजवणाऱ्या मुलांचा एक मेळा, एक म्हैसुरी मुलींचें दुकटें ( Mysore twins ) इत्यादि चमत्कारिक गोष्टी बरोबर घेऊन तो पॅरिसच्या प्रदर्शनासाठीं युरोपला जात आहे. नाना तऱ्हांचीं चमत्कारिक ब्रह्मी वाद्यें त्याच्याबरोबर आहेत. दोन ब्रह्मी बाजे आहेत. त्यांचीं दोन्ही टोकें तोंडांत न घालतां एक मुलगा आपल्या गळ्याच्या शिरांवर दाबून धरतो आणि गळ्यांतल्या गळ्यांत दम कोंडून गातो म्हणजे त्या बाजांतून सुरेल स्वर निघूं लागतात !

म्हैसुरी मुलींचें जें दुकटें किंवा जुळें आहे ती एक भयंकर गोष्ट आहे. खरें सांगावयाचें म्हणजे त्या मुलींकडे माझ्यानें पहावत नाहीं. चांगल्या सतरा–अठरा वर्षांच्या मुली आहेत. त्यांचे सर्व अवयव निराळे आहेत; पण कमरेकडचें हाड एकच आहे. दोघीहि आपापले केंस विंचरतात, वेगवेगळ्या बोलतात, वेगवेगळ्या खातात, पण चालतांना आणि इतर नैसर्गिक व्यवहार करतांना दोघींनाहि एकदम एकमेकांना फरपटत ओढीत जावें लागतें.

आमच्याबरोबर एक डॉक्टर आहेत. त्यांना मीं विचारलें, " या दोघींपैकीं एक आजारी पडली तर काय ? " डॉक्टर म्हणतात, " कांहीं नाहीं. दुसरीला तिच्याबरोबर सर्व विनाकारण सहन केलें पाहिजे." " आणि एक मेली तर ? " मीं विचारलें. " तर मात्र फार भयंकर प्रसंग आहे ! " ते म्हणाले, " एक मेली तर दुसरीहि मरणारच; पण एकदम तिच्याबरोबरच नाहीं, तर हळुहळू शरिराचा एक भाग ' गॅंग्रीन ' झाला म्हणजे माणूस जसें मरतें त्याप्रमाणें एक मेल्यामुळें रक्ताचें अभिसरण हळुहळू बंद पडून ! " मला ती कल्पनाहि सहन करवत नाहीं. खरें म्हटलें तर अशा वेळीं गोळी घालून दुसरीला ताबडतोब मारलें पाहिजे. खरी माणुसकी त्यांतच आहे. पण कायदा तसें करूं देणार नाहीं ! या मुलींचें प्रदर्शन करून जमालशेठ पैसे मिळवणार ही कल्पना रशीदाजहानला असह्य होते आणि तिला त्याचा तिटकारा येतो. थोडी चवकशी करतां मला असें कळलें, कीं त्या मुली अत्यंत धार्मिक असून त्यांना आपलें प्रदर्शन करून आतांपर्यंत जे हजारों रुपये मिळाले, त्यांपैकीं कितीतरी हजार रुपये देवालयांना आणि

धर्मशाळांना त्यांनीं दिले आहेत! इतकेंच नव्हे, तर आम्हांला त्यांची जितकी अनुकंपा वाटते तितक्या त्या स्वतःला अनुकंपनीय समजत नाहींत. त्या चांगल्या मजेंत असतात. बिचारी रशीदाजहान! तिला मी हें सर्व सांगितलें तेव्हां तिच्या रागाचा पारा बराच खालीं उतरला.

आज दुपारीं तीनचार वाजतां श्री. काणे मला भेटायला माझ्या केबिनमध्यें आले होते. ते सेकंड क्लासमध्यें आहेत. तिथें मराठी बोलणारें कुणीच नाहीं. काणे संस्कृत पंडित असले तरी वेदाभ्यासजड नाहींत. साध्या वृत्तीचे आणि मोठे खेळाडु स्वभावाचे आहेत. ते शुद्ध शाकाहारी आहेत. आणि स्टूअर्डनें आज पुऱ्या आणि पापड आणून दिले ही गोष्ट त्यांनीं मोठ्या कौतुकानें सांगितली. शाकाहारी लोकांना भजीं-सुद्धां देण्यांत आलीं होतीं म्हणतात. इटालीयन आचारी भजीं करूं शकतात, हें ऐकून मला मोठें आश्चर्य वाटलें; पण तें फार वेळ टिकलें नाहीं.

रात्रीं जेवतांना माझ्या शेजारच्याच टेबलावर बसलेल्या एका शाकाहारी गृहस्थाला आमचा वेटर भजीं वाढीत होता. तेव्हां मला दोन-चार भजीं मीं मागून घेतलीं. त्यांत कांहीं वांग्यांच्या कापांचींहि भजीं होतीं. माझें आश्चर्य अधिकच दुणावलें. मात्र भजें तोंडांत टाकलें तेव्हां त्याची चव अगदींच मातकट आणि वाईट होती. जेवणानंतर, लिमये नांवाचे मुंबईचे एक गृहस्थ लीड्स् येथें एम्.एड्.च्या पदवीकरितां जात आहेत त्यांच्याशीं बोल-तांना मीं भज्यांची गोष्ट काढली. तेव्हां त्यांनीं आपला अनुभव सांगून माझ्या आश्चर्याचें निरसन केलें. ते पूर्वी एकदां इटालियन बोटीनेंच इंग्लं-डला गेले होते; तेव्हां त्यांनाहि भजीं पाहून माझ्यासारखेंच आश्चर्य वाटलें होतें. त्यांनीं बारीक चौकशी केली, तेव्हां त्यांना कळलें, कीं मुंबईत गुजराथी हॉटेलवाल्यांकडून इटालियन कंपनी गोण्या भरून भजीं घेते आणि मग बारा दिवस दररोज थोडीं थोडीं पुनः पुन्हा गरम करून शाकाहारी लोकांना तीं मोठ्या आदबीनें चारण्यांत येतात!

* * *

## ता. २४ एप्रिल–

*कम्युनिस्ट आणि फॅसिस्ट सलामी.—ही विलायतची बोट कीं इराण्याचें हॉटेल ?*

माझी खोली झाडणाऱ्या इटालियन नोकराशीं आज माझें थोडेंसें मजेदार संभाषण झालें. डोळ्यांवर चांदीच्या फ्रेमचा चष्मा असलेला अगदीं गरीब आणि सुस्वभावी असा माणूस आहे तो. त्याचें नांव गिओव्हानी. " तुला पगार काय मिळतो ? " असा प्रश्न विचारला असतां " चारशें लिरा, म्हणजे जवळ जवळ महिना पांच पौंड पगार मिळतो. " म्हणून त्यानें मला सांगितलें. ट्रिअेस्टेला आपलें घर असून आपणांला बायको आणि एक मुलगी आहे, असें तो म्हणाला.

" मुसोलिनीला तूं कधीं पाहिलें आहेस का ? " मीं विचारलें.

" पुष्कळ वेळां ! " तो म्हणाला.

हाताची मूठ वळून हात वर करीत मीं म्हटलें, " तुम्ही इटालियन मुसोलिनींना अशी फॅसिस्ट सलामी देतां ना ? " मीं दाखवलेली 'सॅल्यूट' ही फॅसिस्ट नसून कम्युनिस्ट आहे हें मला माहीत होतें; पण मुद्दामच त्याची थट्टा करण्याकरितां मीं तसें केलें होतें.

तो एकदम म्हणाला, " छे छे ! ही कम्युनिस्ट सॅल्यूट झाली. " हातांचीं बोटें पसरून वर हात करीत तो म्हणाला, " ही फॅसिस्ट सॅल्यूट. "

मला गंमत वाटली ती हीच, कीं इटालियन झाडूवाल्यालासुद्धां कम्युनिस्ट सलामी कुठली आणि फॅसिस्ट सलामी कुठली हें समजण्याइतकें राजकीय ज्ञान आहे. इतकेंच नव्हे, तर इतकीं वर्षें कम्युनिस्टांचा नायनाट करण्याकरितां मुसोलिनीनें जंग जंग पछाडले आहेत, तरी अजूनहि एका साध्या इटालियन झाडूवाल्याला कम्युनिस्ट सलामीचा विसर पडलेला नाहीं.

एक बंगाली डॉक्टर आमच्या बोटीवर आहेत. मोठी मजेदार व्यक्ति आहे. डॉक्टरीखेरीज पैसे मिळवण्याकरितां ते अनेक उद्योग करतात. वैद्यकीय विद्येंतल्या कांहीं नवीन गोष्टी शिकण्याकरितां ते इंग्लंडला जात आहेत; पण वेळांत वेळ काढून ते जर्मनीला जाणार आहेत, आणि फाउन्टन् पेनच्या टोंकाला झरून जाऊं नये

म्हणून जो एक इरिडियम पॉइंट असतो तो लावण्याचें यंत्र जर्मनींत खरेदी करून तें चालवावयाला ते शिकणार आहेत. उभ्या हिंदुस्थानांत असलीं फक्त दोनच यंत्रें असून फाउन्टन् पेनें मात्र दरवर्षी लाखों विकलीं जातात. तेव्हां या धंद्यावर आपणांला हजारों रुपये मिळतील अशी डॉक्टरांची खात्री आहे !

रात्रीं जेवण झाल्यावर मी आणि त्रावणकोरचे डॉ. फिलिप नांवाचे एक गृहस्थ स्मोकिंग रूममध्यें बसलों होतों. धोतरें नेसलेले, लांब कोट घातलेले, लांड्या खाकी तुमानी घातलेले असे नाना वेषांतले आजूबाजूला बसलेले उतारू पाहून डॉ. फिलिप म्हणाले,

" खरोखरच आपण युरोपला चाललेल्या बोटीवर आहोंत, कीं मुंबईतील एखाद्या इराणी दुकानांत आहोंत, असा मला संशय येतो ! "
मी केबिनकडे जातांना तर केबिनजवळच्या कठड्यावर कांहीं गुजराथी बायकांनीं आपलीं पातळें वाळत घातलेलीं पाहिलीं ! विलायतेला जातांना सफेत कडक इस्त्रीचा शर्ट पाहिजे आणि त्यावर काळा ड्रेस सूट पाहिजे, वगैरे वगैरे उपदेश मला आढ्यतेनें करणारे माझे कांहीं मित्र जर हा सर्व प्रकार पहातील तर आपल्या पुस्तकी गप्पा ते पुन्हा खात्रीनें सांगणार नाहींत. कठड्यावर पातळें वाळत घालणाऱ्या गुजराथी बाया फर्स्ट क्लासमध्यें असलेल्या कुणातरी महाराणीच्या तैनातींतल्या बायका आहेत असें मला नंतर कळलें.



## ता. २५ एप्रिल–

*कॉंटे बिआन्कामानो.—कलकत्त्याची तार.*

आज दुपारीं बारा वाजण्याच्या सुमाराला आम्हां सर्व उतारूंची एकच गडबड उडाली होती. तीन दिवस खालीं पाणी आणि वरतीं आकाश पाहून पाहून कंटाळून गेलेल्या आम्हां सर्वांना एक मोठें जहाज अगदीं जवळून दृष्टीला पडणार होतें. बोटीच्या स्टुअर्डकडून आम्हांला अशी बातमी कळली होती कीं बरोबर साडेबारा वाजतां हिंदुस्थान ते इटली या प्रवासाकरितां इटालियन कंपनीनें नवीनच आणलेली चोवीस

हजार टनांची नवीन आगबोट 'काँटे बिआन्कामानो' ही इटालीहून हिंदुस्थानच्या आपल्या पहिल्याच सफरीवर जातांना आज दुपारीं आपल्या बोटीच्या जवळून जाणार आहे. लहान मुलांसारखे आम्ही दुर्बिणी घेऊन इकडून तिकडे फिरत क्षितिजावर सर्व बाजूंना पहात होतों. बायका, मुलें, म्हातारे, तरुण—सर्वांच्या चेहेऱ्यांवर कोण उत्कंठा आणि उत्सुकता दिसत होती! जमीन सोडून तीन दिवस झाल्यामुळें आणि समुद्राशिवाय दुसरें कांहीच न दिसल्यामुळें एक मोठी आगबोट दिसणार हाच एक मोठा महत्वाचा प्रसंग आम्हांला वाटत होता! याच विषयावर प्रत्येकजण दुसऱ्याशीं बोलत होता, मोठ्या गंभीरपणें चर्चा करीत होता! बरोबर साडेबारा वाजतां 'काँटे बिआन्कामानो' आमच्यासमोरून झर्रदिशी निघून गेली. आमची बोट आणि ती, दोन्हीहि बोटी भर वेगांत असल्या-मुळें आम्हांला फक्त एक मिनिटभर तिचें दर्शन घडलें! पण त्या एका मिनिटासाठीं आमची कोण धडपड चालली होती!

आज दुपारीं साडेबारा वाजतां बोटीवरचें रेडिओ बुलेटिन आम्हाला वाचावयाला मिळालें. बर्लिन, माद्रीद, रोम, लंडन, वॉशिंग्टन, प्रत्येक राजधानीहून आलेल्या तारा बुलेटिनमध्यें होत्या. शेवटीं 'कलकत्ता' हीं अक्षरें पाहिल्याबरोबर मला आणि महंमूदला एकदम आनंद झाला. एक लाख तीस हजार कामगार कलकत्ता येथील तागाच्या गिरण्यांतून संपावर गेले आहेत, दंगा होऊन कांहीं मजूर पुढारी जखमी झाले आहेत, इत्यादि चारच ओळींची तार होती; पण आम्ही पुनःपुन्हा ती वाचीत होतों, आणि त्यांतून काढतां येईल तितका अर्थ काढीत होतों!

आज रात्रीं जेवणानंतर घोडेस्वारांच्या पलटणींतला तो इंग्लिश ऑफिसर अगदीं रंगांत आला होता! दर तासाला रंगीबेरंगी कपडे बदलणारी ती चवचाल दिसणारी जर्मन बाई आणि तिची ती दुसरी मैत्रीण या दोघींना घेऊन बीरचीं ग्लासांवर ग्लासें झोकीत आणि त्यांनाहि पाजीत तो त्यांना आपलें जीवनाचें तत्त्वज्ञान सांगत होता,

"Live, Love and Laugh! That is my philosophy!", तो म्हणाला.

* * *

## ता. २६ एप्रिल–

*६० वर्षांच्या बेगमेला सोबती पाहिजे !—मसावा पाहाण्याची उत्सुकता.*

आज सकाळीं साडेसात वाजल्यापासून उजव्या बाजूच्या क्षितिजावर अगदीं अस्पष्ट अशा डोंगरांच्या रांगा दिसत आहेत. आमची बोट तांबड्या समुद्रांत शिरत आहे. समुद्राचें पाणी आतां तितकेसें निळें वाटत नाहीं. नऊ साडे ९ वाजतां तर उजवीकडच्या बाजूला चांगल्या लांबच लांब डोंगराच्या रांगा स्पष्ट दिसूं लागल्या आहेत. हा अरबस्थानचा किनारा होय. डोंगराच्या रांगांमधून लांबच लांब पसरलेलीं पांढरीं वाळवंटेंहि स्पष्ट दिसत आहेत. बाराच्या सुमाराला 'पेरिम्' नांवाच्या एका बेटाजवळून आम्ही जात आहोंत. तांबडा समुद्र या विशिष्ट ठिकाणीं इतका चिंचोळा झाला आहे, कीं डाव्या बाजूला अरबस्थानचा किनारा स्पष्ट दिसत आहे. पेरिम् बेटावरल्या बर्मा शेल कंपनीच्या मोठ्या थोरल्या तेलाच्या टांक्याहि आम्हांला स्पष्ट दिसत आहेत.

दुपारचें जेवण करून परत येतांना हॉलमधल्या नोटीसबोर्डावरल्या दोन नोटीशी मला मोठ्या मनोरंजक वाटल्या. एक नोटीस अशी होती, कीं फर्स्ट क्लासमध्यें असलेल्या कुणा एका बेगमेला बरें वाटत नसून तिला मुळींच करमत नाहीं; तेव्हां तिला स्त्री किंवा पुरुष कुणीतरी सोबती पाहिजे ! बेगमेच्या वयाची चौकशी करतां ती साठ वर्षांची आहे असें कळलें. तेव्हां नोटीस मोठ्या उत्सुकतेनें वाचणाऱ्या तरुण उतारूंचे चेहेरे पडले आणि ते आपापल्या केबिनमध्यें वैतागून निघून गेले !

दुसरी नोटीस अशी होती, कीं उद्यां सकाळीं पांच वाजतां आमची बोट मसावा बंदराला लागणार आहे आणि पांच ते आठ तिचा मसावा बंदरांत मुक्काम आहे. ॲबिसिनियन युद्धाच्या वेळीं याच मसावा बंदरांत इटलीचा दारूगोळा, शस्त्रास्त्रें आणि सैनिक उतरले जात होते. इटलीच्या तब्यांत असलेल्या सोमाली लँडचे आणि इरिट्रियाचें हें मुख्य बंदर आहे. मसाव्याला उतरून मसावा पहाण्याची मला अत्यंत उत्सुकता आहे. उद्यां मसावा पहावयाला मिळेलच.

* * *

### ता. २७ एप्रिल—

*इरिट्रियाचें मसावा कीं गोव्याची पणजी ?—नव्या मोटारी वापरण्याची बंदी !—अर्ध्या तासाकरतां १३॥ रु. भाडें !—मार्कोनी हा खरा परमेश्वर आहे !*

काल रात्रीं झोंपायच्या वेळेपासूनच पांच दिवसांनीं मसावा येथें जमिनीवर पाय ठेवायला मिळणार म्हणून आम्ही सर्व अस्थिरचित्त होऊन गेलों होतों. आज पहांटे चार वाजतांच बोटीच्या ईंजिनाचा जरा मोठ्यानें खाड्खाड् आवाज झाल्याबरोबर मी जागा होऊन बिछान्यांत बसलों. दिवा लावून हातावरच्या घड्याळांत पहातों तों चारच वाजले होते. अजून मसावा बंदर यावयाला एक तास अवकाश आहे. पांच वाजतां बोट बंदराला लागली. डेकवर जाऊन बंदराकडे पाहिल्याबरोबर गोव्याच्या पणजी बंदरासारखा मला भास झाला. बोट धक्क्याला लागली होती. धक्क्याजवळच्या रस्त्यावरल्या इमारती स्पष्ट दिसत होत्या. बऱ्याचशा इमारतींना मुसलमानी शिल्पपद्धतीच्या कमानी दिसत होत्या. खालीं धक्क्यावर वावरणारे अरब आणि सोमाली हमाल हुबेहूब हिंदुस्थानांतल्या हमालांसारखे दिसतात. अंगांत तसलींच कुडतीं आणि डोक्यावर गुंडाळलेलीं फडकींसुद्धां आपल्याकडील हमालांच्या मुंडाशासारखीं.

पावणेसहाच्या सुमाराला मी, डॉ. फिलिप आणि अंबालाल पटेल नांवाचा एक विद्यार्थी बोटीवरून खालीं उतरलों. आफ्रिकेच्या जमिनीवर मीं पहिल्यांदाच पाऊल ठेवलें. पांच दिवस समुद्रांत काढल्यानंतर आज जमिनीवर पाऊल टाकतांना आम्हांला अतोनात आनंद झाला होता. बंदरावरचे इटालियन लष्करी पोलीस दिसायला मोठे रुबाबदार आहेत. लांब सफेत तुमान, त्यावर अर्ध्या बाह्यांचा सफेत शर्ट, सफेतच पोलो हॅट आणि कमरेला रिव्हॉल्व्हर. बहुतेक पोलीस धिप्पाड आणि दांडगे दिसतात.

टॅक्सीसाठीं आम्हीं खूप तपास केला, पण टॅक्सी मिळेना. इटालियन पोलिसांना इंग्रजींत आम्हांला काय पाहिजे तें समजावून सांगण्याची शर्थ केली, पण त्यांना कांहीं कळेना ! रस्त्यांतून जाणाऱ्या बहुतेक मोटारगाड्या ‘ फियाट ’ किंवा ‘ बालिला ’ म्हणजे इटालियन बनावटीच्या होत्या,

ही गोष्ट मात्र ध्यानांत ठेवण्यासारखी होती. मात्र बहुतेक गाड्या इतक्या मोडकळीला आलेल्या आणि धुळीनें भरलेल्या दिसत होत्या, कीं नव्या गाड्या मसावा येथें वापरण्याची बंदी आहे कीं काय, असें कुणालाहि वाटलें असतें. गाडी मिळेना, तेव्हां पायींच फिरून दोन तासांत गांव जितकें पाहतां येईल तितकें पहावें, असें आम्हीं ठरविलें.

बरेंच अंतर चालत गेल्यावर एक मोठी सलून गाडी एक अरब ड्रायव्हर चालवीत असलेला आमच्या दृष्टीला पडला. ती बहुतेक टॅक्सी असावी असें वाटून त्याला आम्हीं थांबवलें आणि खुणेनें. गांवांत फिरवून आणावयाला काय घेशील म्हणून आमच्यापैकीं प्रत्येकानें त्याला नानापरींनीं विचारलें; पण त्याच्या डोक्यांत प्रकाश पडेना ! शेवटीं आणखी कांहीं विचारण्याच्या भानगडींत न पडतां सरळ गाडींत घुसावें आणि गांवांत त्याला गाडी फिरावावयाला सांगावें आणि देण्याघेण्याचा विचार मग करावा, असा पोक्त विचार करून आम्ही सरळ गाडींत जाऊन बसलों आणि त्याला 'गाडी चालव' म्हणून खूण केली. त्यानेंहि कांकू न करतां गाडी चालू केली.

'नेटिव्ह क्वॉर्टर्स' किंवा अरब, सोमाली वगैरे लोक शहराच्या ज्या भागांत रहातात, तिकडे त्यानें मोटार नेली. या भागांतलीं घरें मोठीं मजेदार आहेत. पत्र्यांच्या घरासारखीं सर्व घरें दिसतात. पायापासून छपरापर्यंत लांकडी फळ्यांचीं हीं घरें केलेलीं असून सर्व घरांना सफेत चुना फांसलेला आहे. एका घराला आग लागली तर सर्व आळयांच्या आळ्या खाक होऊन जातील. आणि पावसांत हे लोक या घरांत कसे काय रहातात, कांहीं समजत नाहीं.

सोमाली लष्कराकरितां इटालियन सरकारनें बांधलेल्या बराकी आम्हीं पाहिल्या, त्याहि अशाच लांकडी आहेत. इटालियन लष्करी मोटार लॉऱ्यांची एक लांबलचक रांग माझ्या दृष्टीला पडली. आणि ॲबिसीनियन युद्धाच्या वेळीं याच मसावा बंदरांतून इटालीला सर्व शस्त्रास्त्रें आणि दारूगोळा येत असे त्याची आठवण झाली. इटालियन इरिट्रियाचें मसावा हें बंदर असून राजधानीचें शहर अस्मारा हें आहे. मसाव्याहून अस्मारा येथें जावयाला मोटारीनें चार तास लागतात असें आम्हांला कळलें.

आम्ही बंदराकडे परत येत असतांना अस्मारा शहराकडे जाणाऱ्या मोटार लॉऱ्यांची एक रांगच्या रांग आमच्या दृष्टीला पडली. लॉरीच्या मागें एक एक ट्रेलर असून त्यावर लांकडाच्या फळ्यांच्या पेटाऱ्यांत कसले तरी प्रचंड यंत्राचे सुटे भाग होते. जवळ जवळ रस्त्याच्या रुंदीइतके मोठे थोरले ते पेटारे होते. विमानाचे ते सुटे भाग असावेत असा माझा तर्क आहे. 'इटालियन आर्ट ॲकॅडेमी' या नांवाचा छाप असलेल्या बऱ्याचशा लहान लहान पेट्या मसावा बंदराच्या धक्क्यावर पडल्या होत्या. कांहीं इटालियन खलाशांना विचारतां त्या पेट्यांत इटालियन कलाकृतींचे नमुने आहेत, असें त्यांनीं आम्हांला सांगितलें. ॲबिसीनियाच्या कांहीं भागांत अजूनहि शूर हबशी लोक इटालियन आक्रमणाविरुद्ध झगडत आहेत, त्यांना चिरडून टाकण्याकरतां या पेट्यांतून कलाकृतीचें लेबल लावून तोफांचे गोळे तर चालले नसावेत ना?

साडेसातच्या सुमाराला आम्ही बोटीकडे परत आलों. बोट आठ वाजतां सुटावयाची होती. त्या अरबाच्या मोटारमध्यें आम्ही फक्त अर्धा तास बसलों होतों. आम्हीं त्याला दोन शिलिंग देऊं केले. इतक्यांत दुसरा एक मवाली ड्रायव्हर तिथें आला व 'दोन शिलिंग घेऊं नकोस, एक पौंड माग' म्हणून तो आमच्या ड्रायव्हरला चिथावूं लागला. आमचा अरबहि एक पौंड किंवा शंभर लिरा दिल्याशिवाय हालणार नाहीं म्हणून सांगूं लागला! अर्ध्या तासाकरितां एक पौंड म्हणजे साडेतेरा रुपये भाडें जगांत कुठेंतरी असेल कीं नाहीं याची मला शंका वाटते! इटालियन पोलिसला आम्हीं समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. तो त्या दुसऱ्या मवाली ड्रायव्हरकडे पाहून हंसला, आणि शंभर लिराच दिले पाहिजेत म्हणून आम्हांला खुणेनें सांगूं लागला. तो चोरांचा भागीदार होता यांत शंका नाहीं. कांहीं झालें तरी एक पौंड द्यावयाचा नाहीं असें आम्हीं ठरविलें होतें. तेव्हां वादविवाद करावयाचें सोडून देऊन सरळ बोटीच्या जिन्याकडे चालूं लागलों. ते दोघेहि अरब आरडाओरड करीत आमच्यामागून येत होते. 'जिन्याकडे उभ्या असलेल्या इटालियन पोलीसला विचारून मग देतों' म्हणून आम्हीं त्यांना सांगितलें. आम्ही जिन्याच्या पायऱ्या चढूं लागल्याबरोबर ते मागोमाग

येऊं लागले. पण जिन्याकडच्या पोलिसानें त्यांना हटकून जिन्यावर चढूं दिलें नाहीं. तेव्हां 'दोन शिलिंग पाहिजेत का?' म्हणून आम्हीं वरून विचारलें आणि त्यांनीं ते मुकाट्यानें घेतले! पुढें आम्हांला असें कळलें, कीं आमच्या बोटीवरच्या राजेमहाराजांच्या परिवारांपैकीं कांहीं गुजराथी टॅक्सींतून मसावा येथें इकडे तिकडे फिरले होते आणि त्यांनीं एक एक पौंड टॅक्सीवाल्यांना दिला होता!

मसावा येथें शंभर दीडशें इटालियन आमच्या बोटींत शिरले होते. बहुतेक आफ्रिकेच्या उन्हामुळें काळे पडलेले आणि लष्करी नोकरींतले होते. त्यांमध्यें दोघे सोमाली होते. माझ्या शेजारच्या केबिनमध्यें बक्षी नांवाचा लाहोरचा एक गृहस्थ आहे. त्याच्या केबिनमध्यें दोन जागा रिकाम्या होत्या, त्या या सोमाली शिपायांना देण्यांत आल्या आहेत. तो त्यांना ॲबिसीनियन म्हणतो, आणि अगदीं वैतागल्यासारखा झाला आहे. सुदैवानें माझ्या केबिनमध्यें एक जागा रिकामी असूनहीं कुणीच शिरलें नाहीं.

बरोबर आठ वाजतां धक्का सोडून आमची बोट पुढें चालूं लागली. धक्क्यावरून दिसणाऱ्या Societa Colonial Italiana आणि Banca di Italia या इमारती हळुहळु दृष्टिपथांतून मागें मागें जाऊं लागल्या. मी धक्क्याकडे पहात होतों. बरेच लोक रुमाल उडवून बोटीवरल्या लोकांचा निरोप घेत होते. त्यांच्यामध्यें धोतर वगैरे नेसलेले चारपांच गुजराथी लोक माझ्या दृष्टीला पडले, आणि मला मोठें आश्चर्य वाटलें. ते ज्यांना हात करीत होते, त्या गुजराथ्यांना नंतर मीं त्यांच्याविषयीं माहिती विचारली. ते सांगूं लागले, कीं हे लोक मसावा येथें गेलीं कित्येक वर्षें व्यापार करीत आहेत; पण ॲबिसीनिया जिंकल्यापासून इटालियन लोकांनीं केवळ ते ब्रिटिश प्रजाजन आहेत म्हणून त्यांचा छळ चालविला आहे. धक्क्यावर उतरले असतांना त्यांना ते भेटले, आणि आपली कर्मकथा सांगून ते रडत होते, पन्नास लिरांपेक्षां म्हणजे पांचसहा रुपयांपेक्षां अधिक पैसे त्यांना आपल्या बायकामुलांसाठींसुद्धां हिंदुस्थानांत पाठवितां येत नाहींत. इटालियन वसाहतींत मिळविलेला पैसा तिथेंच खर्च केला पाहिजे, बाहेर पाठवितां कामा नये, अशी इटालियन सरकारनें सक्ति केली आहे म्हणतात. आपला व्यापारधंदा सोडून हिंदुस्थानास लवकरच परत यावयाचा या लोकांचा विचार आहे.

हिंदुस्थान स्वतंत्र राष्ट्र असतें तर हिंदुस्थानांतल्या इटालियन व्यापाऱ्यांवर अशीच उलट सक्ति करतां आली असती, पण—आणि हा पण फार मोठा आहे !

शेंसवारों इटालियन्स बोटींत शिरल्यापासून आमच्या स्मोकिंग रूम-मधल्या बारमध्यें आतांपर्यंत कधीं उडाली नव्हती अशी गर्दी उडाली आहे आणि बाटल्यांवर बाटल्या फुटताहेत. एक प्रोफेसर आमच्या बोटी-वर आहेत. ते सायन्सचे प्रोफेसर आहेत. कुणाशीं बोलतांना अजून-पर्यंत ते माझ्या दृष्टीला पडले नव्हते. बारमध्यें एका कोंपऱ्यांत बसून सकाळ संध्याकाळ दोनचार पेले ते रिकामे करीत. आज जरा नेहमींपेक्षां जास्त पेले त्यांच्या पोटांत गेले असावेत. त्यांच्या टेबलापाशीं बसलेल्या एका म्हाताऱ्या इटालियन पाद्र्याशीं ते मोठमोठ्यानें वादविवाद करीत होते. त्या दाढीवाल्या पाद्र्याशीं परमेश्वराच्या अस्तित्वासंबंधीं ते चर्चा करीत होते. “परमेश्वर मुळींच नाहीं,” ते पाद्र्याला सांगत होते, “मार्कोनी हा खरा परमेश्वर आहे! तो मंगळ, बुध, शुक्र, इत्यादि सर्व ग्रहांशीं बिनतारी यंत्रांच्या योगानें दळणवळण ठेवूं शकतो. तुमचा परमे-श्वर येशु ख्रिस्त नुसता पृथ्वीवरच सत्ता चालवतो!” येशू ख्रिस्ताचें नांव आल्याबरोबर एकदम त्यांनीं विषय बदलला. हिंदु धर्माचा त्यांचा जाज्वल्य अभिमान जागृत झाला. त्या पाद्र्याच्या खांद्यावर थाप मारून ते म्हणाले, “तुमचा येशू ख्रिस्त नुसत्या एका गॅलीली सरोवराच्या पाण्या-वरून चालत गेला. आमचा हिंदु देव सात समुद्र—सप्तसागर चालून गेला !” इतका वेळ तो पाद्री नुसता ऐकत होता. पण आतां मात्र तो पोट धरून हंसूं लागला.

* * *

## ता. २८ एप्रिल—

### *ट्रॉट्स्की आणि मिसेस सिंप्सन.*

डेकवरील आपल्या आरामखुर्चीमध्यें बसून वाचीत पडलेल्या एका इटालियनाच्या हातांतील एक पुस्तक पाहून मी जरा चमकल्यासारखा झालों! त्या पुस्तकावर ट्रॉट्स्कीचें चित्र होतें! हा इटालियन दिसावयाला सुंदर

आहे. त्याच्या अंगांत रेशमी शर्ट असून त्याच्या गळ्यांत असलेला कॅमेराहि किंमतवान् दिसतो. मुसोलिनीच्या देशांत ट्रॉट्स्कीचें पुस्तक कुणाच्या हातांत दिसलें तर त्याला फांशीचीच शिक्षा व्हावयाची ! मी त्याच्या पुस्तकाकडे जरा निरखून पहातों आहे, असें त्याच्या लक्षांत आलेंसें दिसतें. ट्रॉट्स्कीचें चित्र कुणाला न दिसेल असें धरून तो पुस्तक वाचूं लागला. दुसऱ्या एका इटालियनाच्या हातांत La Seignora Simpson या नांवाचें पुस्तक मीं पाहिलें. मिसेस सिंप्सनचें चरित्र इटालियन भाषेंतहि प्रसिद्ध झालें म्हणावयाचें !

उद्यां आमची बोट सकाळीं दहा वाजतां सुवेझला लागणार आणि सबंध दिवस कालवा ओलांडून दुसऱ्या दिवशीं पहांटे पांच वाजतां पोर्ट सय्यदहून सुटणार. तेवढ्या वेळांत कैरो आणि पिरॅमिड पाहून येण्याकरितां माणशीं सहा पौंड दहा शिलिंग खर्चाची एक ट्रिप थॉमस कुक कंपनी आणि इटालियन बोट कंपनी या दोघांनीं मिळून काढावयाचें ठरविलें आहे. पूर्वी जाऊन आलेले बोटीवरील कांहीं लोक आम्हांला सांगतात, कीं आम्हीं चारपांच जण मिळून जर खासगी ट्रिप काढली तर अडीच तीन पौंडांत सहज करूं शकूं.

* * *

## ता. २९ एप्रिल–

*कैरो–पिरॅमिड्स् सफर.—प्राप्तीचा अर्धा वांटा !—अंबालाल पटेलची बनियेगिरी.—इजिप्शियन 'बुझबुझ'—पिरॅमिड्स्,—स्फिंक्स् आणि सिटाडेल.—राणाचें शौर्य ?*

आज सकाळीं पावणेदहा वाजतां आमची आगबोट सुवेझला लागावयाची आहे. सबंध दिवस कालवा ओलांडून रात्रीं अकरा वाजतां ती पोर्ट सय्यदला पोंचेल आणि पहांटे पांचला पोर्ट सय्यद बंदर सोडील. आम्हीं आठ जणांनीं स्वतंत्रपणें कैरो व पिरॅमिड पाहून यावयाचें ठरविलें आहे. सुवेझ ते कैरो जवळजवळ शंभर किलोमीटर्स म्हणजे पाऊणशें मैल आणि कैरो ते पोर्ट सय्यद दोनशें किलोमीटर्स म्हणजे दीडशें ते पावणेदोनशें मैल अंतर आहे. कैरो शहर व पिरॅमिड पाहून एवढें अंतर

आम्हांला मोटारनें तोडलें पाहिजे आणि रात्रीं दोनतीनच्या सुमाराला पोर्ट सय्यद येथें बोटीवर आलें पाहिजे. बोट बरोबर किती वाजतां सुटेल म्हणून पर्सरला विचारतां, 'कांहीं नक्की सांगतां येत नाहीं' अशा तऱ्हेचीं उत्तरें देऊन तो टाळाटाळी करूं लागला. 'स्वतंत्रपणें जाऊन तुम्हांला जर उशीर झाला तर बोट चुकेल; कुकच्या पार्टीतूनच जाणें बरें. कारण त्यांना उशीर झाला तरी बोट कंपनीतर्फेंच ती पार्टी जात असल्यामुळें त्यांच्यासाठीं बोट थांबविण्यांत येईल;' वगैरे वगैरे गोष्टी आमच्याबरोबरचे कांहीं लोक सांगूं लागले. पर्सर सांगूं लागला, "तुम्हीं सहा पौंड दहा शिलिंग खर्च होईल म्हणून स्वतंत्रपणें जातां आहां खरे, पण पहा, मग मागाहून येऊन मला सांगाल, कीं सात पौंड खर्च झाला म्हणून!" कुक कंपनी आणि आगबोट कंपनी यांचा प्राप्तींत अर्धाअर्धा वांटा असावा, असा मला ताबडतोब संशय आला. कारण पर्सर बोट नक्की केव्हां सुटेल, हें नीट सांगूं शकत नाहीं, याचा अर्थ काय? पर्सरला हें माहीत असलेंच पाहिजे. कुकच्या पार्टीतून जाणाऱ्या कांहीं ओळखीच्या मंडळींना 'तुमचा कार्यक्रम काय?' म्हणून विचारलें, तेव्हां रात्रीं दोनतीनच्या सुमारास आपण परत येऊं असें आपणाला कळविण्यांत आल्याचें त्यांनीं सांगितलें. आपण कसेंहि करून त्यांच्याआधीं पोर्ट सय्यदला पोंचावयाचें, पण कुकच्या पार्टीतून जावयाचें नाहीं असा आम्हीं निश्चय केला.

बरोबर दहा वाजतां बोट सुवेझ येथें थांबली. आम्हीं किनाऱ्यावर उतरणारे लोक इजिप्शियन् सरकारतर्फे होणाऱ्या वैद्यकीय तपासणीसाठीं पहिल्या वर्गाच्या म्यूझिक हॉलमध्यें जमलों होतों. इजिप्शियन सरकारी डॉक्टरची लॉंच आमच्या बोटीला येऊन लागली आणि तो वर आला. आमचे पासपोर्ट त्यानें पाहिले आणि आमच्यापैकीं प्रत्येकाकडे पाहून स्मित करीत त्यानें मान हालवली. हीच वैद्यकीय तपासणी, असें आम्हांला मागाहून कळलें! आम्ही खालीं उतरून एका लॉंचमध्यें बसलों. कुक कंपनीची लॉंच त्यांच्या पार्टीला घेऊन धक्क्याकडे निघाली. त्यांच्या मागोमाग आमचीहि लॉंच निघाली. त्या लॉंचवर 'कॉक्स आणि किंग' या कंपनीचा एक माणूस होता. तो इजिप्शियन होता. 'कैरो, पिरॅमिड वगैरे सर्व दाखवून तुम्हांला पोर्ट सय्यदला पोंचविण्याची आपण

व्यवस्था करतों. सर्व मिळन प्रत्येकीं चार पौंड दहा शिलिंग तुम्ही द्या,' असें म्हणून तो गोड गोड बोलून आमचीं मनें वळविण्याचा प्रयत्न करूं लागला. बोटीवरून उतरलों नाहीं तोंच कुकच्या पार्टीपेक्षां दोन पौंड कमी खर्चांत सर्व दाखविण्याची हमी कॉक्स आणि किंग कंपनी देऊं लागली, यावरून याहीपेक्षां कमी खर्चांत स्वतंत्रपणें गेल्यास सर्व कांहीं होण्याचा संभव आहे याबद्दल आमची खात्री पटली. स्वतंत्रपणें गेल्यास आणि मध्येंच कांहीं घोंटाळा झाल्यास बोट चुकण्याचा संभव आहे; आपणाला या देशाची कांहीं माहिती नाहीं, तेव्हां या माणसाला 'हो' म्हणावें असा मला मोह होत होता. पण आमच्याबरोबर पटेल म्हणून एक विद्यार्थी होता, तो पक्का बनिया होता. तो मला सांगू लागला, "तूं दोन पौंड माझ्याकडे दे, मी तुझी सर्व हमी घेतों!" आम्हीं पुन:पुन्हां 'नाहीं' म्हटल्यामुळें तो इजिप्शियन फार नाराज झाला. 'तुम्हांला मी फसवतों असं तुम्हांला वाटतं ही तुमची चूक आहे. तुम्ही हिंदुस्थानी लोक आम्हां इजिप्शियनांचे या वेळीं पाहुणे आहां आणि तुम्हांला फसवून माझ्या देशाच्या नांवाला मी काळिमा लावणार नाहीं.' वगैरे वगैरे गोष्टी तो आम्हांला सांगूं लागला. तो मनापासून बोलतो आहे, असें मला वाटत होतें, पण आमचा पटेल त्याचें कांहीं ऐकावयाला कबूल नव्हता.

सुवेझच्या धक्क्याकडे कितीतरी सुंदर सलून मोटारगाड्या उभ्या होत्या. एक ठेंगणासा गलेलठ्ठ इजिप्शियन आमच्याजवळ येऊन 'मोटारी पाहिजेत का?' म्हणून आम्हांला विचारूं लागला. त्याचें नांव बेली थॉमस. त्याच्याशीं बरीच घासाघीस करून प्रत्येकीं दोन पौंड या हिशेबानें आम्हीं दोन सलूनगाड्या ठरविल्या. थॉमस कॉंट्रॅक्टर होता. सुवेझ ते कैरो, पिरॅमिड्स् वगैरे आणि नंतर कैरो ते पोर्ट सय्यद असा आमचा करार होता. हें सर्व होईपर्यंत अकरा वाजले होते. कांहीं घोंटाळा झाल्यास आपणाला कळवा, असें तिथें उभ्या असलेल्या इजिप्शियन पोलिसानें मोठ्या परोपकारबुद्धीनें आम्हांला सांगितलें. तो बेली थॉमसचा दोस्त होता, आणि इतर कॉंट्रॅक्टर्सना त्यानें आमच्या जवळपास येऊंसुद्धां दिलें नव्हतें! आमच्या गाड्या मात्र फक्कड होत्या. १९३७ मॉडेलची नवी करकरीत 'क्रिस्लर' सलून गाडी आम्हांला मिळाली होती. दुसरी तितकीच नवीन 'नॅश' होती. वाटेंत गाड्या दगा देण्याचा संभव नव्हता.

माझ्या गाडीचा ड्रायव्हर जॅकी हा मोठा मजेदार आणि आनंदी गडी आहे. तो इजिप्शियन ख्रिश्चन आहे. इजिप्तमध्यें कॉप्टिक ख्रिश्चन पुष्कळ आहेत. ते दिसतात इजिप्शियनसारखेच. कपडेहि तसेच करतात. भाषाहि अरबीच बोलतात. फक्त धर्मानें ख्रिश्चन आहेत. बहुतेक इजिप्शियन लोकांच्या कपड्यांची एक तऱ्हा आहे. युरोपियन पद्धतीचा कसल्यातरी रंगाचा गरम कापडाचा डबल ब्रेस्टचा फुल सूट आणि डोक्यावर ' टरबुश ' किंवा लाल फेझ् टोपी. सुवेझ शहरामधून आमची मोटार चालली आहे. रस्ते चांगले आधुनिक दिसतात. फूटपाथवर खुर्च्या-टेबलें टाकून कॉफीच्या दुकानासमोर लोक कॉफी पीत किंवा गप्पा मारीत बसले आहेत. इंग्लंडमध्यें नसली तरी युरोपमध्यें अशीच कॉफी पिण्याची पद्धत आहे म्हणतात. रस्त्यावर दिसणाऱ्या सर्व पाट्या फ्रेंचमध्यें आहेत. फ्रेंच संस्कृतीचा ईजिप्तवर बराच परिणाम झालेला दिसतो. रस्त्यांत दिसणाऱ्या इजिप्शियन बायकांचा पेहेराव मात्र सर्वांचा अगदीं एकसारखा आहे. सबंध काळा झगा, तोंडावर पातळ काळा बुरखा आणि तो बुरखा जागेवर रहाण्यासाठीं नाकावर नक्षी केलेली कसलीशी सोन्याची पकड. बहुतेक बायका गोऱ्या आणि शरिरानें भरदार दिसतात.

आतां सुवेझ शहर सोडून आमची मोटार मैलांमागून मैल वाळवंटांतून चालली आहे. आजूबाजूला दूरवर लहानसें झुडुपसुद्धां दिसत नाहीं. मैलच्या मैल दूरवर पिवळी वाळू पसरली आहे. मधून फक्त मोटरच्या डांबरी रस्त्याची काळी पट्टी सर्पासारखी दूरवर गेलेली दिसते. वाळवंटांत एके ठिकाणीं एक लहानसा दगडी स्तंभ उभा केलेला दिसला. ' हें काय ? ' असें विचारतां जॅकी म्हणाला, " ॲबिसिनियन युद्धाच्या वेळीं एक इटालियन विमान ॲबिसीनियाला जातांना येथें कोसळलें आणि आंत असलेले कुणीतरी पांच मोठे इटालियन अंमलदार जागच्या जागीं ठार झाले; त्यांच्या स्मरणार्थ हा स्तंभ उभारला आहे. "

दुपारीं एकचा सुमार झाला आहे. कैरोचें नवें उपनगर हेलिओपॉलिसजवळ आम्ही आलों आहोंत. हेलिओपॉलिसमधल्या इमारती नव्या, कोऱ्या, अगदीं आधुनिक पद्धतीच्या आणि अत्यंत सुंदर आहेत. रस्त्यांतून ट्रामगाड्या जात आहेत. इकडच्या ट्रामगाड्या आमच्या जी. आय. पी.

किंवा बी. बी. सी. आय. च्या डब्यांसारख्या दिसतात. आतां हेलिओपॉलिस-मधून आम्ही कैरो शहरांत शिरत आहोंत.

हेलिओपॉलीसमधल्या इमारती खूप उंच—अमेरिकन पद्धतीच्या—असून प्रत्येक इमारतीचा रंग व आकार निराळा आहे. नवीन आणि सुंदर इमारतींचें जणु काय प्रदर्शनच भरलें आहे, असा भास होतो. आतां आमची मोटर कैरो शहरांतून जात आहे. कैरोमधल्या इमारतीहि हेलिओपॉलीससारख्याच आहेत. इतक्या कडक उष्ण हवेंत डबल ब्रेस्टचे गरम सूट घालून रस्त्यांत फिरणारे हे इजिप्शियन लोक पाहून आम्हांला मोठें आश्चर्य वाटलें.

दुपारचा एक वाजला आहे. ल्यूना पार्क हॉटेल नांवाच्या हॉटेलच्या दारांत आमची मोटर उभी करून बेली थॉमसनें हॉटेलच्या मालकाशीं आमची ओळख करून दिली. हा गृहस्थ ग्रीक असून अत्यंत लीन आणि नम्र आहे. दुपारच्या जेवणाला प्रत्येकीं वीस पिॲास्टर म्हणजे चार शिलिंग पडतील असें त्यानें आम्हांला सांगितलें. आमच्यापैकीं चौघांनीं तेथेंच लंच घ्यावयाचें ठरविलें. मला एखाद्या इजिप्शियन दुकानांत जाऊन इजिप्शियन अन्न खायची इच्छा होती. इतर मंडळींना हॉटेलांत सोडून देऊन मी आणि पटेल एखाद्या इजिप्शियन उपाहारगृहाच्या शोधांत बाहेर पडलों. बरींच इजिप्शियन दुकानें दृष्टीला पडलीं; पण मुंबईत भेंडीबाजारच्या बाजूला असलेल्या मुसलमानांच्या दुकानांप्रमाणें तीं घाणेरडीं दिसल्यामुळें आंत जायची आम्हांला इच्छा होईना ! शेवटीं एका गल्लींत एक लहानसें दुकान आम्हीं शोधून काढलें. पैशांच्या गल्ल्याजवळ सफेत कफनी घालून बसलेल्या त्या इजिप्शियन दुकान-दाराला इंग्लिश किंवा हिंदुस्थानी भाषेचा गंधहि नव्हता. केकसारखा दिसणारा कांहींतरी एक पदार्थ त्याच्या कपाटांत होता, तो आम्हीं खुणेनें मागितला. त्याच्या नोकरानें एका प्लेटवर काढून तो आम्हांला दिला. पदार्थ मोठा रुचकर आणि गोड होता. त्या नोकराला खुणेनें 'त्याला काय म्हणतात ?' म्हणून आम्हीं विचारलें. त्या इजिप्शियन पदार्थाचें नांव 'बुझ्बुझ् !' नुसता 'बुझ्बुझ्' खाऊन कांहीं समाधान होईना. एका कोपऱ्यांत हिरवेगार ताजे मुळे पाहून आम्हांला आश्चर्य वाटलें.

ईजिप्तमध्येंसुद्धां मुळ्याची भाजी मिळते म्हणायची ! हिंदुस्थानची आठवण म्हणून ते कच्चेच मुळे आम्हीं मिठाबरोबर खाल्ले !

इतकें होईपर्यंत अडीच वाजले होते. लाल फेझ टोपी आणि लांब अरबी झगा घातलेला एक इजिप्शियन वाटाड्या बरोबर घेऊन आम्हीं कैरोमधला प्रख्यात 'म्युझियम' पहावयाला निघालों. त्या वाटाड्याला उत्तम इंग्लिश येत होतें. त्याचें नांव मि. हागग. कैरोमधल्या या म्यूझियमची इमारत केवढी तरी भव्य असून आंतील वस्तु अत्यंत प्रेक्षणीय आहेत. खिस्ती सनापूर्वीं दोन हजार वर्षें होऊन गेलेल्या रामिसीस आणि टोलेमी इत्यादि मिसर देशाच्या राज्यकर्त्यांचे दगडी पुतळे आणि इतर अवशेष या संग्रहालयांत आहेत. पहाण्यासारखी सर्वांत महत्वाची गोष्ट म्हणजे, आतां जगद्विख्यात झालेल्या तुतानखामेनच्या थडग्यांतले अवशेष. प्रसिद्ध इंग्लिश संशोधक लॉर्ड कार्नाव्होरन आणि मि. कार्टर यांनीं तुतानखामेन या प्राचीनकालीन इजिप्शियन राजाचें थडगें शोधून काढलें. त्यांत कितीतरी सुवर्णखचित पेट्या, 'ममी' आणि नक्षीकाम केलेल्या सोन्याच्या आकृति मिळाल्या. त्यांपैकीं बऱ्याचशा या संग्रहालयांत पाहावयास सांपडतात. सहासहा फूट लांब, राजाच्या आणि राणीच्या सोन्याच्या आकृति असून त्यांवर निरानिराळ्या रंगांच्या 'एनॅमल'चें नक्षीकाम केलेलें आहे. खिस्ती सनापूर्वीं हजारों वर्षें या कलाकृति करण्यांत आल्या होत्या हें समजल्यावर मनुष्य थक्क होतो. त्याशिवाय हजारों वर्षें होऊन गेलेल्या निरनिराळ्या 'ममी' येथें आहेत, मसाले भरून 'ममीफाय' करून ठेवलेलीं माकडें आहेत, कुत्रे आहेत, मासे आहेत—फार काय, मासाचे आणि भाकरीचे तुकडेहि हजारों वर्षांपूर्वीं 'ममीफाय' केलेले जसेच्या तसे आहेत. आपलें जें जें कांहीं आवडतें असेल तें तें 'ममीफाय' करून ठेवण्याचें या मिसर देशाच्या प्राचीन-कालीन राजांना वेडच होतें असें दिसतें !

तुतानखामेन आणि त्याची राणी या दोघांचे मुकुट मोठे मजेदार आहेत. मुकुट सबंध सोन्याचे असून त्यांवर एक लहानसें उंटाचें डोकें आणि सर्प कोरून काढलेले आहेत. उंटाचें डोकें हें उत्तर इजिप्तचें प्रतीक आणि सर्प हें दक्षिण इजिप्तचें चिन्ह होय. राजाराणींच्या या ज्या आकृति आहेत

त्यांचा उपयोग राजाराणीच्या मृत देहाच्या 'ममी' ठेवण्याकरितां पेटीसारखा करावयाचा. नंतर या सोनेरी पेट्या 'ॲलाबास्टर' नांवाच्या अत्यंत मौल्यवान गुलाबी रंगाच्या दगडाच्या भल्याथोरल्या चौकोनी पेट्यांत ठेवावयाच्या आणि या दगडी पेट्या पिरॅमिडच्या आंत पुरावयाच्या! एका सुवर्णाकृतीच्या एका हातांत एक चाबूक आणि दुसऱ्या हातांत एक किल्ली कोरलेली मी पाहिली. आमचा 'ड्रॅगोमन' किंवा वाटाड्या मि. हागग याला या चिन्हांचा अर्थ विचारतां त्यानें पुढीलप्रमाणें खुलासा केला. 'स्वर्गाचा मार्ग आक्रमीत असतां वाटेंत जर कुणी आडवें आलें तर या चाबकाचा उपयोग करून त्याला बाजूला करावयाचें आणि ती किल्ली लावून जीवनाचें रहस्य खोलावयाचें किंवा स्वर्गाचा दरवाजा उघडावयाचा!'

मिसर देशाच्या प्राचीन नृपतींची कल्पनाशक्ति दांडगी होती यांत शंका नाहीं! मुंबईतील खोजा मुसलमानांत अशीच एक चाल आहे म्हणतात. एखादा खोजा गेला, कीं त्याचे आप्तेष्ट धर्मगुरूकडे जातात आणि भरपूर दक्षिणा देऊन त्या धर्मगुरूकडून परमेश्वराला एक पत्र लिहून घेतात. ज्याप्रमाणें दक्षणा द्यावी त्या मानानें तो धर्मगुरु परमेश्वराला लिहितो, कीं स्वर्गात सदरहु इसमाला मोठा थोरला बंगला देण्यांत यावा, त्याचप्रमाणें भरपूर खाण्यापिण्याची, बागबगीचाचीहि सोय करण्यांत यावी! हें पत्र त्या मृत देहाबरोबर पुरण्यांत येतें.

कैरोमधला हा म्यूझियम अत्यंत भव्य आणि प्रेक्षणीय आहे. आम्हांला तो घाईघाईनें पहावा लागला. साडेतीन चारचा सुमार झाला होता आणि सातच्या आंत पिरॅमिड पाहून आम्हांला परत जावयाचें होतें. आम्ही आमच्या मोटारींत बसून पिरॅमिडकडे जावयास निघालों. कैरोपासून पंधरा मैलांवर असलेल्या गिझा नांवाच्या गांवाजवळ पिरॅमिड्स् आहेत. वाटेंत इजिप्तचे प्रख्यात राष्ट्रीय पुढारी आणि मुख्य प्रधान नहासपाशा यांचें घर आणि कैरो स्टेशन जॅकीनें आम्हांला दाखविलें. नाइल नदीवरच्या पुलावरून जात असतां माझें अंतःकरण थरारल्यासारखें झालें. या नाइल नदीशीं निगडित असलेला सौंदर्यशालिनी क्लिओपात्रेचा अद्‌भुतरम्य इतिहास माझ्या डोळ्यांसमोर उभा राहिला.

कैरो ते गिझा मोटारचा प्रवास रमणीय आहे. नाना तऱ्हेच्या नवीन नवीन आकृतींचीं टुमदार घरें आणि त्यांच्या भोंवतालचे चिमुकले बगीचे रस्त्याच्या दोन्ही बाजूंना दृष्टीला पडतात. दादर–माटुंग्याच्या बाजूला जशीं नवीन नवीन घरें दृष्टीला पडतात तशींच हीं घरें आहेत. पण इजिप्शियन लोकांच्या या घरांच्या बाबतींतल्या सौंदर्यदृष्टीची तारीफ करावी तेवढी थोडीच. घराला गुलाबी रंग देतील आणि गुलाबी रंगाचींच फुलें येणारी एखादी हिरवीगार वेल घरावर मोठ्या कलापूर्ण रीतीनें सोडून देतील. गर्द हिरव्या रंगाच्या घरावर बड्या लाल फुलांच्या वेली सोडून एखाद्या चित्रांतल्या घरासारखी रंगसंगति साधतील. एक इमारत पाहून आश्चर्यचकित व्हावें तों दुसरी इमारत त्याहूनही सुंदर आणि वेगळ्या तऱ्हेची दृष्टीला पडते. खरोखरच, युरोपला जातांना कैरो शहर पाहिल्याशिवाय कुणीं जाऊं नये.

शेवटीं आम्हीं पिरॅमिड्सकडे येऊन पोंचलों. रस्त्याच्या एका बाजूला उंटांच्या रांगाच्या रांगा आहेत आणि प्रत्येक उंटाजवळ एकएक अरब उभा आहे. पिरॅमिड पहावयाचे असल्यास उंटावरून किंवा घोड्यावरून पहावे लागतात. मैलच्या मैल पसरलेल्या तापलेल्या वाळूंतून पायानें फिरणें अशक्य असतें. प्रत्येकीं दोन शिलिंग द्यावयाचे ठरवून आम्हीं सहाजण उंटावर स्वार झालों. दोघांनीं घोडे घेतले. आमचा मोटार ड्रायव्हर जॅकी आणि वाटाड्या हागग हे गाढवावर आरूढ झाले. अशा थाटांत आम्हीं पिरॅमिड्सवर चालून गेलों. पुस्तकांतून वर्णनें वाचतांना किंवा चित्रांत पहातांना पिरॅमिड्स् जेवढे भव्य आणि प्रचंड वाटतात तेवढे प्रत्यक्ष पाहून मला ते वाटले नाहींत. पिवळ्या रंगाच्या दगडांच्या या प्रचंड त्रिकोणी राशींनीं माझ्या मनावर विशेषसा परिणाम केला नाहीं. सौंदर्य नाहींच नाहीं, आणि म्हणण्यासारखी भव्यताहि नाहीं. 'स्फिंक्स'ची आकृति मात्र आपण कल्पना करतों त्यापेक्षांहि मोठी आणि भव्य आहे. स्त्रीचें मुखमंडल आणि सिंहाचें शरीर असलेल्या या अवाढव्य आकृतीकडे पहातांना अनेक संमिश्र भावनांनीं अंतःकरण उचंबळून येतें. ही विचित्र आकृति कोरणाऱ्या शिल्पकाराच्या मनांत विचार तरी काय होता ?

आम्हीं परत येत असतां समोरून येणाऱ्या एका उंटावर डळमळत असलेले कोणे माझ्या दृष्टीला पडले. बिचाऱ्यांचीं हाडें खिळखिळीं झालीं असतील. कैरोला परत येतांना वाटेंत ' सिटाडेल ' किंवा कैरोंतला किल्ला पाहिला. या किल्ल्यांत सध्यां इजिप्तमधल्या ब्रिटिश लष्कराची छावणी आहे. ' महंमदअल्ली मॉस्क ' ही कैरोमधील प्रख्यात मशीदहि पाहिली. येतांना मुद्दाम कैरोचा जुना बाजार पहावयाला आम्हीं गेलों. अरुंद बोळ, चिखल आणि घवघवणाऱ्या माशा, हा हिंदुस्थानांतल्या कुठल्याहि शहरांतल्या जुन्या बाजारांत दिसणारा प्रकार इथेंहि होता. आम्हीं ल्यूना पार्क हॉटेलजवळ पुन्हा परत आलों. तेव्हां संध्याकाळीं साताचा सुमार झाला होता. थोडासा फराळ करून आम्ही पोर्ट सय्यदच्या वाटेला लागलों.

कैरो शहराची हद्द सोडण्यापूर्वी एका घरासमोर जॅकीनें मोटार उभी केली. ' हें माझ्या आईचं घर. माझ्या घरांत कॉफी घेतल्याशिवाय मी तुम्हाला जाऊं देणार नाहीं,' म्हणून तो आग्रह करूं लागला. जॅकीच्या आईचें तें स्वतःचें घर होतें. घरांत उत्तम फर्निचर असून सोफा आणि खुर्च्यांवरतीं स्वच्छ अभ्रे घातलेले होते. मोटार-ड्रायव्हरचें कैरोमध्यें स्वतःचें घर असावें याचें मला मोठें आश्चर्य वाटलें. जॅकी, त्याची बायको आणि मुलें सुवेझ येथें रहातात. त्याची आई आणि दोघे धाकटे भाऊ कैरोमधील घरांत रहात होते. त्या दोघांनीं घरीं केलेल्या इजिप्शियन बिस्किटांच्या बशा आमच्या पुढ्यांत आणून ठेवल्या आणि जॅकी कॉफीचा ट्रे घेऊन आला. कॉफीचे कप खेळांतल्या कपांसारखे चिमुकले असून त्यांवर सोनेरी इजिप्शियन नक्षीकाम केलेलें होतें. आग्रह कर करून जॅकीनें कॉफीचे दोनदोन तीनतीन पेले आम्हांला प्यायला लावले. हिंदी लोकांविषयीं एकंदर इजिप्शियन लोकांना मोठा आपलेपणा वाटतो यांत शंका नाहीं. जॅकी एक मोठा नमुनेदार इजिप्शियन गृहस्थ आहे.

कैरो ते पोर्ट सय्यद हा जवळजवळ एकशेंसाठ मैलांचा प्रवास अतिशय कंटाळवाणा आणि थोडासा धोक्याचाहि आहे. कितीतरी इजिप्शियन खेड्यांतून आणि जंगलांतून मोटारचा रस्ता जातो. रस्त्यांत केव्हां केव्हां लूटमारीचेहि प्रकार होतात, असें आम्हीं ऐकलें होतें. गर्द झाडींतून आमची

मोटर चालली. चंद्र एका बाजूनें वर येत होता. एक वळण घेतांना जॅकीनें मोटरचा वेग अगदीं कमी केला होता. इतक्यांत एक धिप्पाड अरब म्हातारा कुठूनसा पुढें आला आणि त्यानें मोटारमध्यें वांकून पाहिलें. आमच्यापैकीं राणा नांवाच्या एका इसमाच्या छातींत धडकी भरली आणि—

"Wha... what does he want" म्हणून त्यानें जॅकीला विचारलें. जॅकी त्या अरबाशीं अरबी भाषेंत कांहींतरी बोलला आणि त्यानें मोटार पुढें हांकली.

"घाबरूं नका," जॅकी राणाला म्हणाला, "तो एक खेडवळ अरब होता. हे लोक कोण आहेत, म्हणून तो मला विचारीत होता."

"I am not at all afraid." छाती काढून राणा म्हणाला.

रात्रीं बाराचा सुमार झाला आहे. कित्येक खेड्यांतल्या कॉफीगृहांतून कॉफी पीत बसलेल्या इजिप्शियन खेडवळांचे घोळके अजूनहि दिसताहेत. आतां आम्ही इस्मालिया शहरांत येऊन पोंचलों आहोंत. पोर्ट सय्यद अजून साठसत्तर मैल आहे. इस्मालिया शहरांत ब्रिटिश लष्कराचें मुख्य ठाणें आहे. इस्मालिया शहरांतून जातांना प्रत्येक मोटरला खास परवानगी घ्यावी लागते. रस्त्यांत कांहीं ब्रिटिश शिपाई आम्हांला दिसले. 'सिने-द-ला-कोऑपरातीव्ह' नांवाच्या एका सिनेमांत ग्रेटा गार्बोची 'Painted Veil' ही फिल्म लागली होती. इस्मालिया ते पोर्ट सय्यद हा मोटरचा रस्ता सारखा सुवेझ कालव्याच्या कांठानें आहे. मोठा थोरला सर्चलाइट पुढें लावून कालव्यांतून स्तब्धपणें सरसर सरसर चाललेल्या तीनचार बोटी आमच्या दृष्टीला पडल्या. आम्ही पोर्ट सय्यदला पोंचलों तेव्हां रात्रीचा दीड वाजला होता. आमची 'कॉंटे व्हर्डे' बोट रात्रीं अकरा वाजतांच येऊन पोर्ट सय्यदच्या बंदरांत उभी होती. लॉंचमध्यें बसून आम्ही आमच्या बोटीवर गेलों. कितीतरी टोलेजंग बोटी आजूबाजूला पाण्यांत उभ्या होत्या. विजेचे असंख्य दिवे या बोटीवर पेटलेले असतात आणि रात्रींच्या वेळीं पोर्ट सय्यद बंदराचा देखावा मोठा अद्‌भुतरम्य दिसतो.

* * *

## ता. ३० एप्रिल—

*—' सर्व कांहीं चुंबनासाठीं ! '*

आज नऊ वाजतां ब्रेकफास्टला गेलों तों एक चमत्कार माझ्या दृष्टीला पडला. सर्व इटालियन वेटर्सच्या स्वच्छ, सफेत कपड्यांच्या जागीं काळे, गरम कपडे आले होते. इतर युरोपियन उतारूंच्या कपड्यांतहि असाच विस्मयकारक फरक दिसत होता. खरेंच, विसरलों. आज आम्हीं भूमध्यसमुद्रांत आहोंत. आशिया आणि आफ्रिका हीं दोन खंडें मागें राहिलीं. युरोपियन वातावरण सुरू झालें. आणि हवाहि तशीच पडली आहे. आकाशांत ढग जमले आहेत. थंडगार वारे सुटले आहेत आणि धुकेंहि खूप पसरलें आहे.

दुपारीं एक वाजतां इतकी थंडी आहे, कीं फ्लॅनेलची तुमान आणि लोंकरीचा पुलओव्हर बॅगेंतून हुडकून काढून मला आज घालावा लागला. आज रात्रीं नऊ वाजतां ' All for a Kiss ' नांवाचा एक इटालियन बोलपट आम्हांला दाखविला. फर्स्ट क्लासच्या डेकवर सिनेमाचा पडदा लावला होता, तेथें मी गेलों. फोटोग्राफी छान होती; पण इटालियन भाषेचें एक अक्षरहि कळेना. तेव्हां ' सर्व कांहीं चुंबनासाठीं ' सोडून देऊन केबिनमध्यें येऊन मी झोंपीं गेलों.

\+ + +

## ता. १ मे—

*इंग्लिशमन असूनही सुस्वभावी तरुण !—सिमल्याच्या सरकारी फायलींत काणेकरांचें चारित्र !—आगामी युद्धाचीं पूर्वचिन्हें !*

काल रात्रीं मुंबईतल्या नोव्हेंबर—डिसेंबरसारखी थंडी पडली होती. सकाळींच उठून पोर्टहोलमधून बाहेर पहातों, तों डोंगराच्या रांगाच्या रांगा दिसत होत्या. डोंगराच्या माथ्यावर शुभ्र हिम आणि खालीं पायथ्याकडे हिरवीगार झाडी दिसली. हेंच कॅंडिया किंवा क्रीट बेट.

आज वरुणराज खवळले आहेत. इतके दिवस आमची बोट म्हणजे तरंगता राजवाडा होता. कठड्यावरून पाण्यांत पाहीपर्यंत आपण पाण्यांतून

झपाट्यानें पुढें चाललों आहोंत असा भासहि होत नव्हता. पण आज सर्व नूर बदलला आहे. जोराचा वारा सुटला आहे, आणि बोट वाटेल तशी हालते आहे.

आज सकाळीं साडेदहा वाजतां आमचे पासपोर्ट स्मोकिंगरूममध्यें परत देण्यांत येतील अशी नोटीस होती. साडेदहा ते बारा आम्ही सर्वजण रूममध्यें बसून होतों. शेवटीं कळलें, कीं पासपोर्ट देणाऱ्या ऑफिसरलाच बोट लागली आहे, आणि तो केबिनमध्यें पडून राहिला आहे !

दुपारीं बाराचा सुमार झाला आहे. बोट आतां हालावयाची थांबली आहे. उजव्या बाजूला बऱ्याच अंतरावर डोंगरांची एक अंधुक रांग दिसते आहे. हा ग्रीसचा किनारा, युरिपिडिस, ॲरिस्टॉफेनीस, सोफोक्लीस, या अजरामर लेखकांचा देश मी पहातों आहे. वाङ्मय, कला, संस्कृति यांचें आगर म्हणून एके काळीं गाजलेल्या या राष्ट्राला अलीकडे झालें आहे तरी काय, असा उद्वेगजनक विचार माझ्या मनाला टोंचत आहे.

आज संध्याकाळीं मि. स्टीव्हन्स नांवाच्या फर्स्ट क्लासमध्यें असलेल्या एका इंग्लिश गृहस्थांशीं ओळख झाली. महंमूदची आणि त्याची पूर्वी थोडीशी ओळख होती. आज आपल्या डेकवर त्यानें आम्हांला गप्पा मारण्याकरितां बोलावलें होतें. पस्तीसछत्तीस वर्षांचा एक सुसंस्कृत तरुण इंग्रज आहे हा. इंग्लिशमन् असून मोठा सुस्वभावी आणि ध्येयवादी तरुण आहे. सिमला येथें हिंदुस्थान सरकारच्या प्रसिद्धीखात्यांत पांच वर्षांच्या करारावर तो नोकरीवर होता. करारांतून मोकळा झाल्यावर तो आतां नॉर्वेमध्यें ‘Walking Tour’साठीं चालला आहे. सबंध नॉर्वे देशांत केवळ आवड म्हणून तो पायानें फिरणार आहे ! आमच्याकडे असा कुणी निघाला तर लोक त्याला हंसतील !

वृत्तपत्राशीं माझा संबंध आहे असें त्याला सांगितल्यावर तो हंसत हंसत म्हणाला, “तर मग माझ्या सिमला येथील फाइलमध्यें तुझं नांव, गांव, पत्ता व चरित्र असलंच पाहिजे !”

उद्यां सकाळीं सहा वाजतां आमची बोट इटलीच्या ब्रिंडिसी बंदराला लागणार आहे. बोट फक्त दोनच तास येथें थांबणार. ब्रिंडिसी किंवा व्हेनिस येथें बंदराचे फोटो उतारूंनीं घेऊं नयेत अशी सक्त ताकीद देणारी नोटीस लागली आहे. आगामी महायुद्धाचीं पूर्वचिन्हें !

## ता. २ मे–

*युरोप युरोप म्हणतात तें हेंच का?—हें मुगभाट किंवा कामाठीपुरा तर नव्हे!—दरिद्री इटली.*

बरोबर सहाला बोट ब्रिंडिसी बंदराला लागली. आम्हीं खालीं उतरण्याकरितां कपडे करून सव्वासहाला तयार झालों. थोडीशी थंडी आहे. सूर्यप्रकाश पडला आहे. ब्रिंडिसी बंदरांत खालीं पाय ठेवल्यावर कितीतरी विचारांनीं माझ्या डोक्यांत एकच गोंधळ उडवून टाकला आहे. आतां आम्ही 'युरोपला जात आहोंत' ही भाषा संपली. आज आम्ही युरोपांत आहोंत. हेंच का युरोप? युरोपांत पाऊल ठेवल्यावर कांहीं-तरी निराळेंच वाटेल अशी माझी अपेक्षा होती. पण तसें कांहींच वाटत नाहीं! त्यामुळें मला कसेंसेंच वाटतें. डॉ० फिलिपहि तेंच म्हणतो, "काय बुवा युरोपांत आल्यासारखं नवीन असं कांहीं वाटत नाहीं! जमिनीसारखी जमीन, माणसांसारखीं माणसं–जरा गोरीं–आणि घरासारखीं घरं!"

धक्क्यापासून जवळ अगदीं शंभर यार्डांवर एक बगीचा दिसतो आहे. ब्रिंडिसी हें अगदीं लहानसें शहर आहे. मुंबईतील व्हिक्टोरिया सारख्याच हाडकुळे घोडे असलेल्या धुळकट व्हिक्टोरिया रस्त्यांत उभ्या आहेत. इटालियन गाडीवालेहि आमच्या गाडीवाल्यापेक्षां कांहीं विशेष चांगले दिसत नाहींत. आमच्याइकडील इस्त्रायल लोकांइतके गोरे आहेत इतकेंच. त्यांचे कपडेहि फाटकेतुटके आणि ठिगळें लावलेले आहेत. दहा लिरांत किंवा एक रुपयांत सगळें गांव दाखवितों म्हणून खुणेनें ते आम्हांला सांगू लागलें, पण गाडींतून फिरावयाला आम्हांला वेळ नाहीं. पायानेंच जरा इकडे तिकडे गांवांत फिरावें आणि आठाच्या आंत परत यावें असा आम्हीं विचार केला. रस्ता डांबरी नसून मुंबईत वाडीबंदरच्या बाजूला जसे रस्ते आहेत त्याप्रमाणें सबंध रस्त्यावर चौकोनी दगडांचे तुकडे बसविलेले आहेत. एका नाक्यावर गेल्या महायुद्धाचें एक स्मारक दृष्टीला पडलें. सुंदर, सफेत संगमरवरी दगड आणि लाल ग्रॅनाइट दगड यांचें तें बनवलेलें आहे. फरशीवर फॅसिस्ट चिन्ह आहे. काटक्यांचा एक जुडगा आणि

त्याच्या बाजूला एक कुऱ्हाड हें तें चिन्ह. रस्त्यांत भेटणारे इटालियन्स अगदींच गबाळे आणि दरिद्री दिसतात. टाय नाहीं, धड हॅट नाहीं, फाटकेतुटके ठिगळें लावलेले सुती कपडे! इटलींत इतकें दारिद्य आहे कीं काय? नाक्यानाक्यावर असल्या बेकार लोकांचे घोळके दृष्टीला पडले. रस्त्यावर गाढवांच्या आणि घोड्यांच्या कांहीं खटारेवजा गाड्या दिसल्या. डोक्याला रंगीत फडका बांधलेल्या इटालियन शेतकरी बाया या गाड्यांतल्या सामानावर आपल्या इकडल्या मजूर बायांसारख्याच बसलेल्या दिसल्या.

• ब्रिंडिसीमधल्या कांहीं अरुंद बोळांत आम्हीं शिरलों. मला मुगभाट किंवा कामाठीपुऱ्याची आठवण झाली. तशींच चंद्रमौळी घरें आणि तशीच घाण. गंजलेल्या पत्र्यांचीं छपरें, कोळशाच्या गोणी घराच्या दाराशीं पडलेल्या, मळके व फाटके कपडे घातलेल्या इटालियन गृहिणी आंतबाहेर काम करीत असलेल्या, असा देखावा दृष्टीला पडला. ब्रिंडिसी रेल्वे स्टेशनाजवळ नंतर आम्ही गेलों. तिथचे तिकीट–कलेक्टर किंवा गार्ड वगैरे आमच्या लोणावळा किंवा खंडाळा येथील स्टेशनांत दिसणाऱ्या अँग्लो इंडियन रेल्वे नोकरांइतकेच गोरे, तितकेच स्वच्छ आणि तितकेच व्यवस्थित दिसले!

मुंबईत बूट पॉलिश करणारीं पोरें आहेत तसलींच एकदोन इटालियन पोरें आम्हांला वाटेंत भेटलीं. 'Signor Cigali, Signor Cigali!' असें म्हणत खुणेनें तीं आमच्याकडे सिगरेट मागूं लागलीं. इटलींत सिगरेट फार महाग आहेत. एक सिगरेट एखाद्या गरीब इटालियनाला दिली, कीं त्याचे डोळे कृतज्ञतेनें भरून येतात.

रस्त्याच्या एका कोपऱ्यावर पांच पन्नास गरीब इटालियन बाया आणि पुरुष उभे होते. त्यांच्यापैकीं एकीजवळ 'चेरी' फळें विकावयाला होतीं. आपल्याकडल्या जांभळासारखीं चेरी दिसतात. अर्थात रुचीला वेगळीं आहेत. एका लिराला म्हणजे दोनअडीच आण्यांना पसा भरून चेरी तिनें मला दिलीं. एक लिरा तिच्या हातांत दिल्यावर तो पहाण्याकरितां सगळ्या बायका तिच्याभोंवतीं जमल्या. जणु काय लिरा हें नाणें त्यांनीं कधीं पाहिलेंच नव्हतें! किंवा तेवढ्या चेरींना एक लिरा

देण्यांत मी फसलों असेन ! ब्रिंडिसी शहराच्या माझ्या या दोन तासांच्या फेरफटक्यांत इटली हा बराच दरिद्री देश असावा अशी माझी कल्पना झाली. अर्थात् दोन तासांत बनलेल्या मतांना किंमत तितकीच द्यायची. पण माझा तसा ग्रह झाला खरा. आज उजव्या बाजूला युगोस्लाव्हियाचा किनारा दिसतो आहे. उद्यां सकाळीं पांच वाजतां आम्हीं व्हेनिसला पोंचणार आणि मग बोटीचा प्रवास संपून माझा युरोपचा प्रवास सुरू होणार. अँटोनिओ, बॅसानिओ, शायलॉक आणि पोर्शियाच्या शहरांत उद्यां !

\+ + +

## ता. ३ मे—

*—व्हेनिस शहर*

आज पहांटे पांच वाजतां व्हेनिसला बोट लागायची आहे. रात्रीं झोंपतांना हाच विचार मनांत घोळत असल्यामुळें एकदम दचकून मी पहांटे जागा झालों. दिवा लावून घड्याळांत पाहतों तों बरोबर पांच वाजले होते. पोर्टहोलमधून बाहेर पाहतों तों जुन्या पद्धतीच्या भव्य इमारती आणि चर्चेसचे उंचउंच गोलघुमट दिसत होते; आमची बोट व्हेनिस बंदरांत उभी आहे. पण साडेसहा वाजल्याशिवाय आम्हांला खालीं उतरतां येणार नाहीं. ज्यांना सरळ लंडनला जायचें आहे त्यांना लॉइड ट्रिस्टिनो कंपनीची लाँच बोटीवरून बंदरांत उतरल्याशिवाय सरळ व्हेनिस स्टेशनावर घेऊन जाणार आहे. आम्ही व्हेनिसमध्यें राहणार आहोंत, तेव्हां त्या लाँचमधून आम्हांला जातां येत नाहीं.

सहा वाजतां बोट धक्क्याला लागली आणि आम्ही खालीं उतरलों. सहा ते आठ आम्हांला कस्टम हाऊसकडे आमचें सामान यावयाची वाट पहात धक्क्यावरच उभे रहावें लागलें. युरोपमध्यें इटली सूर्यप्रकाशाबद्दल प्रसिद्ध आहे. पण आजचा दिवस अगदींच ढगाळ आणि उदासवाणा दिसतो. मुंबई आणि व्हेनिस यांत फरक काय वाटतो याचा मी विचार करतों आहे. तसा कांहींच फरक वाटत नाहीं. मे महिन्यांत पावसाळी हवा आहे इतकेंच. थंडीहि बेताचीच. आठ वाजले तरी सामान खालीं येईना, तेव्हां मी आणि महमूद पुन्हा बोटीवर गेलों. सामान बाहेर

काढीत असलेल्या इटालियन हमालांना दोनदोन सिगारेट्स् दिल्याबरोबर त्यांनीं सामान ताबडतोब बाहेर काढून खालीं पाठवून दिलें.

व्हेनिसमधल्या निरनिराळ्या हॉटेलांचे प्रतिनिधि आपापलीं कार्डें पुढें करून आमच्याभोंवतीं गर्दी करताहेत. पण महमूदला एक चांगलें जर्मन हॉटेल माहीत आहे, तेव्हां त्यांना आम्ही दाद देत नाहीं. एक गोंडोला किंवा होडी ठरवून त्यांत आम्ही म्हणजे मी, महमूद, रशीदा आणि आमचा मित्र पटेल बसलों, आणि गोंडोलावाल्याला व्हेनिस स्टेशन-कडे न्यायला सांगितलें. व्हेनिसमध्यें आम्हांला एकदोन दिवसच रहावयाचें आहे; तेव्हां 'क्लोक रूम'मध्यें सर्व सामान ठेवून देऊन फक्त हातांतून नेण्या-सारख्या बॅग्ज आम्हीं बरोबर घ्यावयाचें ठरविलें आहे. व्हेनिसमध्यें स्टेशनावर काय किंवा कुठेंहि जावयाचें म्हणजे लहानमोठ्या कालव्यां-मधून गोंडोलांत बसून जायचें किंवा दगडाची फरसबंदी केलेल्या लहानलहान रस्त्यांवरून पायीं फिरायचें. गाडी, घोडा, मोटार कांहीं दिसायचें नाहीं. लहानमोठे कालवे हेच मुख्य रस्ते. इतर शहरांत ज्याप्रमाणें मोठे रस्ते आणि गल्ल्या असतात, त्याप्रमाणें व्हेनिसमध्यें मोठे कालवे आणि लहान कालवे आहेत. जिकडे तिकडे कालव्यांवरून लहानमोठे दगडी पूलच पूल! त्यामुळें या शहराचा देखावा मोठा विचित्र दिसतो. आमची गोंडोला एका कालव्यांतून दुसऱ्या कालव्यांत जात असतां आजूबाजूचा देखावा मोठा मजेदार दिसतो आहे. कांहींकांहीं गोंडोलांमध्यें हिरव्यागार भाज्यांचे, कांदे—बटाट्यांचे ढीगच्या ढीग आहेत. सकाळच्या वेळीं या गोंडोला बाजाराकडे चालल्या आहेत. फार काय, पण पत्रें आणि पार्सलें इकडून तिकडे नेण्याकरितां मुंबईत जशा लाल रंगाच्या पोस्टाच्या मोटारलॉऱ्या आहेत, तशा व्हेनिस-मध्यें पोस्टाच्या मोटर-लॅंचेस आहेत. बाजूला इटालियन पोस्ट ऑफिसचें चिन्ह व पुढें इटालियन निशाण फडकवीत या लॅंचेस कालव्यांतून इकडून तिकडे जात आहेत. जमिनीवर जशा मोटर बसेस असतात तशा इथें बोट-बसेस आहेत. मोठ्यामोठ्या कालव्यांतून त्यांचीं तरंगतीं स्टेशनें आहेत. अर्थात् त्यांची एक बाजू जमिनीला लागलेली असते. दर पांच मिनिटांनीं बोटबस येते आणि उतारू घेऊन पुढें जाते. इतर शहरां-

तले श्रीमंत लोक स्वतःच्या मोटरी ठेवतात; व्हेनिसमधले सावकार स्वतःच्या मोटर—लॉंचेस आणि गोंडोला ठेवतात !

आधींच आज हवा ढगाळ आणि पावसाळी आहे. त्यांत आणखी या व्हेनिस शहरांत सर्व कालवेच कालवे आणि पाणीच पाणी ! पुण्यांत जसे जुन्या तऱ्हेचे पेशवाई वाडे दिसतात, त्याप्रमाणें कालव्यांच्या दोहों बाजूला दिसणाऱ्या व्हेनिसमधल्या या जुनाट पण भव्य इमारती इतक्या ओलसर आणि दमट दिसतात कीं, लोक यांत रहातात याचें मला आश्चर्य वाटतें. इमारतीचा पाया आणि दारापुढल्या खालच्या कित्येक पायऱ्या कालव्यांतल्या पाण्यांत बुडालेल्या आणि हिरव्यागार घाणेरड्या शेवाळानें बरबटलेल्या ! गोंडोला येऊन या पायऱ्यांना लागावयाची आणि खालीं उतरून घरांत जावयाचें ! सर्व वातावरण ओलसर आणि दमट ! रशीदा म्हणते, " व्हेनिसमध्यें शेंकडा नव्वद लोक न्युमोनियानें मरत असावे ! " मला तें खरें वाटतें.

ही हवा अशी आणि सर्व गोंडोलांचा रंग एकजात काळा कुळकुळीत. गोंडोलांना निरनिराळे सफेत, पिवळे रंग देऊन जरा शोभा आणायला या इटालियन लोकांना झालें काय, असा विचार माझ्या डोक्यांत आला आणि महमूदला मी तसें म्हणालों. तेव्हां महमूदनें या काळ्या रंगाचा इतिहास मला सांगितला. तो पूर्वी व्हेनिस येथें आला असतां त्यालाहि हाच प्रश्न पडला होता. आणि कुणीतरी इटालियन प्रोफेसरानें त्याला हा इतिहास सांगितला होता. मला पाहिजे होते त्याप्रमाणें खरोखरच पूर्वी गोंडोलांचे रंग मोठे मोहक आणि चित्रविचित्र होते. पण दोनतीन शतकांपूर्वी ' ब्लॅक प्लेग 'ची एक भयंकर सांथ व्हेनिस शहरांत आली आणि इटालियन लोकांच्या लाडक्या ' व्हेनिझिया ' शहराला अक्षरशः स्मशानकळा आणून ती गेली. त्या भयानक प्रसंगाच्या स्मरणार्थ सर्व गोंडोलांना काळा रंग देण्यांत आला. आणि आजतागायत तोच रंग चालू आहे. वातावरणांतला आणि आजूबाजूचा एकंदर कुंदपणा पाहून पटेल इतका विषण्ण झाला, कीं आमच्याबरोबर व्हेनिसमध्यें रहाण्याचा बेत बदलून स्टेशनावर पोंचल्याबरोबर त्याच दिवशीं साडेदहाच्या गाडीनें पुढें लंडनला जाण्याचा त्यानें विचार केला.

स्टेशनावर आम्हीं सामान ठेवलें, आणि पटेलला निरोप देऊन पुन्हा गोंडोलांतून आम्ही हॉटेलकडे यावयाला निघालों. आतां लहान कालवे सोडून व्हेनिसच्या सुप्रसिद्ध उघड्या 'लॅगूनां'त किंवा उपसागरांत आमची गोंडोला आली आहे. मेघांआडून हंसतहंसत सूर्य बाहेर येतो आहे. एका बाजूला व्हेनिसचा भव्य सान मार्को स्क्वेअर आणि 'डोज्'चा राजवाडा दिसतो आहे. बाजूला एक मोठा थोरला रुंद रस्ता आहे. पटेलनें हा नमुनेदार इटालियन देखावा पाहिला असता तर त्यानें आपला व्हेनिसमध्यें रहायचा बेत खास बदलला नसता. या 'लॅगूना'च्या कांठाशींच सान मार्को स्क्वेअरच्या जवळ आमचें 'हॉटेल सँडवर्थ गाब्रिएल्' आहे. हॉटेलच्या दाराशीं गोंडोला उभी करून आम्ही खालीं उतरलों.

हॉटेलचा ऑस्ट्रो–जर्मन मालक आमचें स्वागत करण्याकरितां पुढें आला. नखशिखान्त काळा सूट घातलेला हा मध्यमवयस्क गृहस्थ अगदीं मासलेवाईक जर्मन आहे. भरदार शरीर, टक्कल पडलेल्या डोक्या-वरचे उरलेसुरलेले केंस व्यवस्थितपणें वळवलेले आणि बोलण्याचालण्यांत अत्यंत नम्र आणि सभ्य. प्रत्येकीं एका दिवसाचे १९ लिरा किंवा साधारणपणें तीन साडेतीन रुपये या दरानें आम्हीं खोल्या ठरवल्या. एवढ्या पैशांत रहायला खोली आणि सकाळचा ब्रेकफास्ट, एवढें मिळतें. दुपारचें आणि रात्रीचें जेवण गांवामध्यें नानातऱ्हेचीं 'कॅफे' असतात त्यांत घ्यावयाचें. बहुतेक सर्व युरोपभर अशीच पद्धत आहे. खोल्या अतिशय सुंदर आहेत. मुंबईतील ताजमहाल हॉटेलच्या सेकंड क्लासच्या खोल्या मीं पाहिल्या आहेत, त्यांपेक्षां या कितीतरी चांगल्या आहेत. रंगीबेरंगी वॉलपेपरनें भिंती सुशोभित केलेल्या आहेत. आंतल्या सजावट–सामानाची आणि उशापांघरुणांची स्वच्छता आणि टापटीप जर्मन आहे इतकें म्हटलें म्हणजे पुरे. स्वच्छता आणि टापटीप यांत जर्मन लोकांचा हात धरणारे जगांत कुणी नसतील. जपानी लोक आहेत म्हणतात; पण मला त्यांची माहिती नाहीं.

आतां दहा वाजले होते. आम्हीं 'ब्रेकफास्ट' घेतला, आणि व्हेनिस पहावयाला बाहेर पडलों.

व्हेनिसचा अत्यंत प्रेक्षणीय आणि सुप्रसिद्ध असा जो भाग सान मार्को स्क्वेअर त्याच्या जवळच आमचें हॉटेल असल्यामुळें आम्हांला फार लांब फिरावें लागत नाहीं. या स्क्वेअरमध्येंच व्हेनिसचें हजारों वर्षांपूर्वीचें जुनें सान मार्को चर्च हें प्रख्यात प्रार्थनामंदिर आहे. त्या चर्चला लागूनच व्हेनिस हें प्राचीन कालीं स्वतंत्र राज्य असतांना त्यावर राज्य करणारे जे 'डोज्' किंवा 'ड्यूक,' असत त्यांचा रहाण्याचा इतिहास-प्रसिद्ध राजवाडा आहे.

सान मार्को चर्च अत्यंत सुंदर आणि भव्य आहे. रोमन कॅथोलिक पंथाची ज्या काळीं अत्यंत चलती होती त्या वेळीं तें बांधलेलें आहे. एवढ्या मोठ्या इमारतीचें आंतील सबंध छत सोनेरी रंगाच्या कांचेच्या तुकड्यांनीं मढवलेलें असून त्यांत मोठमोठ्या चित्रकारांनीं काढलेल्या खिश्चन संतांच्या रंगीत आकृति बसवलेल्या आहेत. याला 'मोझेक् वर्क' म्हणतात. हें 'मोझेक् वर्क' फार जुनें होऊन त्यांतले कांहीं कांचेचे खडे निखळल्यामुळें इटालियन सरकारनें ते पुन्हां होते तसे बसवण्याचें काम सुरू केलें आहे. कांहीं सुप्रसिद्ध इटालियन आर्टिस्ट त्यावर देखरेख करीत आहेत. हे सोनेरी खडे शेंकडों वर्षांचे जुने असले तरी त्यांचा रंग अजून आहे तसा आहे.

इंग्रजी भाषा धड येत नसतांहि तिथें काम करीत असलेल्या एका इटालियन आर्टिस्टनें रशीदाशीं तेवढ्यांत दोस्ती केली आणि त्यापैकीं दोनतीन सुंदर खडे तिला बक्षीस दिले! मात्र ते कुणाला दाखवूं नकोस, गुपचूप घरीं ने, म्हणून त्यानें तिला खुणेनें सांगितलें. अशा तऱ्हेनें तीं प्राचीनकालचीं स्मृतिचिन्हें देणें सरकारी नियमांना धरून नाहीं. त्या खड्यांपैकीं एक खडा रशीदाच्या बॅगेतून मीं 'चोरून' आणला आहे!

सान मार्को चौकांतला देखावा मोठा मजेदार आहे. हजारों कबुतरांचे थवे! इथें फिरणारे इटालियन स्त्रीपुरुष मक्याचे किंवा चण्याचे मूठमूठ दाणे उडवतात आणि तीं कबुतरें त्यांच्या अंगा-खांद्यावर येऊन बसलीं म्हणजे एकमेकांचे फोटो घेतात! हा एक खेळच आहे! हे चणे किंवा मक्याचे दाणे विकण्याकरितां आपल्याकडे चौपाटीवर जसे भेळवाले बसलेले असतात, त्याप्रमाणें ठिकठिकाणीं गरीब इटालियन स्त्रिया बस-

लेल्या असतात. आणि कागदाच्या त्रिकोणी पुड्यांतून हे दाणे त्या विकतात. रस्त्यांतून फिरणाऱ्या या युरोपियन स्त्रीपुरुषांचे एकजात काळे कपडे पाहून मला कसेंसेंच वाटतें. बहुतेक बायकांचे झगे काळे, पुरुषांचे सूट काळे, फार काय, पण फेल्ट हॅट्‌स्‌सुद्धां बहुतेकांच्या काळ्या! रस्त्यावरून जाणाऱ्या काळे कपडे घातलेल्या या लोकांचे थवेच्या थवे पाहिले म्हणजे गांवांतले सारे लोक एकाद्या प्रेतयात्रेला जाताहेत कीं काय असा भास होतो! आमच्या हिंदुस्थानांत किती रंगाचे लोक आणि किती विविध रंगाचे आणि हरतऱ्हांचे त्यांचे वेष!

आज दुपारीं अडीच वाजतां 'सेरेनेस्सीमा' नांवाची एक लॉंच प्रवाशांना व्हेनिसजवळचीं निरनिराळीं स्थळें दाखवण्याकरितां सुटणार आहे. आम्हीं तिच्यांतून जावयाचें ठरवलें आहे. व्हेनिसजवळील 'मुरानो' या गांवांत जगप्रसिद्ध व्हेनिशियन कांचेचा कारखाना दाखविण्यांत येणार आहे. नंतर 'बुरानो' नांवाचें एक कोळ्यांचें गांव (Fishing Village) आम्ही पहाणार आहोंत. शेवटचा कार्यक्रम 'टोर्सेल्लो' पहाणें हा आहे. 'टोर्सेल्लो' येथें रोमन काळच्या देवळांचे कांहीं अवशेष आहेत.

मुरानो येथील 'पावली आणि कंपनी'चा कांचेचा कारखाना प्रेक्षणीय आहे. आमच्या डोळ्यांसमोर तेथील कामगारांनीं कांचेचीं रंगी-बेरंगी फुलपात्रें हां हां म्हणतां करून दाखविलीं. कांचेच्या निरनिराळ्या वस्तु अतिशय सुंदर आहेत.

'बुरानो' हें कोळ्यांचें गांव मोठें मासलेवाईक आहे. हें गांव पाहि-ल्यावर हिंदी कोळी काय आणि इटालियन कोळी काय, कोळी आणि त्यांची रहाणी इथून तिथून सारखीच याबद्दल माझी पुरेपुर खात्री पटली. रशिदाची रंगीबेरंगी रेशमी साडी पहाण्याकरितां नुसते पोरांचेच नव्हे तर मोठ्या स्त्रीपुरुषांचेसुद्धां घोळकेच्या घोळके आमच्या मागून फिरताहेत! गांवांत एखादा चमत्कारिक प्राणी यावा आणि त्याला बघायला गर्दी जमावी तसा प्रकार रशीदाच्या रंगीत साडीमुळें इथें झाला आहे! आतां पोलीसला मध्यें पडून ही गर्दी हटवावी लागते कीं काय, याची मला काळजी वाटते! मला आणि महमूदला मात्र इतकी लाज वाटली कीं, आम्ही हळूच या गर्दीतून निसटलों आणि रस्त्याच्या बाजूनें चालूं लागलों.

रशीदाला मजा वाटते या प्रकाराची. ती त्या पोरांबरोबर हंसते–खिदळते आहे. एक इटालियन बाई धांवत धांवत घरीं जाते आणि रशीदाची साडी दाखवण्याकरितां दुसरीला घेऊन येते ! इटालियन झाल्या तरी त्या बायकाच ना ! त्यांना वाटणारें कौतुक मोठें पहाण्यासारखें आहे. ठिगळें लावलेल्या निळ्याकाळ्या तुमानी घातलेले हे राकट पुरुष, काळे झगे घातलेल्या आणि डोक्याला लालहिरवीं फडकीं बांधलेल्या या गरीब इटालियन स्त्रिया आणि त्यांचीं तीं उघडींवागडीं गुटगुटीत मुलें यांच्या त्या अकृत्रिम, भाबड्या वागणुकीचा राग येणें मात्र शक्य नाहीं.

* * *

## ता. ४ मे–

### *निश्वास पूल आणि लॉर्ड बायरन !–जगप्रसिद्ध 'लिडो'.*

आज व्हेनिस सोडायचा आमचा विचार होता. पण आणखी एक दिवस रहावयाचें आम्हीं ठरविलें आहे.

सकाळीं डोजचा इतिहासप्रसिद्ध राजवाडा पहावयाला आम्हीं गेलों. हा राजवाडा चारशें वर्षांचा जुना आहे. त्याच्या प्रचंडपणाची कल्पना इटालियन शिल्पकलेचे नमुने पाहिल्याशिवाय यावयाची नाहीं. आंतला एकएक दिवाणखाना नजर ठरत नाहीं एवढा लांबरुंद आहे आणि आंतल्या भिंतीवरील अचाट लांबीरुंदीची चित्रें टिशियन, पावलो व्हेरोनिसा, टिंटोरेटो वगैरे इतिहासांत अमरपद मिळवलेल्या थोर कलावंतांनीं काढलेलीं आहेत. तिथें काम करीत असलेला अस्खलित इंग्रजी बोलणारा एक इटालियन अधिकारी आपण होऊन आमच्याबरोबर वाटाड्याचें काम करावयाला आला. हा मनुष्य मोठा बुद्धिवान आणि बहुश्रुत दिसतो. मनांतून हा फॅसिस्टविरोधी असावा याबद्दल माझी खात्री झाली. अर्थात् मुसोलिनीच्या इटालींत तो उघड तसें बोलणें शक्य नाहीं. " उद्यां महायुद्ध झालें तर कलेचे हे अमोल नमुने बॉंबच्या माऱ्याखालीं बेचिराख होऊन जातील." तो दुःखानें म्हणाला, "स्पेनकडेच पहा ना." त्याला खिजवण्याकरितां मी मुद्दाम म्हणालों, "स्पेन कशाला, ॲबिसीनियाकडेच पहा ना !' आपले गंभीर डोळे त्यानें माझ्यावर रोखले आणि स्मित करून तो म्हणाला,

"त्या बाबतींत तुमच्यासारखंच माझं मत आहे!" मी त्याचा अर्थ समजलों. आमच्या हिंदुस्थानच्या सरहद्दीवर इप्पीच्या फकिरानें चालविलेली बंडाळीहि त्याला माहीत होती, असें दिसलें. हा इप्पीचा फकीर कोण, म्हणून त्यानें आम्हांला विचारलें. ती बंडाळी हिंदी लोकांनीं चालविलेल्या स्वातंत्र्याच्या युद्धाचाच एक भाग असावा, अशी त्या बिचाऱ्याची कल्पना होती. आम्हीं त्याला खरी वस्तुस्थिति सांगितली. सरहद्दीवरील बंडाळी मोडण्याकरितां ब्रिटिश सरकार विमानांतून बॉंबचा वर्षाव करतें याचा त्यानें निषेध केला.

हा राजवाडा पाहिल्यानंतर त्याला लागून असलेला सुप्रसिद्ध 'निःश्वास पूल' ( Bridge of sighs ) आम्हीं पाहिला. राजवाडा आणि त्याला लागून असलेला इतिहासप्रसिद्ध भयानक बंदीखाना यांना हा पूल जोडतो. 'डोज्'नें एखाद्या दुर्दैवी कैद्याला शिक्षा दिली कीं या पुलावरून त्याला कैदखान्याच्या कोठडींत नेण्यांत येत असे आणि त्या भयंकर काळोख्या कोठड्यांत गेलेला कैदी पुन्हा कधींच परत येत नसे, हें सांगावयास नकोच. असल्या हजारों दुर्दैवी प्राण्यांचे उष्ण निःश्वास या पुलानें ऐकले असतील. या पुलाचें नांव खरोखरच अन्वर्थक आहे. वाटाड्यानें या कैदखान्याच्या तळघरांतील एक भयानक खोली आम्हांला दाखविली. 'शिलॉनचा कैदी' हें आपलें प्रसिद्ध काव्य लिहिण्यापूर्वी कैद्याला अशा कोठडींत कसें वाटत असेल तें अनुभवण्याकरितां प्रख्यात इंग्लिश कवि लॉर्ड बायरन् या खोलींत येऊन दोन दिवस राहिला होता असें म्हणतात.

आज दुपारीं एका हंगेरियन हॉटेलांत मी जेवायला गेलों. 'मेन्यू—कार्ड'वर 'गुलाश' असें एका पदार्थाचें नांव पाहिलें. माझ्या हिंदी कानांना हें नांव जरा जवळचें वाटलें म्हणून तो पदार्थ मी मागवला. आमच्या कोंकणी पद्धतीनें बटाटे घालून जसें चवदार आणि खमंग मटन तयार करतात तशा तऱ्हेची ही हंगेरियन डिश होती. प्रत्येक मांसाहारी हिंदी गृहस्थाला युरोपमध्यें ही हंगेरियन डिश खाण्याची मी शिफारस करतों. त्याला हिंदुस्थानांतल्या आपल्या घरच्या जेवणाची आठवण होईल. हंगेरियन भाषासुद्धां संस्कृत आणि इतर हिंदी भाषांच्या

बरीचशी जवळची आहे म्हणतात. तें कांहीं असो, पण 'गुलाश' मात्र घरच्या मटनाची आठवण करून देतो !

संध्याकाळीं व्हेनिसमधला जगप्रसिद्ध 'लिडो' पहायला आम्ही गेलों. या युरोपियन लोकांची जाहिरातबाजीच फार ! या 'लिडो'ची कीर्ति मी हिंदुस्थानांतसुद्धां ऐकत होतों. आमच्या जुहूच्या समुद्रकिनाऱ्याच्या एकदशांशसुद्धां हा समुद्रकिनारा नाहीं. रंगीबेरंगी कपडे चढवून शेंकडों अर्धनग्न स्त्रीपुरुष इथें पोहावयाला आणि बुचकळायला येतात ही गोष्ट मात्र खरी.

या किनाऱ्याच्या एका बाजूला जाळें टाकून कांहीं इटालियन कोळी मासे मारीत होते. जाळें ओढण्याची त्यांची तऱ्हा मात्र मोठी मजेदार आहे. प्रत्येकाच्या कमरेला एक 'हूक' असतो, त्याला ती लांबच लांब दोरी प्रत्येकजण अडकवतो. आणि मग रांगेनें एकामागें एक उभा राहिलेला प्रत्येकजण एकएक पाऊल मागें टाकतो. अशा तऱ्हेनें कमरेच्या जोरानें जाळे बाहेर ओढलें जातें.

'लिडो'च्या आजूबाजूचा व्हेनिस शहराचा भाग अत्यंत आधुनिक आहे. रस्त्यांत मधूनमधून फुलझाडांचे ताटवे आहेत. तिथें लावलेल्या पाट्या मला लक्षांत ठेवण्यासारख्या वाटल्या. आमच्याकडल्या सार्वजनिक बगीच्यांतल्या पाट्या मगरूरपणें लोकांना दरडावीत असतात, कीं 'फुलझाडांना हात लावणारांना ५० रुपये दंड ठोकला जाईल !' वगैरे. या इटालियन पाट्या मोठ्या लीन आणि काव्यात्मक भाषेंत लिहिलेल्या आहेत. 'Ripetate Le Plante' एवढींच अक्षरें त्यावर लिहिलेलीं असतात. 'Respect the Plants' (फुलझाडांना आदबीनें वागवा !) किती गोड आणि लाडिक हुकूम !

* * *

## ता. ५ मे—

### *व्हेनिस ते व्हिलोबें प्रवास.*

आज मी लंडनला जायला निघणार. महंमूद आणि रशिदा आज सकाळीं ८-१८ च्या गाडीनें व्हिएन्नास जावयास निघालीं. माझी व्हेनिस—पॅरिस—लंडन गाडी ११-४५ ला सुटणार. पॅरिसपर्यंत डॉ. फिलिप माझ्याबरोबर आहेत; पण आतां यापुढचा प्रवास एकट्यानें करावा लागणार, त्यामुळें मला अगदीं खिन्न वाटत आहे. बोटबसमधून १०-३० ला आम्ही व्हेनिस स्टेशनकडे जावयास निघालों. बरोबर ११-४५ ला आमची गाडी सुटली. इटालियन आगगाडीचे डबे यथातथाच आहेत. पण इकडला तिसरा वर्ग आमच्या दुसऱ्या वर्गाइतका चांगला आहे. त्याचप्रमाणें प्रत्येक जागेला नंबर आहे. त्यामुळें उगाच गर्दी होणार नाहीं.

दुपारीं चार वाजतां सुप्रसिद्ध मिलान् स्टेशनांत आमची गाडी आली. इटालियन्स मिलान् शहराला 'मिलानो' म्हणतात. स्टेशन खूप मोठें आहे. पण धुरानें आणि कोळशाच्या धुळीनें सर्व काळवंडून गेलें आहे. वाटेंत पादुआ, व्हेरोना वगैरे स्टेशनें लागलीं, तेव्हां शेक्सपियरच्या नाटकांची मला आठवण झाली. शेक्सपियरच्या नाटकांत या शहरांचीं नांवें लहानपणीं वाचतांना या शहराजवळून मी प्रत्यक्ष कधीं जाईन अशी माझी कल्पनाहि नव्हती! लहानपणच्या इच्छा आणि आकांक्षा आतां अशा तऱ्हेनें पुऱ्या होत असतां कांहीं चमत्कारिक भावनांनीं अंतःकरण भरून जातें.

इटलीमध्यें सृष्टिसौंदर्याबद्दल अत्यंत प्रसिद्ध असलेल्या 'लेक गार्डा' आणि 'लेक माजोरी' या प्रदेशांतून आमची गाडी जात आहे. अत्यंत सुपीक असा इटलीचा 'लोंबार्डी' प्रांत तो हाच. 'लेक गार्डा' आणि 'लेक माजोरी' हीं मैलच्या मैल लांब पसरलेलीं दोन मोठीं थोरलीं सरोवरें आहेत. दोन्ही बाजूंनीं दिसणारा निसर्गाचा देखावा अवर्णनीय आहे. दूरवर शुभ्र हिमाच्छादित आल्प्स पर्वताच्या रांगा दिसताहेत. सरोवरांमधल्या लहानलहान चिमुकल्या बेटांवर श्रीमंत लोकांच्या टुमदार बंगल्यांचे पुंजके दिसताहेत. सरोवराच्या नीलवर्ण पाण्यावर आणि आल्प्सच्या

हिमवेष्टित उत्तुंग शिखरांवर जर्द पिवळा सूर्यप्रकाश खेळत असल्यामुळें या सर्व देखाव्याला एक प्रकारची अद्भुतरम्यता आली आहे.

संध्याकाळीं ७-३० ला आम्ही 'डोमोडोसोला' येथें पोंचलों. इटलीची सरहद्द येथें संपते. आतां आम्ही स्वित्झर्लंडमध्यें शिरणार. आमच्या गाडीचे पार्शीसारखे दिसणारे बावळट इटालियन गार्ड, कंडक्टर वगैरे अधिकारी जाऊन त्यांच्या जागीं अधिक गोरे, अधिक तरतरीत आणि अधिक रुबाबदार दिसणारे स्विस रेल्वे नोकर आतां आले आहेत. खंडाळ्याच्या घाटांतून जातांना गाडी जशी अगदीं डोंगराजवळून जाते, तशी आमची गाडी आतां स्विस आल्प्सूच्या जवळून जात आहे. मे महिना असल्यामुळें अगदीं पायथ्यापर्यंत आल्प्स् पर्वतावर हिम दिसत नाहीं. पण माथ्यावर शुभ्रसफेत हिमाचे थर आहेत. इतक्या जवळून हिम पहातांना मला मोठी मजा वाटते. शिखरावर पांढरें बर्फ आणि खालीं काळी–पिवळी माती यांमुळें बटाटे–पोह्यांवर कातलेलें खोबरें टाकलें म्हणजे जसा देखावा दिसतो तसा आल्प्स् दिसतो आहे ! मला नीट आठवत नाहीं, पण तात्यासाहेब केळकरांनीं असेंच कांहींतरी वर्णन केलें होतें.

युरोपियन मुत्सद्यांच्या वेळोवेळीं होणाऱ्या परिषदांमुळें ज्या शहरांना महत्व आलें आहे अशीं स्ट्रेसा, मॉंत्रू, लोझान वगैरे स्वित्झर्लंडमधलीं स्टेशनें एकामागून एक आम्हांला लागत आहेत. वर्तमानपत्रांत हीं नांवें मी वाचीत असें तेव्हां काय माझ्या कल्पना असत ! प्रत्यक्ष पहातों आहे तों खंडाळा–लोणावळ्यासारखीं हीं लहान लहान स्टेशनें पाहून कांहींच वाटत नाहीं. मॉंत्रू स्टेशनांत गाडी उभी राहिली तेव्हां मला आठवण झाली, कीं इजिप्तचे नहासपाशा युरोपियन राष्ट्रांच्या प्रतिनिधींशीं 'कॅपिच्युलेशन्स'बद्दल खलबतें करण्याकरितां सध्यां मॉंत्रू येथें आलेले आहेत. आल्प्स् पर्वतांवर वसलेलीं हीं लहानलहान गांवें रात्रीच्या वेळीं अतिशय सुंदर दिसतात. काळोखामध्यें ठिकठिकाणीं डोंगरांवर रंगीबेरंगी दिवे लुकलुकतांना दिसतात आणि त्या दिव्यांचीं प्रतिबिंबें डोंगराच्या पायथ्याशीं असलेल्या सरोवराच्या प्रशांत पाण्यावर तरळत असतात.

एका लहानशा स्विस स्टेशनावर हातगाडीवरून सँडविच विकणाऱ्या एका पोराला मीं बोलावलें. तो स्विस पोरगा इंग्लिश सुंदर बोलत होता.

सँडविच विकत घेतल्यावर कांहींतरी विषय काढून माझ्याबरोबर तो बोलत उभा राहिला.

" Are you from India, sir ? (आपण हिंदुस्थानचे काय !)" त्यानें मला विचारलें.

मी 'हो' म्हणालों तेव्हां "एखादं हिंदी नाणं तुमच्या खिशांत असेल तर मला द्या !" म्हणून तो मला सांगू लागला. " मला निरनिराळ्या देशांतलीं नाणीं जमविण्याचा नाद आहे, तेव्हां तुम्ही हिंदुस्थानचं एखादं नाणं मला द्याल, तर तुमचे माझ्यावर अतिशय उपकार होतील." तो म्हणाला. थोड्याशा चवल्या, पावल्या आणि पैसे होते. ते बाहेर काढून " तुला यांतलं काय पाहिजे तें घे " म्हणून त्याला मीं सांगितलें. त्यानें पैसा पसंत केला. तो म्हणाला, " यावरची राजाची छबी छान आहे."

रात्रीं ११–४० ला आम्ही ' व्हिलोर्बे ' येथें पोंचलों. स्वित्झर्लंडची सरहद्द संपून येथें फ्रेंच हद्द सुरू झाली. रात्रीच्या वेळीं या सरहद्दी आल्या कीं मोठा त्रास होतो. कस्टमच्या अधिकाऱ्यांना सर्व बॅगा वगैरे झोंपेंतून उठून उघडून दाखवाव्या लागतात.

* * *

## ता. ६ मे—

*फ्रेंच लोक म्हणजे गडकऱ्यांचे धुंडिराज !—आंग्ले—फ्रांसे—आलेमाने—इतालियानो !—आहे खरी ' इंग्लिश वेदर ' !—चाफेकर टॅक्सीवाले !—ह्या लंडनच्या इमारती धुरकटलेल्या कां ?*

सकाळीं ७–५० ला गार दु लिऑं या पॅरिसमधल्या स्टेशनावर आम्ही येऊन पोंचलों. या स्टेशनवरून लंडनची गाडी पकडण्याकरितां गार दु नॉर्द या पॅरिसमधल्या दुसऱ्या स्टेशनावर मला टॅक्सीनें गेलें पाहिजे. नॉर्द स्टेशनावरून गाडी १०–४० ला सुटावयाची आहे. इंग्लिश खाडी ओलांडून लंडनला जायचे तीन मार्ग आहेत. कॅले—डोव्हर, बुलॉं—फोक्स्टन् आणि दिएप्पे—न्यू हॅवन. पैकीं ही गाडी बुलॉं येथें जायची आहे. खाडी ओलांडून मी फोक्स्टन येथें पोंचणार. तेथें लंडनला जाणारी गाडी उभीच असते.

८-१५ च्या सुमाराला मी नॉर्द स्टेशनावर येऊन पोंचलों. गाडीला अजून दोन तास अवकाश आहे, या समजुतीनें क्लोकरूममध्यें सामान ठेवावयाचें आणि स्टेशनमधल्या सलूनमध्यें दाढी वगैरे करून भरपूर ब्रेक-फास्ट घ्यावयाचा असा पोक्त विचार मीं केला होता. फ्रेंच पोर्टरला 'मला लंडनला जायचं आहे' हें 'लॉंद्र' 'लॉंद्र' हा मला माहीत असलेला एकुलता एक फरेंच शब्द पुनःपुन्हा उच्चारून मीं मोठ्या प्रयासानें समजावून सांगितलें. तेव्हां तो सरळ माझें सामान घेऊन प्लॅट-फॉर्मकडे जाऊं लागला. लंडनची गाडी उभी आहे तेव्हां गाडींतच सामान नेऊन ठेवतों, असें खुणेनें त्यानें मला सांगितलें. मीहि त्याच्या-मागून गेलों. पहातों तों गाडी खरोखरच उभी होती. १०-४०ला सुटणारी गाडी ८-१५ ला स्टेशनांत उभी कां, तें मला कळेना ! आणखी पुन्हां चांगली माणसांनीं गजबजलेली ! हे फ्रेंच लोक गडकऱ्यांच्या धुंडिराजा-सारखे तीन तास आधीं स्टेशनवर येऊन बसतात कीं काय ! या पोर्टरला माझें बोलणें न समजल्यामुळें हा भलत्याच गाडींत माझें सामान ठेवतो आहे कीं लंडनच्या गाडीची वेळ बदलली? मी कमालीचा भांबावून गेलों!

शेवटीं गाडींतल्या एका म्हातारीला, फ्रेंच गार्डाला, आणखी एका-दोघांना जीवाची आटापीट करून खुणा केल्या आणि खात्री करून घेतली, कीं ती गाडी बुलॉंलाच जायची आणि तिची सुटायची वेळ ८-३७ आहे ! दोनतीन दिवस आधीं 'समर टाइम टेबल' सुरू झाल्यामुळें १०-४० च्या गाडीची वेळ ८-३७ झाली होती ! घड्याळांत पहातों तों ८-३० झाले होते. अजून सात मिनिटें आहेत या विचारानें स्टेशनमधल्या वृत्तपत्रांच्या स्टॉलवर जाऊश 'डेली मेल' हें इंग्लिश पत्र विकत घेतलें आणि माझ्या डब्याच्या दाराजवळच तें चाळीत उभा राहिलों. कांहीं वेळानें पहातों तीं गाडी एकदम हालूं लागली ! चट्‌दिशीं उडी मारून मला गाडींत चढावें लागलें.

आमच्याइकडल्या गाड्यांप्रमाणें या युरोपियन गाड्या सुटतांना गार्डाची शिटी नाहीं, गाडीचा भोंगा नाहीं कीं उतारूंची धांदल नाहीं ! ८–३७ वर कांटा गेल्याबरोबर गाडी आपली संथपणें चालूं लागली. माझ्याखेरीज बाकी सर्व उतारू वेळेच्या आधीं एकदोन मिनिटें बरोबर

आंत जाऊन बसलेले होते. अलिबागच्या एखाद्या पाहुण्याची मुंबईत पहिल्याच दिवशीं जशी धांदल होते, तशीच पॅरिसमध्यें माझी पहिल्या दिवशीं फजीती व्हावी असा योग होता असें दिसतें ! दाढी बोटभर वाढलेली, पोटांत चहा-कॉफीचा एक थेंब नाहीं आणि फ्रेंच भाषेचा गंध नसल्यामुळें चेहेरा बावरून गेलेला, अशा थाटांत आमची स्वारी पॅरिस—बुलॉं एक्स्प्रेसमध्यें जाऊन बसली.

थर्डक्लासच्या डब्यांत सुंदर गादीच्या जागा असून एकएका बांकावर दोनदोनच माणसें बसावयाची सोय आहे. माझ्या शेजारीं पंध्रा—सोळा वर्षांची एक गुटगुटीत फ्रेंच मुलगी बसली आहे आणि एक क्षणहि फुकट न घालवतां ती सारखी लोंकरीचें वीणकाम करते आहे. माझ्यासमोरच एक अत्यंत सुस्वभावी चेहेऱ्याची म्हातारी फ्रेंच बाई बसली असून तिच्या मांडीवर एक भला मोठा वेताचा पेटारा आहे. त्या पेटाऱ्यांत आहे तरी काय, त्याची मला जिज्ञासा आहे. गाडी चालू झाल्यावर थोड्याच वेळानें माझी जिज्ञासा पुरी झाली. त्या बाईनें हळूच पेटाऱ्याचें झांकण उघडलें आणि त्यांतून गुबगुबीत, काळ्या कुळकुळीत मांजरांचीं तीन काळीं पिल्लें बाहेर पडलीं !

माझ्या आजूबाजूला बसलेल्या आणि निरनिराळ्या स्टेशनांत नवीन येणाऱ्या या फ्रेंच स्त्रीपुरुषांना पाहून एकंदर फ्रेंच लोकांविषयीं माझें मत फारच चांगलें झालें आहे. या साऱ्या गोऱ्या लोकांत मी एकटाच निराळ्या रंगाच्या कातडीचा मनुष्य आहे; पण एकहि स्त्री किंवा पुरुष मी कुणीतरी निराळा आहें म्हणून माझ्याकडे टवकारून किंवा पुनःपुन्हा पहात नाहीं. त्यांच्याचपैकीं मी एक कुणीतरी आहें अशा तऱ्हेनें ते हंसतांखिदळतांना किंवा बोलतांना ते माझ्याकडे पहात आहेत. मला हा फरक एकदम वाटावयाचें कारण असें, कीं इटलींतील लोकांचा या बाबतींत मला फार राग येत असे. किती वेळां ते तुमच्याकडे रोंखून पहातील ! किती वेळां ते पुनःपुन्हा वळून पहातील. सहजिक जिज्ञासा हाच तसें पहाण्यांत त्यांचा हेतु असतो हें खरें आहे; पण असें पुनःपुन्हा पहाणें हें असभ्यपणाचें लक्षण आहे असें मला वाटतें. अशा पाहण्यानें परकीय किंवा नवख्या माणसाला चमत्कारिक वाटेल, असें आपण करतों. हा चमत्कारिकपणा या फ्रेंच लोकांत मला मुळींच वाटत नाहीं.

दुसरी एक गोष्ट मला अत्यंत महत्वाची वाटते. कितीतरी तरुण, मध्यमवयस्क फ्रेंच बाया निरनिराळ्या स्टेशनांवर माझ्या डब्यांत चढताहेत आणि उतरताहेत; पण फ्रेंच लोकांविषयीं, चैन करण्याकरितां युरोपला जाऊन आलेले आमचे प्रवासी मोठमोठीं रसभरित वर्णनें देऊन आमची जशी कल्पना करून देतात, तशी रंगेल आणि छचोर एकहि फ्रेंच बाई येथें दिसत नाहीं. एकीच्याहि ओंठांना अगर गालांना रंग लावलेला नाहीं. फार काय—आणि हें कुणाला खरेंसुद्धां वाटणार नाहीं—यांपैकीं बहुतेक बायांचे केंस ' बॉब ' केलेले नसून आमच्या घरगुती बायकांसारखे चांगले लांबलचक आहेत आणि हिंदी बायकांसारखेच मधोमध भांग पाडून मागें आंबाड्यासारखे बांधलेले आहेत. अगदीं हिंदु बायकांप्रमाणें नव्हे, पण जरा सैल आणि साधारणपणें त्याच पद्धतीनें बांधलेले. त्यांवर हॅट असते ही गोष्ट वेगळी. आणि आमच्याकडे फ्रेंच लोकांची आणि त्यांतल्या त्यांत फ्रेंच बायकांची काय बदनामी करतात ! पॅरिसमधल्या एखाद्या कुप्रसिद्ध रस्त्यावरून फिरायचें आणि तिथें फिरत असलेल्या फ्रेंच बाजारबसव्यांना पाहून फ्रान्समधल्या स्त्रीवर्गाविषयीं मतें ठोकून द्यावयाचीं ! एखादा युरोपियन प्रवासी मुंबईत फोरास रोडवर फेऱ्या मारून मुंबईतल्या हिंदु स्त्रियांबद्दल जर आपलें मत देऊं लागला तर तें जितकें अन्याय्य होईल, तितकेंच हें अन्याय्य नाहीं काय ?

गेल्या महायुद्धाच्या वेळीं फ्रेंच रणभूमीवरील ज्या गांवांचीं नावें मी वाचीत होतों तीं आमिॲं, नोयल्ल वगैरे स्टेशनें एकामागून एक लागत आहेत.

एकदोन तास विणकाम केल्यानंतर माझ्या शेजारीं बसलेल्या फ्रेंच मुलीनें आपलें विणकाम काळजीपूर्वक पेटींत ठेवून दिलें आणि माझ्याकडे वळून फ्रेंचमध्यें तिनें कांहींतरी विचारलें. दोनतीन चिमण्या माझ्या कानाकडे एकदम चिवचिवल्यासारखा मला भास झाला ! मीं तिला खुणेनें 'जरा थांब' म्हणून सांगितलें आणि माझ्या ओव्हरकोटाच्या खिशांत हात घातला. ती आश्चर्यानें माझ्याकडे पहातच राहिली. ओव्हरकोटाच्या खिशांतून 'टूरिस्ट गाइड' हें पुस्तक मीं बाहेर काढलें. त्यांत प्रत्येक इंग्रजी वाक्यासमोर त्याच अर्थाचें फ्रेंच, जर्मन आणि इटालियन वाक्य दिलेलें

आहे. ' I can't speak French, I speak English ' या वाक्यासमोरील फ्रेंच वाक्यावर बोट ठेवून पुस्तक मीं तिच्या समोर धरलें! तिला हंसूं आलें; पण तें पुस्तक पाहून तिला मोठें कौतुक वाटलें. त्या पुस्तकांत प्रत्येक वाक्य इंग्लिश, फ्रेंच, जर्मन आणि इटालियन भाषेंत लिहिलेलें आहे हें पाहून तिला इतका आनंद झाला, कीं तें पुस्तक उलटें सुलटें चाळीत ती स्वतःशींच 'ॲंग्ले–फ्रांसे–आलेमाने–इतालिआनो' हे शब्द पुनःपुन्हा उच्चारीत होती आणि कांहींतरी मजेदार खेळणें मीं तिला दिलें आहे अशा तऱ्हेनें मधूनमधून ती माझ्याकडे पहात होती. तें पुस्तक बंद करून माझ्याकडे देतांना पुन्हा एकदां मंजुळ फ्रेंच शब्दांची फैर झाडून मला तिनें कांहींतरी विचारलें. मला फ्रेंच येत नाहीं, हें सांगण्याकरितां मीं तें पुस्तक बाहेर काढलें होतें, हें ती विसरली! मीं गंभीरपणानें त्या पुस्तकांतल्या त्याच वाक्यावर पुन्हा बोट ठेवलें आणि तिला दाखवलें. तेव्हां मात्र ती लाजल्यासारखी झाली.

आतां आमची गाडी झपाट्यानें बुलॉंजवळ जात आहे. आजू-बाजूचा देखावा अगदींच रूक्ष वाटतो. रेताड जमीन आणि झाडझुडुप कांहींएक नसलेले उघडेबोडके डोंगरांचे कडे जिकडे तिकडे दिसताहेत. बरोबर १२–३०ला बुलॉं स्टेशनांत उतरलों. बुलॉं–फोक्स्टन बोट दोन वाजतां सुटावयाची आहे. प्लॅटफॉर्मच्या पलीकडल्या बाजूलाच बोटीचा धक्का आहे.

बरोबर दोन वाजतां आमच्या बोटीनें फ्रान्सचा किनारा सोडला. आमच्या कोंकणच्या बोटीएवढी साधारण ही बोट आहे. बुलॉं सोडतांना हवा स्वच्छ असून प्रखर ऊन पडलें होतें. पण इंग्लिश खाडींत थोडेंसें दूर गेलों नाहीं तोंच 'इंग्लिश वेदर' सुरू झाली. आकाश ढगाळ होऊन सूर्य झांकला गेला आहे. थंडगार सोसाट्याचे वारे सुटल्यामुळें समुद्र खवळून बोट वाटेल तशी हालते आहे. युरोपियन 'थंडी' 'थंडी' जी म्हणतात तिचा इंगा इटली किंवा फ्रान्समध्यें मला कळला नव्हता, तो आत्तां चांगलाच कळतो आहे. जणुं काय हाडें फोडून थंडी जाते आहे. बुटांतल्या बुटांत पाय आंखडून जाताहेत. नाकातोंडांतून सुटणाऱ्या श्वासांच्या गोठलेल्या वाफा प्रत्यक्ष डोळ्यांना दिसताहेत. आहे खरी इतर युरोपपेक्षां इंग्लंडची हवा और!

दुपारीं ३–३० ची वेळ झाली आहे. फोक्स्टन्‌-इंग्लंडचा किनारा समोर स्पष्ट दिसतो आहे. इंग्लंड ! हेंच तें इंग्लंड ! किती परस्परविरोधी भावनांनीं माझें अंतःकरण थरारून जात आहे. इतिहासांत, भूगोलांत लहानपणापासून ज्या इंग्लंड देशाची महति आणि वर्णनें वाचलीं, तो इंग्लंड देश पहाण्याचें अपरंपार कुतूहल आणि ज्या या एवढ्याशा, ढगाळ, धुरकट-लेल्या देशाच्या दास्यांत आमचा अफाट हिंदुस्थान देश शतक दीड शतक खितपत पडला आहे, त्या इंग्लंडला पहिल्यांदा पहातांना वाटणारा उद्वेग, अशा अनेक संमिश्र भावनांचा एकच कल्लोळ माझ्या हृदयांत उडाला आहे. समोर फोक्स्टनच्या किनाऱ्यावरचे उघडे बोडके रूक्ष डोंगर आणि फोक्स्टन्‌ गांवांतलीं छपरावर तीनतीन चारचार छोटींछोटीं धुरांडीं असलेलीं, धुरकटलेलीं, तांबड्या विटांचीं मासलेवाईक इंग्लिश घरें दिसताहेत. सर्वच वातावरण कुंद, काळवंडलेलें, धुरकट. आमच्यावर डौलानें राज्य करणाऱ्या इंग्रजांचा हाच का इंग्लंड देश ! या आणि अशाच प्रकारच्या विचारांच्या धुंदींत मीं इंग्लंडच्या किनाराऱ्यावर पाय ठेवला.

बोटीच्या धक्यालाच लागून फोक्सटन्‌ स्टेशनचा प्लॅटफॉर्म आहे. गुळगुळीत, मंजुळ इटालियन आणि फ्रेंच शब्द कानांतल्या कानांत विरून जाऊन आतां ठसक्यांत बोलल्या जाणाऱ्या इंग्रजी भाषेंतले परिचित पण कठोर मगरूर शब्द कानांवर पडताहेत. अर्थात्‌ इतका वेळ शब्दांच्या माऱ्याखालीं गुदमरून गेलेल्या माझ्या जिवाला हे परिचित शब्द ऐकून कितीतरी मोकळें वाटतें आहे.

कस्टम आणि पासपोर्ट वगैरेची माझी तपासणी विशेष कसोशीनें करण्यांत आली. कस्टमचे अधिकारी किंवा पासपोर्ट तपासणारे पोलीस अधि-कारी अत्यंत सौजन्यानें माझ्याशीं बोलत होते. पण इतर सर्व उतारूंना—यांत म्हैसूरचे कांहीं हिंदी लोकहि होते—भराभर सोडून देण्यांत आलें असूनहि मला खड्यासारखें बाजूला काढण्यांत आलें आणि माझ्याविषयीं विशेष काळजी दाखविण्यांत आली. असें कां तें मला सांगतां येत नाहीं. इंग्लंडमधल्या एका मित्राला देण्याकरितां त्याच्या घरच्या मंडळींनीं माझ्यापाशीं हालव्याचें एक पार्सल दिलें होतें. तें फोडून दाखविण्याचा

कस्टम अधिकाऱ्यानें हट्ट धरला. मीं त्याला तें उघडून दाखवलें आणि ' आतां मला उघडायला लावलंच आहेस, तेव्हां यांतला थोडा हलवा तूं खा ' म्हणून त्यांतला थोडा हलवा मीं पुढें केला. तो हंसला आणि ' थँक यू ' म्हणून नको म्हणाला !

पासपोर्ट तपासतांना स्कॉटलंड यार्डच्या दोघां अधिकाऱ्यांनीं मी इंग्लंडला कशाला आलों, कुठें कुठें जाणार, कुठें राहणार इत्यादि नाना प्रश्न विचारले आणि माझीं उत्तरें टिपून घेतलीं. आधींच मी प्रवासानें दमलों होतों आणि खूप कंटाळलों होतों. शेवटीं इंग्लंडमध्यें मी नक्की किती दिवस राहणार असा प्रश्न त्यानें मला विचारला असतां मी चिडून ' It depends on how I like England ! ' म्हणून उत्तर दिलें. तेव्हां तो हंसला आणि माझे आभार मानून मला त्यानें सोडून दिलें.

इंग्लिश हमाल मात्र मोठे हुषार आणि अत्यंत अदबीनें वागणारे दिसले. कंपार्टमेंटमध्यें माझें सामान ठेवल्यावर त्या इंग्लिश हमालाला ' किती पैसे देऊं ? ' म्हणून जेव्हां मीं विचारलें, तेव्हां मोठ्या अदबीनें तो म्हणाला, " I leave it to you, sir ! " माझ्याकडे सुटे पैसे नव्हते. " दहा शिलिंगांची एक नोट मोडून आणशील का ? " म्हणून त्याला मीं विचारलें. तो ' हो ' म्हणाला. आणि गर्दीत चुकामूक होऊं नये म्हणून आपल्या दंडावरचें नंबराचें बकल माझ्या हातीं देऊन नोट घेऊन तो सुटे पैसे आणावयाला गेला. नोट मोडून आणण्यांत मात्र त्यानें आपलें 'इंग्रजी' डोकें लढवलें. चार हाफ क्राऊन म्हणजे अडीच अडीच शिलिंगाचीं चार नाणीं घेऊन तो आला. मीं कितीहि कमी द्यायचें ठरवलें तरी कमींत कमी अडीच शिलिंग म्हणजे दीडदोन रुपये मीं द्यावे याची त्यानें चोख व्यवस्था केली होती! बोलतांना मोठ्या झोकांत ' I leave it to you, sir ' तो म्हणाला; पण नोट मोडतांना त्या इंग्लिश बच्चानें अडीच शिलिंग मिळतील याची बरोबर काळजी घेतली. गोड बोलून आपला कार्यभाग व्यवस्थित साधून घ्यावयाचा या व्यापारी इंग्रज जातीच्या स्वभावाचा हा उत्कृष्ट नमुना इंग्लंडच्या किनाऱ्यावर पाय ठेवतांच मला भेटला म्हणावयाचा !

चार वाजतां गाडीनें फोक्स्टन् स्टेशन सोडलें. इंग्लिश गाडीचा

थर्डक्लास आमच्या फर्स्ट क्लासइतका सुखसोयींनीं युक्त आहे. मखमलीनें मढवलेल्या गादीचीं बाकें, प्रत्येक बांकासमोर चहा वगैरे पिण्याकरितां सुंदर टेबल—सर्व सोयी तिसऱ्या वर्गांत आहेत. मी खिडकीकडेला बसून इंग्लंडची नमुनेदार वनश्री पहातों आहे. सूर्य बाहेर येऊन कोंवळें ऊन पडलें आहे आणि बाजूचा देखावा अत्यंत आल्हाददायक आहे. शुभ्र सफेत मोहोरानें भरगच्च भरून गेलेल्या 'चेरी'च्या झाडांच्या रांगाच्या रांगा दोन्ही बाजूंना दिसताहेत. रेखीव हिरवींगार चिमुकलीं इंग्लिश शेतें, त्यांत मधूनमधून दिसणारीं लाल विटांचीं टुमदार घरें, हा सुंदर रेखीव देखावा फ्रान्स किंवा स्वित्झर्लंडमध्येंसुद्धां दिसत नाहीं. कीट्स्, शेले, वर्ड्स्वर्थला मोहून टाकणारें हेंच इंग्लंडचें ऐश्वर्य. आतां मात्र इंग्लंड मला मनापासून आवडूं लागलें आहे. दोनच तास हा देखावा टिकला.

आतां आम्हीं लंडनच्या जवळजवळ आलों आहोंत. धुरकट घरांची गर्दी आतां दोन्ही बाजूंना दिसूं लागली आहे. बरोबर ६–१५ वाजतां लंडनच्या भव्य व्हिक्टोरिया स्टेशनांत गाडी उभी राहिली आणि आमच्या राज्यकर्त्यांच्या त्रिखंडप्रख्यात राजधानींत—लंडनमध्यें—मी उतरलों.

लंडनच्या व्हिक्टोरिया स्टेशनांतील प्लॅटफॉर्मवर पाऊल ठेवतांना एक प्रकारच्या अननुभूत काळजीनें माझें अंतःकरण धडधडत होतें. माझें पत्र वेळेवर पोंचून कुणीतरी हिंदी दोस्त मला घ्यायला स्टेशनवर आला असेल का ? भाषेची पंचाईत नव्हती. पण छत्तीस तासांच्या प्रवासानें मी दमून गेलों होतों आणि या एवढ्या मोठ्या लंडन शहरांत संध्याकाळच्या वेळेला जवळचे पत्ते हातांत घेऊन जागा हुडकीत जायचें माझ्या जिवावर आलें होतें. सर्व इंग्रज उतारू उतरून गेले होते. माझ्या बॅग्ज् खालीं उतरून मी इकडेतिकडे पहात होतों. इतक्यांत निळ्या सर्जेचा सूट घातलेला एक ठेंगणासा पण भरभक्कम बांध्याचा हिंदी तरुण माझ्या दृष्टीला पडला. माझ्या छातीवरची धोंड उचलल्यासारखी होऊन मला इतका आनंद झाला कीं त्याचें वर्णन करतां येणें शक्य नाहीं. हेच श्री. ताम्हनकर असावेत असा मीं तर्क केला. त्या तरुणाची दृष्टि माझ्याकडे गेल्याबरोबर त्यानें मला विचारलें,

"आपण काणेकर का ?"

" हो. " मी म्हणालों, " आपण ताम्हनकर ना ? "

" छे, छे, मी चाफेकर ! " तो तरुण म्हणाला.

ताम्हनकरांनीं या चाफेकरांना मला उतरून घ्यायला पाठविलें होतें. श्री. चाफेकर हे एक धाडसी तरुण असून त्यांची हकीगत मनोरंजक आहे.

पूर्वी मुंबईजवळील कल्याण येथें हे असत. वर्ष दीड वर्षापूर्वी इंग्लंडमध्यें टॅक्सी चालविण्याचा धंदा करावा या विचारानें ते लंडनला गेले ! हल्लीं ते लंडनमध्यें टॅक्सीचा धंदा करतात. साठ पौंडांना एक भली मोठी सेकंडहँड ब्यूक सेडन् गाडी त्यांनीं घेतली असून चारसहा महिन्यांत लंडनचे सर्व लहानमोठे रस्ते म्हणजे त्यांच्या हातचा मळ झाला आहे. इंग्लंडमध्यें टॅक्सीचा धंदा करणारा असा हा एकच एक हिंदी माणूस आहे, असें मला वाटतें. लंडनला जाणाऱ्या प्रत्येक महाराष्ट्रियानें टॅक्सींतून फिरायचेंच असलें, तर दूर देशीं नशीब काढायला आलेल्या या महाराष्ट्रीय तरुणाला आश्रय दिल्याशिवाय राहूं नये. ६३ पार्लमेंट हिल् लंडन, एन्. डब्ल्यू. ३, येथें पुण्याच्या दुसऱ्या चाफेकरांचें हिंदी विद्यार्थ्यांकरितां जें होस्टेल आहे तेथेंच हे चाफेकर रहातात.

त्यांच्या टॅक्सींतून मी स्टेशनच्या बाहेर पडलों. बाहेर सुरेख सोनेरी ऊन पडलें होतें. गेले चारसहा दिवस लंडनची हवा फार सुंदर असल्याचें कळलें. मुंबईला सँढर्स्ट रोड नाक्यावर जेवढी मोटारींची गर्दी असते, त्याच्या दसपट मोटारींच्या गर्दीतून आमची मोटर चालली आहे. आत्यंतिक कुतूहलानें मी दोहों बाजूंना पहातों आहे. चारसहा दिवसांनीं 'कॉरोनेशन' असल्यामुळें इमारतींवरतीं युनिअन् जॅक्स् फडकताहेत. प्रथमदर्शनींच लंडन मला कसें दिसलें ? आमच्या मुंबईच्या फोर्टमध्यें जशा मोठमोठ्या दगडी इमारती आणि रस्ते आहेत, तसाच देखावा इथें दिसतो आहे. मात्र फार मोठ्या प्रमाणावर. माणसांची आणि वाहनांची गर्दी मुंबईपेक्षांहि कितीतरी पटीनें मोठी ! जणुं काय रोजच जत्रा भरली आहे. लंडनच्या दगडी इमारती प्रचंड आणि भव्य आहेत, पण इंग्लंडच्या विशिष्ट हवेमुळें बाहेरून त्या इतक्या काळवंडून गेलेल्या आहेत, कीं आदले दिवशीं या शहराला आग लागली होती कीं काय, असा भास होतो. एखाद्या इमारतीला जर चुकून आपण

घांसून गेलों, तर कोटाला काजळी लागेल कीं काय, अशी भीति वाटते. सदैव पावसाळी हवा आणि कारखान्यांच्या धुरांड्यांतले, प्रत्येक घराच्या निरनिराळ्या धुराड्यांतले नाना तऱ्हेचे धूर वातावरणांत जमत असल्यामुळें इमारतींवर अशी काजळी चढत असावी, असें मला वाटतें.

हाइड पार्क, पिकॅडिल्ली इत्यादि वाचनामुळें परिचित असलेल्या लंडनच्या भागांतून आमची मोटार चालली आहे. पिकॅडिल्ली हा लंडनचा गाभा समजला जातो आणि लंडन हें जगाचें व्यापारी केंद्र असल्यामुळें इंग्रज लोक पिकॅडिल्लिला सर्व 'जगाचें काळीज (Heart of the world)' समजतात! लंडनचा हा अत्यंत मध्यवर्ति आणि भपकेबाज भाग आहे. नाना तऱ्हांच्या चित्रविचित्र रंगाचीं हजारों विद्युच्चिन्हें (Neon-signs) चारी बाजूंना चमकताहेत.

दोनतीन आठवडेच मला लंडनमध्यें रहावयाचें असल्यामुळें उगाच कुठेंतरी नवख्या ठिकाणीं राहून दर वेळेला रस्ते शोधीत बसण्यापेक्षां बरे-चसे महाराष्ट्रीय विद्यार्थी रहात असलेल्या हॅंपस्टेड् हीथवरील चाफेकरांच्या होस्टेलमध्येंच रहावयाचें मी ठरवलें. घरीं पोंचेपर्यंत सात वाजले होते. महाराष्ट्रीय भाषा आणि महाराष्ट्रीय चेहेरे. आजूबाजूला दिसल्यामुळें अगदीं स्वतःच्या घरासारखें एकदम मला मोकळें वाटूं लागलें. त्यांत आणखी भात, आमटी आणि कॉलीफ्लावरची भाजी खायला मिळाली! यापेक्षां आणखी काय पाहिजे?

जेवल्यानंतर एका मित्राबरोबर मी फिरायला बाहेर पडलों. आठ साडेआठ वाजले होते. पण बाहेर ऊन चांगलेंच होतें. आमची जागा थोडीशी मलबार हिलसारखी उंचावर आहे. पार्लमेंट हिल रोडनें खालीं पायथ्याशीं आलों तों नाक्यावरच दोन सभा चालल्या होत्या. सभा म्हणजे एक उंच पायांची खुर्ची; तिच्यावर एक वक्ता उभा आणि आजूबाजूला जमलेले तीसचाळीस तमासगीर! लंडनमध्यें असल्या शेंकडों सभा दररोज ठिकठिकाणीं होतात. कुठेंहि खुर्ची ठेवावी आणि बोलायला सुरवात करावी. गाडीघोड्यांना आणि रस्त्यांवरून जाणाऱ्यायेणाऱ्यांना अडथळा न झाला म्हणजे झालें. पोलीस इतकीच काय ती काळजी घेतात. यापलीकडे कांहीं करीत नाहींत. तुम्ही वाटेल तें घसा कोरडा पडेपर्यंत

बोला. हें इंग्लंडचें भाषणस्वातंत्र्य ( Freedom of speech ) ! वर उल्लेखिलेल्या दोन सभांपैकीं एक फॅसिस्टांची होती. दुसरी लंडनमधल्या 'बसवाल्यांची' होती. लंडनमध्यें सध्यां बसूचा संप चालू आहे. एका सभेपासून थोड्याशा पावलांवर दुसरी सभा चालूं आहे. याच गल्लोगल्लीं होणाऱ्या सभांना 'Street corner meetings' म्हणतात आणि या वक्त्यांना खोकेठोक 'Tub thumpers' म्हणतात !



# लंडन

## ता. ७ मे–

*नांव सोनूबाई आणि हातीं कथलांचा वाळा !–'हिंदोळ्यावर' नी ' चांदरात ' !*

मी रहातों त्या हॅंपस्टेड हीथच्या जवळच असलेल्या एका रस्त्यावर माझे मुंबईचे मित्र श्री. सुंदर काबाडी रहातात असें मला कळलें. त्यांना भेटायला सकाळीं अकरा वाजतां मी गेलों. श्री. काबाडी गेलीं तीनचार वर्षें इथें आहेत. हिंदी वृत्तपत्रांचे प्रतिनिधि म्हणून ते इथें रहातात. क्रॉनिकलमध्यें येणारीं इंग्लंडचीं बातमीपत्रें त्यांचींच असतात. आठव्या एडवर्डाच्या राज्यत्यागाच्या वेळीं तर त्यांनीं मुंबईच्या 'क्रॉनिकल'ला पाठविलेली एक ' आंतली बातमी ' लंडनमधल्या इंग्लिश वृत्तपत्रांच्या बातमीदारांनाहि मुंबईत प्रसिद्ध होईपर्यंत मिळाली नव्हती ! कॉम्रेड एम्. एन्. रॉयचे एक प्रमुख अनुयायी म्हणून मुंबईच्या लोकांना श्री. सुंदर काबाडी चांगलेच माहीत होते. त्यांनीं कुठून तरी पैदा केलेला चिवडा आणि लाडू मला खायला दिले. लंडनमध्यें या वस्तु खातांना जी मजा येते ती मुंबईच्या लोकांना कळणार नाहीं !

दुपारीं साडेबारा वाजतां चान्सरी लेनमध्यें श्री. ताम्हनकर यांच्या ऑफिसांत त्यांना भेटायला गेलों. पत्रांनीं आमची ओळख झालेलीच होती. श्री. ताम्हनकर मोठे खेळाडू आणि हुषार गृहस्थ दिसतात. चान्सरी लेनमध्यें जिकडे तिकडे इंग्लिश बॅरिस्टरांचीं ऑफिसें आहेत. मुंबईच्या स्मॉल कॉझेस् कोर्टाजवळचा पिकेट रोडच म्हणाना ! बॅरिस्टर

होण्याकरितां ज्या चार 'इन्स् ऑफ् कोर्ट' आहेत त्यांपैकीं 'लिंकन्स् इन्' ताम्हनकरांच्या ऑफिसच्या समोरच आहे. त्या इन्च्या बागेंत जाऊन आम्हीं कांहीं फोटो घेतले. या बागेंतल्या लाल, पिवळ्या, पांढऱ्या, 'ट्यूलिप्' पुष्पांचे ताटवे मला अतिशय आवडले.

नंतर मी 'इंडिया ऑफिस' पहायला गेलों. जातांना वाटेंत पार्लमेंटचीं दोन्ही 'गृहें' आणि ब्रिटिश सरकारच्या मुख्य प्रधानाचें सुविख्यात निवासस्थान—१०, डाउनिंग स्ट्रीट—दिसलें. १०, डाउनिंग स्ट्रीट ही इमारत मुंबईतील लॅमिंग्टन रोडवरील पोलीस स्टेशनापेक्षां कांहीं चांगली वाटली नाहीं! त्याचप्रमाणें साऱ्या ब्रिटिश साम्राज्याचा राज्य-कारभार जेथून हांकला जातो, तो 'व्हाइट हॉल' आणि 'प्रिव्ही कौन्सिल'-च्या ज्यूडिशियल कमिटीची जागाहि पाहिली. 'व्हाइट हॉल'ची इमारत खूप मोठी व भव्य आहे; पण नांव 'व्हाइट हॉल' असून लंडनमधल्या इतर इमारतीसारखीच ती काळवंडलेली आहे! ज्या प्रिव्ही कौन्सिलकडे मारे हिंदुस्थानांतल्या सगळ्या हायकोर्टांचीं अपीलें जातात, त्या प्रिव्ही कौन्सिलच्या दारावर मुंबईतल्या एखाद्या लहानशा ऑफिससारखी 'प्रिव्ही कौन्सिल' हीं अक्षरें असलेली एक मळकट पितळी पाटी आहे!

'इंडिया ऑफिस' किंवा 'सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इंडिया'चें ऑफिस ही इमारत मात्र बाहेरून लंडनमधल्या इतर इमारतीं-सारखीच काळवंडलेली असली तरी आंतून इखाद्या राजवाड्यासारखी भव्य आणि प्रेक्षणीय आहे. या इमारतींत एक प्रचंड लायब्ररी असून हिंदी विद्यार्थ्यांना वाटेल तीं पुस्तकें फुकट वाचायला नेतां येतात. पुस्तकांचा 'इंडेक्स' चाळतां चाळतां मराठी पुस्तकांच्या यादींत विभावरी शिरूरकर यांचें 'हिंदोळ्यावर' आणि माझें 'चांदरात' या पुस्तकांचीं नांवें पाहिलीं. येथील असिस्टंट लायब्रेरियन मि. गॉन्साल्व्हेस या नांवाचे एक हिंदी ख्रिश्चन गृहस्थ आहेत. त्यांना 'हीं पुस्तकें येथें खरोखरच आहेत का?' असें विचारतां त्यांनीं ताबडतोब तीं दोन्ही पुस्तकें काढून दाखविलीं.

आज संध्याकाळीं आठ वाजतां जेवल्यानंतर सहज मी खोलींत पडलों होतों. कुणीं दार वाजवलें म्हणून उघडून पहातों, तों श्रीयुत आणि

सौ. लाड दारांत उभ्या ! त्यांची लंडनमध्यें भेट जितकी अवचित तितकीच आनंददायक होती. धुळ्याला सेशन्स जज्ज असलेले श्री. लाड, आय्. सी. एस्. हे माझे शाळासोबती होते. दोन वर्षांची रजा घेऊन सध्यां बॅरिस्टरीचा अभ्यास करण्याकरितां ते लंडनमध्यें रहात आहेत. माझ्या घरापासून पांच मिनिटांच्या अंतरावर असलेल्या हॅंपस्टेड हीथ रोडवरच ते रहातात. श्री. लाड हे एक विद्वान् आणि व्यासंगी मराठी साहित्यिक आहेत हें सांगायला पाहिजे असें नाहीं. ते इतक्या जवळ रहातात हें ऐकून मला अतिशय आनंद झाला. कारण त्याच्या संगतींत आतां लंडनमधला माझा मुक्काम अत्यंत सुखाचा होणार यांत शंका नाहीं.

* * *

## ता. ८ मे–

### *कीट्स्‌चें घर–टेट गॅलरी.*

आज सकाळीं कडाक्याची थंडी पडली आहे. बाहेर धुकेंहि सपाटून पडलें आहे. पार्लमेंट हिलवरच्या आमच्या या उंच जागेवरून खालीं पसरलेलें लंडन शहर धुक्यांत गुरफटलेलें दिसतें आहे. आज ब्रेकफास्ट नंतर मि. लाड आणि सौ. लाड यांनीं प्रख्यात इंग्लिश कवि कीट्स् यांचें घर पहावयाला जावयाचें ठरविलें आहे. आम्ही रहातों या हॅंपस्टेड् भागांतच कीट्स् रहात असे. लाड रहातात त्यांच्या घराच्या मागच्या बाजूलाच कीट्स्‌चें घर आहे. त्याला ‘कीट्स् ग्रव्ह’ असें नांव दिलें आहे. कीट्स् रहात असे तेव्हां हें घर जसें होतें तसेंच्या तसें तें अजून राखून ठेवण्यांत आलें आहे. या घराला लागून असलेल्या घरांत कीट्स्‌ची प्रेयसी फॅनी ब्रॉन रहात असे, तेंहि घर तसेंच ठेवण्यांत आलें आहे. कीट्स्‌च्या घराला लागूनच एका खोलींत पदार्थसंग्रहालय किंवा म्यूझियम् असून कीट्स्‌शीं संबंध असलेल्या बारीकसारीक सर्व वस्तु तेथें व्यवस्थितपणें कांचेच्या आवरणाखालीं ठेवण्यांत आल्या आहेत. कीट्स्‌च्या पिंगट केंसांची एक बटा, त्याचीं प्रेमपत्रें, फॅनी ब्रॉन्‌च्या केंसांची बटा, तिचें कांहीं शिवणकाम, कीट्स्‌नें तिला दिलेली आंगठी वगैरे वगैरे मनोरंजक वस्तु या म्युझियममध्यें आहेत. शेक्सपियरच्या नाटकांची जी प्रत कीट्स् वाचीत असे, ती

कीट्स्च्या स्वतःच्या हातच्या टिप्पणांसह या संग्रहालयांत आहे आणि अभिमानानें सांगण्यासारखी गोष्ट अशी, कीं मुंबईच्या वकील नांवाच्या कुणीतरी पारशी गृहस्थांनीं ही प्रत जबरदस्त किंमत देऊन विकत घेतली आणि या संग्रहालयाला बक्षीस देऊन टाकली.

ज्या झाडाखालीं बसून कीट्स्नें आपली 'Ode to Nightingale' ही अजरामर कविता लिहिली, तें झाडहि अजून या बागेंत जसेंच्या तसें उभें आहे. या झाडाकडे पाहिलें कीं अनंत भावनांनीं अंतःकरण उचंबळून येतें.

आम्ही रहातों हा लंडनचा हॅंपस्टेड भाग खरोखरच कवींनीं रहाण्यासारखा आहे. इथें आल्यावर धुरानें भरलेल्या आणि कारखान्यांनीं गजबजलेल्या लंडन शहराचा हा एक भाग आहे असें कुणालाच वाटणार नाहीं. हॅंपस्टेड हीथचें हिरवेंगार मैदान दूरवर पसरलें आहे. जवळच 'केनवूड फॉरेस्ट' नांवाचें एक चिमुकलें जंगल आहे. गर्द झाडी आणि लहानलहान तळीं मधेंमधें असल्यामुळें आपण शहरांत नसून माथेरान किंवा लोणावळ्याच्या बाजूला आहोंत, असा भास होतो. युरोपियन शहरें आणि हिंदुस्थानांतलीं शहरें यांतला हाच मोठा फरक मला वाटतो. हाइड पार्क किंवा हॅंपस्टेड हीथसारखा जंगली भाग जशाचा तसा शहरांत ठेवून दिल्यानें शहराला एक प्रकारची अकृत्रिम शोभा येते ही कल्पनासुद्धां आमच्याकडे कुणाला शिवलेली नाहीं. शहर म्हणजे कारखाने आणि धूळ. त्यांत अवाढव्य बगीचे किंवा गर्द झाडीचीं जंगलें ( Woods ) असतांच कामा नयेत, असलीं तर काढून टाकलीं पाहिजेत, ही आमची कल्पना! लंडनचा हा हॅंपस्टेड भाग असा असल्यामुळें रॅम्से मॅक्डोनाल्ड, प्रख्यात तत्त्ववेत्ता सी. ई. एम्. ज्योड् वगैरे मंडळी याच भागांत रहातात. बर्नार्ड शॉसुद्धां इथेंच रहात असत. पण कांहीं दिवसांपूर्वीं 'मार्बल आर्च' या भागांत ते रहायला गेल्याचें मला कळलें.

कीट्स् म्यूझियम् पाहिल्यानंतर एका 'लायन्स रेस्टरॉं'मध्यें आम्हीं 'लंच' घेतला आणि 'टेट गॅलरी' हें इंग्लंडचें जगद्विख्यात चित्रसंग्रहालय पहावयास गेलों. येथें कॉन्स्टेबल्, टर्नर्, ऑगस्टस जॉन् वगैरे विख्यात चित्रकारांचीं चित्रें आणि रोदॉं, एप्स्टीन् वगैरे शिल्पकारांच्या

कलाकृती पहावयास मिळाल्या. होगॉर्थ, रॉम्ने, गेन्सबरो वगैरे जुन्या चित्रकारांच्या कृतीहि या संग्रहालयांत आहेत.

लंडनमध्यें सध्यां 'बस'चा संप चालू असून पंचवीस हजार बसवाले संपावर आहेत. राज्यारोहणानिमित्त लंडनमध्यें खूप गर्दी होणार असल्यामुळें चारसहा दिवसांत हा संप मिटावा म्हणून जोराचे प्रयत्न चालू आहेत.

* * *

## ता. ९ मे–

Mr. Anand (!) Kanekar *यांचें मराठी स्पीकिंग युनियनतर्फे व्याख्यान—चपाती आणि 'शेरीखंडा'!*

आज केंब्रिज सर्कलमधील ताजमहाल हॉटेलमध्यें मराठी स्पीकिंग युनिअन्‌तर्फे एक 'लंच' असून भोरचे महाराज, जमखिंडीचे महाराज, वगैरे हिंदी पाहुणे आणि कांहीं इंग्लिश पाहुणेहि बोलावलेले आहेत. 'मराठी वाङ्मयांतील कांहीं नवीन विचारप्रवाह' या विषयावर मला मराठींत व्याख्यान द्यायचें निमंत्रण आहे. बाकी लंडनमध्यें मराठी व्याख्यान देण्यासारखी दुसरी सोपी गोष्ट नाहीं! श्री. लाड बरोबर असल्यामुळें मला वाटेल तें बहकतां येणार नाहीं, ही गोष्ट वेगळी !

'लंच' दीड वाजतां सुरू झाला. 'डेली स्केच्' या लंडनमधील वृत्तपत्राची प्रतिनिधि बाई या लंचला हजर होती. तिनें 'डेली स्केच'च्या ता. १० मेच्या अंकांत 'London' by Mr. Gossip या सदराखालीं या समारंभाचें वर्णन दिलें आहे. माझ्या वर्णनापेक्षां एका इंग्लिश बाईला हा समारंभ कसा दिसला त्याचें वर्णन अधिक मनोरंजक वाटेल म्हणून 'डेली स्केच' मधला तो उतारा मी जसाचा तसा पुढें देतों. 'मराठी'चें तिनें केलेलें स्पेलिंग, अनंतचा 'आनंद' आणि श्रीखंडाचें 'शेरिखंडा' मीं जसेंच्या तसें ठेवलें आहे.

**An Indian Affair**

Scent of musk and sandalwood, and thin, high-pitched dissonances of Indian music greeted guests of the Mahrathi-speaking Society at the newly opened Taj Mahal restaurant.

There are some 200 members of the Society, including British, which was formed last October.

Guests of honour were the Rajahs of Jamkhindi and Bhor, The Uvraj of Bhor and famous Mahrathi poet Anand Kanekar.

**Chapatti and Sherikhanda**

Lovely women in brilliant saris with caste-marks between arched black brows talked animatedly. A fairy-like creature with a long black plait, Miss Chitale, sang an extempore verse or two before the meal, begging lunchers to do justice to the three courses and to enjoy themselves. Apparently it's an old Indian custom.

There was curry served with a whole battery of accessory condiments, there was chapatti, dhal and a thin kind of custard, called sherikhanda.

कु. नीरा मोंडकर, कु. वेणु चितळे, आणि अतिया बेगम हे मुंबई-मधले दोनतीन ओळखीचे चेहेरे मला येथें दिसले. अतिया बेगम यांची एकंदर बडबड आणि गडबड जर कुणीं पाहिली असती, तर हा त्यांच्या घरचाच समारंभ आहे कीं काय असें त्याला वाटलें असतें !

परत येतांना रस्त्यांत मी कांहीं इंग्लिश भिकारी पाहिले. येथील भिकाऱ्यांचें एक वैशिष्ट्य लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ते तोंड वेंगाडून नुसती भिक्षा कधींच मागत नाहींत. कुणी एखादें फूल तुम्हांला देईल आणि मग तुम्ही त्याला काय वाटेल तें द्या. कुणी फूटपाथावर चित्र काढून दाखवील, तर कुणी एक ग्रामोफोन घेऊन फिरेल आणि त्यावर रेकॉर्ड वाजवून दाखवील.

* * *

## ता. १० मे—

### *डॉ. मुल्कराज आनंद—'हुतात्मा' काणेकर !*

आज सकाळीं लंडनमधील पुरोगामी लेखक—संघाचे चिटणीस आणि 'The Cooly,' 'Two Leaves and a Bud' इत्यादि कादंबऱ्यांमुळें इंग्लंडमधें प्रसिद्ध असलेले डॉ. मुल्कराज आनंद यांना त्यांच्या ७, चोबर्न बिल्डिंग, या जागेंत भेटायला गेलों. लंडनमध्यें असलेले दुसरे

एक लेखक प्रमोद सेन हेहि डॉ. आनंद यांच्या घरींच भेटले. या दोघांच्याहिसाठीं माझ्याकडे परिचयपत्रें होतीं. डॉ. आनंद हे स्पेनमध्यें माद्रिद येथें गेले होते. तेथून ते नुकतेच परत आले होते. तिथल्या पुष्कळ हकीगती त्यांनीं मला सांगितल्या. स्पॅनिश सरकारतर्फे रेडिओवर इंग्रजींत भाषणें करून सरकारपक्षाचा प्रचार करण्याची कामगिरी त्यांना माद्रिदमध्यें देण्यांत आली होती. मला स्पेनमध्यें जातां येईल किंवा कसें यासंबंधीं मीं त्यांचा सल्ला घेतला. 'आधीं पासपोर्ट मिळणें कठीण आणि मिळाला तरी एकटा जाऊं नकोस,' असा सल्ला त्यांनीं मला दिला.

स्पॅनिश किंवा फ्रेंच भाषा येत नसल्यामुळें आणि कसल्याहि प्रकारचें अधिकारपत्र जवळ नसल्यामुळें फ्रेंच सरहद्द ओलांडून स्पेनमध्यें जातांना नाहक त्रास व्हावयाचा आणि एखादे वेळीं प्राणासहि मुकण्याचा प्रसंग यायचा, असें त्यांनीं सांगितलें. धड उत्तर देतां न आल्यामुळें सरकारपक्षाचाच एखादा सैनिक गोळी घालून ठार करायचा आणि नंतर हा सोशालिस्ट असून आपल्या बाजूचा होता असें कळल्यावर दिलगिरी प्रदर्शित करण्यांत येऊन स्पॅनिश सरकारच्या खर्चानें लालबावट्याच्या आच्छादनांत आमचा मुडदा गुंडाळण्यांत येऊन मोठी प्रेतयात्रा निघायची! मला 'हुतात्मा' होण्याची मुळींच इच्छा नसल्यामुळें स्पेनला जायचा बेत मीं रहित केला.

* * *

## ता. ११ मे–

*मला रशियाला जायचं तिकिट काढून कांहो द्या ना!* –
Mummy, who is this Gandhi ?

मीरत कटामुळें हिंदुस्थानला परिचित असलेले कॉमरेड बेन ब्रॅडले यांना मी दुपारीं भेटलों. ५३, ग्रेज् इन् रोडला अँटी इंपीरियालिस्ट लीगचें ऑफिस आहे. तेथें त्यांची भेट झाली. थोडा वेळ चर्चा केल्यानंतर मीं त्यांचा निरोप घेतला.

आज मला माझ्या मुख्य कामाला लागायचें आहे. मी युरोपला आलों तो इंग्लंड किंवा फ्रान्स पहायला नव्हे. कसेंहि करून मला रशिया

पहावयाचा आहे. एका गांवढळ मुलीचें जसें गाणें आहे 'मला मुंबईला जायचंय, तिकीट काढून कां हो द्या ना?' तशी माझी मनःस्थिति आहे. 'मला रशियाला जायचंय् तिकीट काढून कां हो द्या ना!'

रशियांत प्रवास करायचा असला तर 'इंटूरिस्ट' नांवाची रशियन सरकारची एक संस्था आहे. तिच्या मार्फतच प्रवासाची सोय करावी लागते. या इंटूरिस्टच्या लंडनमधील ऑफिसांत मी गेलों. प्रवासाच्या निरनिराळ्या योजना होत्या. त्यांपैकीं रशियामधील रंगभूमीच्या अभ्यासाकरितां म्हणून प्रो. रॅफे नांवाच्या एका इंग्लिश प्रोफेसरांच्या नेतृत्वाखालीं एक एकवीस दिवसांची ट्रिप ता. २६ मे रोजीं निघायची होती. तिच्यांतून जायचा मीं विचार केला आणि नंतर पासपोर्टची खटपट सुरू केली.

संध्याकाळीं सर्व जगभर प्रसिद्ध असलेलें मॅडम् टुसॉव्हचें मेणाच्या चित्राचें प्रदर्शन बेकर स्ट्रीटमध्यें पहायला गेलों. जगांतल्या सर्व सुप्रसिद्ध व्यक्तींचीं मेणाचीं चित्रें इथें करून ठेवलेलीं आहेत. इंग्लिश इतिहासांतले निरनिराळे प्रसंगहि अगदीं हुबेहूब उठविलेले आहेत. महात्मा गांधींची सुंदर आकृति एका बाजूला आहे; ती पहात उभा असतां माझ्या बाजूलाच उभ्या असलेल्या एका मध्यम वयस्क इंग्रजी बाईचा आणि तिच्या आठ-दहा वर्षें वयाच्या मुलीचा पुढील संवाद माझ्या कानांवर पडला. तो अत्यंत मनोरंजक असल्यामुळें मी जसाच्या तसा देतों—

"Mummy, who is this Gandhi?"

"Didn't you see him when he was in London?"

"No, Mum. What did he do?"

"He is fighting for India. He wants to take India out of our hands!'

'Oh-O-O O O!-would he kill us, mum?'

'No dear, he won't take up arms, he is a pacifist!'

इंग्लिश बायकामुलें महात्मा गांधींना किती भितात किंवा किती भीत नाहींत, याचा हा संवाद म्हणजे एक उत्कृष्ट नमुना होय.

* * *

## ता. १२ मे—

### *राज्यारोहणाचा दिवस—माझे शरीरसंरक्षक !*

आज सकाळीं आठ वाजतां उठून बाहेर पहातों तों स्वच्छ ऊन पडलें आहे. आज राज्यारोहणाचा दिवस. पण आमच्या हॅंपस्टेडमध्यें विशेष गडबड कांहींच वाटत नाहीं. दहा वाजतां बादशहा आणि महाराणी यांची मिरवणूक बकिंगहॅम राजवाड्यांतून वेस्टमिन्स्टर ॲबेकडे जावयाची आहे. तिथें कॅंटरबरीच्या आर्चबिशपांच्या हस्तें राज्याभिषेक होणार. तोंपर्यंत हें ऊन जर असेंच राहिलें आणि पाऊस पडून मिरवणुकीचा बोजवारा उडाला नाहीं, तर संध्याकाळचीं इंग्लिश वृत्तपत्रें आनंदानें बेहोष होतील. आजच्या दिवशीं हवा कशी राहील या विषयाची चर्चा इंग्लिश वृत्तपत्रांतून गेले कित्येक दिवस चालली आहे ! इंग्लिश हवा आहेच तशी.

हिंदुस्थानांतून आणि परदेशाहून कॉरोनेशन पहावयाला आलेले कांहीं लोक जागेकरितां पांचपांच दहादहा पौंड खर्च करून बाराबारा तास आधीं जाऊन थंडीवाऱ्यांत जागा धरून बसले आहेत. मला कॉरोनेशन पहावयाची मुळींच इच्छा नाहीं आणि इतके पैसे खर्च करून आणि रात्रभर जागरण करीत गर्दीमध्यें जीव कासावीस करून घेऊन मिरवणूक पहावयाची तर मुळींच इच्छा नाहीं. आम्हीं चारपांच जणांनीं घरींच बसून रेडिओवरून सर्व कांहीं ऐकावयाचें ठरवलें आहे. मिरवणुकीची आणि राज्याभिषेकाच्या सर्व समारंभाची विस्तृत फिल्म आज संध्याकाळींच किंवा उद्यां संध्याकाळीं एक शिलिंग देऊन कुठल्याहि सिनेमांत पहावयाला मिळेल.

बादशहांना शपथ घ्यावयास लावतांना कॅंटरबरीच्या आर्चबिशपांचा आवाज आणि बादशहांनीं घेतलेली शपथ रेडिओवर स्पष्ट ऐकूं आली. रेडिओवरचें वेस्टमिन्स्टर ॲबेमधल्या समारंभाचें वर्णन इतकें मनोवेधक होतें, कीं जणुं काय डोळ्यांसमोर समारंभ चालला आहे असा भास होत होता.

आज सकाळीं ‘ ब्रेकफास्ट’च्या वेळीं आमचे ‘घरवाले’ श्री. चाफेकर यांनीं मला एक गोष्ट सांगितली. ती ऐकून मला थोडीशी भिती आणि थोडीशी

मजाहि वाटली. भीति वाटावयाचें कारण—आतां रशियाचा पासपोर्ट मला मिळणार किंवा नाहीं याचा संशय वाटूं लागला. चाफेकर म्हणाले, कीं पहांटेस दुधाच्या बाटल्या आंत आणावयाला जेव्हां ते बाहेर गेले, तेव्हां साध्या कपड्यांतले दोन 'स्कॉटलंड यार्ड'चे लोक दरवाजापाशीं उभे असलेले त्यांना आढळले. त्यांनीं लपवालपवीचा कांहींच प्रयत्न केला नाहीं. "आम्ही पोलिसचे लोक आहोंत आणि काणेकर नांवाचा एक 'भयंकर' मनुष्य तुमच्याकडे रहातो आहे, त्याच्यावर आज कॉरोनेशनचा दिवस असल्यामुळें आम्हांला सक्त नजर ठेवावयाची आहे," असें स्पष्टपणें त्या दोघांनीं श्री. चाफेकर यांना सांगितलें! काल रात्रीं मी घरीं किती वाजतां आलों तें त्यांनीं चाफेकरांना बरोबर सांगितलें आणि 'आज त्याच्या हालचाली काय आहेत हें तुम्हांला माहीत असल्यास आम्हांला 'सांगा' अशी त्यांनीं विनंती केली!

"आमचा नाइलाज आहे. आज परदेशी (Foreigners) लोकांवर नजर ठेवण्याचा आम्हांला हुकूम आहे." ते अत्यंत अदबीनें चाफेकरांना म्हणाले.

"हिंदी लोकांना तुम्ही परदेशी समजतां काय?" चाफेकरांनीं त्यांना विचारलें.

त्यावर ते नुसते हंसले.

असें आहे तर! मला स्वतःचा थोडासा अभिमान वाटला. बलाढ्य ब्रिटिश सरकारला स्कॉटलंड यार्डचीं दोन माणसें माझ्यामागें ठेवण्याइतका महत्वाचा माणूस मी वाटतों तर? या दोघांची घोर निराशा मला करावी लागणार याचें मला वाईट वाटतें. आपल्या बादशहाचा राज्याभिषेक पहावयाची मौज सोडून देऊन सारा दिवस या दोन इंग्रजांना या इथें ताटकळत रहावें लागणार! कारण आजच्या दिवसांत कुठेंच बाहेर पडावयाचें नाहीं असें मीं ठरविलें आहे!

दुपारीं दीड वाजतां जवळच्याच एका दुकानांत 'लंच' घेण्या-करितां मी बाहेर पडलों. तेव्हां माझे हे दोन शरीरसंरक्षक माझ्या दृष्टीला पडले. मोठे सुस्वभावी दिसतात दोघेहि. एकानें काळा आणि दुसऱ्यानें तपकिरी रंगाचा सर्जचा सूट घातला आहे. अर्ध्या तासानें लंच घेऊन मी

तसाच परत आलों आणि त्यांना पुन्हा तेथें रखडत उभें रहावें लागलें. त्यांना मी अगदींच बावळट वाटलों असलों पाहिजे !

आज रात्रीं दहा वाजतां आमच्या पार्लमेंट हिलवर दारूकाम उडविलें जाणार आहे. सारखा झिमझिम् पाऊस पडतो आहे; पण दारूकाम पहाण्याकरितां इंग्लिश स्त्री–पुरुषांची चिकार गर्दी जमली आहे. आम्ही चारपांच जणहि त्या गर्दींत आहोंत. कसलाहि फुसका बाण हवेंत फुटला तरी आजूबाजूच्या इंग्लिश पोरी 'Oh, lovely !' म्हणून ओरडताहेत !

* * *

## ता. १३ मे–

### *महागरें रिपब्लिक–कॉरोनेशनची रोषणाई.*

रशियाच्या 'व्हिसा'साठीं 'इंटुरिस्ट ऑफिस'ला माझे पांच फोटो हवे आहेत. 'जेरोम' नांवाच्या एका कंपनीचीं लंडनमध्यें नाक्यानाक्यावर फोटोग्राफीचीं 'सलून्स' आहेत. त्यांपैकीं एकामध्यें एका तासांत माझ्या फोटोच्या सहा प्रति त्यांनी दोन शिलिंगांना काढून दिल्या. त्या घेऊन मी डॉ. गुप्ते आणि माझे एक मित्र श्री. कणेकर बुश् हाऊसमधील इंटुरिस्टच्या ऑफिसांत गेलों. या बुश्हाऊसशेजारींच इंडिया हाऊस आहे. इथें हिंदी चित्रकलेचें एक लहानसें प्रदर्शन चालू होतें, तें पहावयाला आम्ही आंत गेलों. अबदुल रहमान चुगताई या माझ्या आवडत्या चित्रकाराचीं बरींचशीं चित्रें या प्रदर्शनांत होतीं. इथें एक हिंदी वस्तूंचें म्यूझियमसुद्धां आहे. तेथें दीड लाख रुपयांची एक जुनी करन्सी नोट पाहिली. या नोटा हिंदुस्थानांत कधीं अस्तित्वांत होत्या कुणाला ठाऊक !

दुपारीं एका स्पॅनिश रेस्टोरॉंमध्यें आम्ही चहा घ्यावयास गेलों. आंत कुणीच नव्हतें. स्पॅनिश वेटर पुढें आला तेव्हां त्याला आम्हीं सहज विचारलें, "फ्रँकोच्या बाजूचा आहेस कीं सरकारपक्षाच्या ?"

"मी रिपब्लिकच्या बाजूचा आहें." तो छाती पुढें काढून म्हणाला, "माझे कांहीं नातेवाईक माद्रिदच्या रक्षणाकरितां लढत आहेत."

"तर मग आम्ही तुझ्याकडेच चहा घेऊं." आम्ही म्हणालों.

त्या रिपब्लिक स्पॅनिआर्डच्या दुकानांत आम्हीं चहा घेतला खरा, पण बिल देतांना पहातों तों एकएक कपाचें त्यानें सहा सहा पेन्स बिल केलें होतें. रिपब्लिक जरा महागच पडलें !

रात्रीं जेवणानंतर कॉरोनेशनची रोषणाई पहाण्याकरितां आम्ही पिकॅडिली आणि ऑक्सफर्ड सर्कस या भागांत गेलों. हिंदुस्थानांत आम्ही जी रोषणाई पहातों, त्या मानानें लंडनच्या या रोषणाईत कांहीं विशेष अर्थ वाटला नाहीं. मात्र 'सेल्फ्रिज्' म्हणून जो एक अवाढव्य स्टोअर लंडनमध्यें आहे, त्याच्यावरील रोषणाई अप्रतिम होती. महाराणी मेरी वगैरे राजकुटुंबांतील मंडळी याच स्टोअरमध्यें खरेदीकरितां बहुधा येतात. त्या प्रचंड इमारतीवर साम्राज्यांतल्या प्रत्येक देशाचें दृश्य दाखविणारें ॲल्युमिनिअमचें एक एक मजल्याइतकें उंच मोठेंथोरलें चित्र लावण्यांत आलें होतें. हिंदुस्थान दाखविणाऱ्या चित्रांत एक मोठा थोरला हत्ती, त्यावर एक महाराजा आणि आजूबाजूला माडाचीं झाडे वगैरे दाखविलीं होतीं. त्याचप्रमाणें कॅनडा, ऑस्ट्रेलिया इत्यादिकांचीं चित्रें होतीं. या भव्य देखाव्यांनीं इमारत सुशोभित करावयाला 'सेल्फ्रिज् स्टोअर्स 'नें पंचवीस हजार पौंड खर्च केले म्हणतात !

पिकॅडिलीचे एवढे रुंद रस्ते, पण 'लाइट्' पाहण्याकरितां इंग्लिश स्त्रीपुरुषांची इतकी प्रचंड गर्दी लोटली आहे, कीं पाय हालविल्याशिवाय मागून ढकलले गेल्यामुळेंच आम्ही पुढें जातों आहोंत ! दुसऱ्या एका रस्त्यावर आम्ही वळलों, तों तोंडानें बाजा वाजवीत आणि गाणीं म्हणत समोरून येत असलेले फाटकेतुटके कपडे घातलेले, पण धिप्पाड असे लोक दिसले. आम्हांला वाटलें, ते भिकारी असतील. पण जवळून पहातां त्यांच्या गळ्यांत पाट्या होत्या, त्यांवर 'We are starving. We are unemployed South Wales miners. Help us !' अशीं अक्षरें होतीं ! पांच खंडांत पसरलेल्या ब्रिटिश साम्राज्याच्या सम्राटाच्या राज्याभिषेकाचा आनंदीआनंद सर्वत्र चालला असतां मध्येंच अवचित दिसलेलें हें दृश्य पाहून कुणीही मनुष्य दचकल्याशिवाय राहिला नसेल !

* * *

## ता. १४ मे–

### *ब्रिटीश म्युझियम*

आज सकाळीं अकरा वाजतां सुप्रसिद्ध ' ब्रिटिश म्यूझियम ' पहावयास मी गेलों. केवढा प्रचंड हा म्यूझियम ! किती म्हणून त्याचे विभाग ! इजिप्शियन विभाग, आर्क्टिक, एशियाटिक, ॲसीरियन्, सुमेरियन्, बाबिलोनियन्, हिंदी असे कितीतरी विभाग आहेत. प्रत्येक विभागांत त्या त्या देशांतल्या अमोल प्राचीन वस्तु व्यवस्थित मांडून ठेवलेल्या आहेत. आर्क्टिक विभागांत एस्किमो लोकांच्या विशिष्ट होड्या पहावयास मिळाल्या. हिंदी विभागांत प्राचीन भारतांतील नाणीं, जरीचे कपडे, सोन्याचे दागिने अशा कितीतरी कुतूहलजनक वस्तु मीं पाहिल्या. हें म्यूझियम पाहिलेंच पाहिजे. त्याचें वर्णन करून सांगतां येणार नाहीं.

ब्रिटिश म्यूझियमचें प्रख्यात वाचनालय पाहून तर अवर्णनीय समाधान वाटतें. कसल्याहि विषयाचा अभ्यास करावयाचा असेल तर तुम्ही तिथें जा. खुर्ची, टेबल, दिवाबत्ती, पुस्तकें, संदर्भग्रंथ तुमच्या सेवेला तयार ! तुम्हीं फक्त अगोदर ठराविक परवानगी घ्यावयाची. मग कसलाहि खर्च नाहीं. याच वाचनालयांत बसून जगांतल्या कितीतरी नामांकित विद्वानांनीं आपले जगद्विख्यात ग्रंथ लिहिले. कार्ल मार्क्सनें आपलें ' कॅपिटल् ' इथेंच लिहिलें. लेनिननें तत्त्वज्ञानाचा अभ्यास इथेंच बसून केला. हें वर्तुळाकार भव्य वाचनालय पाहिलें कीं अंतःकरण थरारून येतें आणि ब्रिटिश लोकांना हजार खून माफ करावेसे वाटतात !

* * *

## ता. १५ मे–

### *समर एक्झिबीशन*

आज सकाळीं साडेदहा वाजतां सौ. लाड, श्री. लाड आणि मी रॉयल ॲकॅडेमीचें 'समर एक्झिबिशन' पहावयाला सुप्रसिद्ध बर्लिंग्टन हाऊसमध्ये गेलों. दुपारचें जेवण वगैरे तिथेंच करून संध्याकाळीं चार वाजेपर्यंत सर्व चित्रें आम्हीं पाहून काढलीं. ' डिप्लोमा ' आणि ' गिब्सन् '

गॅलरी या सुप्रसिद्ध गॅलऱ्यांतील मायकेल अँजेलो, लिओनार्डो डीव्हिन्ची इत्यादि विख्यात प्राचीन चित्रकारांचीं आणि लॉरा नाइट, ऑग-स्टस् जॉन्, वगैरे आधुनिक श्रेष्ठ कलावंतांचीं चित्रें पहावयास मिळालीं. कौतुक करण्यासारखी एक वस्तु इथें पहावयास मिळाली, ती म्हणजे सर जोशुआ रेनॉल्ड्स् हे अठराव्या शतकांतले इंग्लंडचे सुप्रसिद्ध चित्रकार चित्रें काढतांना आपल्या 'मॉडेल्स'ना ज्या खुर्चीवर बसवीत असत ती जुनाट खुर्ची! सर जोशुआ हे इंग्लंडच्या रॉयल ॲकॅडेमीचे पहिले अध्यक्ष आणि डॉ. जॉनसन्, गोल्डस्मिथ इत्यादिकांचे समकालीन आणि एका बैठकींतले मित्र. या खुर्चीवरल्या गादीचीं लक्तरें झालीं आहेत, पण इंग्लिश जनतेनें तीं प्रेमानें राखून ठेवलीं आहेत.

* * *

## ता. १६ मे—

### *किती शांत हें केंब्रिज गांव !*

श्री. लाड व सौ. लाड यांच्याबरोबर आज मी केंब्रिजला जात आहें. लाड हे केंब्रिजचे बी. ए. आहेत. केंब्रिज येथें ते दोनतीन वर्षें होते. त्यामुळें त्यांच्याबरोबर केंब्रिज पहाण्यांत मौज आहे. लिव्हरपूल स्ट्रीट या लंडनमधील स्टेशनावरून सकाळीं ११-२० च्या गाडीनें आम्ही निघालों आणि १२-३५ ला केंब्रिजला पोंचलों.

केंब्रिज हें खेडेंवजा टुमदार इंग्लिश शहर आहे. येथें ट्रॅम् नाहीं, 'ट्यूब' नाहीं, फक्त 'बसेस्' आहेत. श्री. लाड केंब्रिज येथील संस्कृतचे प्रोफेसर रॅप्सन् यांना भेटावयाला गेले. तोंपर्यंत मी एकटाच गांवांत भटकत होतों. जिकडेतिकडे गर्द झाडी आणि हिरवळ असलेल्या या गांवांत भटकावयाला मोठी मजा वाटते. मध्येंमध्यें तळीं आणि ओढे आहेत आणि त्यांत हंस पक्षी तरंगतांना दिसतात. रस्त्यावर गर्दी नाहीं, खडखडाट नाहीं—सर्व कांहीं शांतप्रशांत. पुण्यासारखे सायकलवरून जाणारे खूप विद्यार्थी दिसले. प्रत्येकाच्या सायकलच्या हँडल्वर एक लहानशी वेताची टोपली पाहून मला मोठी मौज वाटली. ही भाजीची टोपली कशाकरितां, तें मला कळेना! नंतर लाडांकडून असें कळलें, कीं लेक्चरसाठीं एका कॉलेजांतून

दुसऱ्या कॉलेजांत तासातासाला विद्यार्थ्यांना पळावें लागतें; तेव्हां या टोप-लींत ते आपलीं पुस्तकें आणि वह्या ठेवतात !

दुपारीं १ वाजतां 'व्हेनीशियन रेस्टोरां' नांवाच्या एका लहानशा उपहारगृहांत मीं लंच घेतला. विद्यार्थी आणि त्यांच्या मैत्रिणी यांनीं दुकान गजबजून गेलें होतें. पुण्यांत जा मुंबईत जा, अगर केंब्रिज येथें जा, विद्यार्थ्यांची गडबड आणि हंसणेंखिदळणें कुठेंहि सारखेंच. केंब्रिजमध्यें एक नवी फॅशन मला अशी दिसली कीं, मिशा भादरण्याऐवजीं केंब्रिज येथील बरेचसे विद्यार्थी अलीकडे बारीकशी मिशी ठेवूं लागले आहेत !

जेथें इंग्लंडचे मोठेमोठे राजकारणी पुरुष आणि लेखक येतात आणि विद्यार्थ्यांचे सुप्रसिद्ध वादविवाद होतात, तो केंब्रिज यूनिअनचा हॉल लाड यांनीं मला दाखविला. मद्रासचे शिक्षणमंत्री डॉ. सुब्बरायन् यांचे चिरंजीव कुमारमंगलम् यांचें नांव नोटीस बोर्डावरील बऱ्याचशा नोटिसांत प्रमुख जागीं दिसलें. ते बऱ्याचशा विद्यार्थ्यांच्या चळवळींत भाग घेतात असें दिसतें. दोनतीन दिवसांनीं विद्यार्थ्यांचा एक वादविवाद होणार आहे, त्याची नोटीस मीं बोर्डावर वाचली. एक विद्यार्थी पुढीलप्रमाणें ठराव मांडणार आहे—

'पुढील लोकांना आपल्या केंब्रिज युनिअनचे सभासद करून घेण्यांत यावेतः माजी राजे अमानुल्ला, माजी राजे आल्फान्सो, माजी आर्चड्यूक ऑटो आणि माजी कॉमरेड ट्रॉट्स्की.'

वाटेल ते वात्रट ठराव युनिअनपुढें मांडण्याची विद्यार्थ्यांना पूर्ण मुभा आहे याचें हें एक नमुनेदार उदाहरण होय.

केंब्रिजमधलीं ट्रिनिटी, किंग्ज, इमॅन्युएल, कीस्, सिंजन इत्यादि तीनतीनशें चारचारशें वर्षांचीं जुनीं कॉलेजें श्री. लाड यांनीं मला दाखविलीं. आठव्या आणि सातव्या हेन्रीच्या वेळीं बांधलेल्या या जुनाट काळोख्या इमारती पाहिल्या कीं इंग्रजांच्या पुराणप्रियतेची आणि परंपरेच्या अभि-मानाची मोठी मौज वाटते. पंडित जवाहरलाल नेहरू ट्रिनिटी कॉलेजांत होते. डॉ. परांजपे आणि डॉ. महाजनी हे सिंजन् कॉलेजमध्यें ज्या खोल्यांतून रहात होते, त्या खोल्या लाड यांनीं मला दाखविल्या.

प्रत्येक कॉलेजच्या मागें गर्द झाडी आणि जंगलें ( Woods )

आहेत. त्यांना कॉलेजच्या 'बॅक्स' (Backs) म्हणतात. या झाडांखालीं बसून थंडपणें वाटेल तितका अभ्यास करावा.

संध्याकाळचें जेवण ' किंग्ज परेड ' नांवाच्या लहानशा दुकानांत आम्हीं घेतलें. केंब्रिजमधून वहाणाऱ्या ' कॅम् ' नदींतले ताजेताजे चवदार ' ट्राउट् ' मासे आम्हांला खावयाला मिळाले.

* * *

## ता. १७ मे—

### *असला पोरकटपणा (!) हिंदुस्थानांत दिसेल !*

आज ' व्हिट मण्डे ' असल्यामुळें ' बॅंक हॉलिडे ' आहे. आमच्याजवळच असलेल्या हॅंपस्टेड् हीथवर आज रात्रीं मोठी थोरली जत्रा भरणार आहे. पाहूं या इंग्लिश जत्रा कशी काय असते ती.

दुपारीं लंडनमधला कॅमड्न टाउन ' झू ' पहावयाला गेलों. हें प्राणिसंग्रहालय खूप मोठें आहे. पण मुंबईतील राणीच्या बागेंतील संग्रहालय मला याहूनहि चांगलें वाटतें. मात्र येथें ' ॲक्वेरियम ' किंवा मत्स्यसंग्रहालय जें आहे तें अत्यंत प्रेक्षणीय आहे. अर्धा इंच लांब माशापासून तों सहा फूट लांब माशांपर्यंत असंख्य आकारांचे आणि इंद्रधनुष्यालाहि लाजवणाऱ्या रंगांचे हरतऱ्हेचे मासे कांचेच्या घरांतून ठेवलेले आहेत. प्रत्येक माशाच्या भोंवतीं त्याचें नैसर्गिक वातावरण निर्माण करण्याचा प्रयत्न केलेला आहे. कुठें शेवाळ आणि समुद्रतळाशीं असलेल्या वनस्पति तर कुठें ऊष्ण प्रदेशांतील झुडुपें मुद्दाम लावलेलीं आहेत. एकंदर देखावा मोठा मनोरम दिसतो. 'रेप्टाइल हाऊस'मध्यें बेडकापासून तों मगरीपर्यंत सर्व तऱ्हेचे सरपटणारे प्राणी आहेत.

रात्रीं जेवणानंतर जत्रा पहावयाला आम्ही हॅंपस्टेड हीथवर गेलों. मुंबईतील महालक्ष्मीची किंवा कापाच्या मैदानावरील नारळी पौर्णिमेची जत्रा ज्यांनीं पाहिली आहे, त्यांनीं फक्त काळ्या किंवा गोरट्या चेहेऱ्याऐवजीं पांढऱ्या चेहेऱ्यांच्या गर्दीची कल्पना करावी, कीं हिंदुस्थानांतल्या जत्रेंत आणि या जत्रेंत कांहींएक फरक नाहीं ! तेच गरगर फिरणारे पाळणे,

तेच गोल फिरणारे लांकडी घोडे, तसलींच खेळांचीं दुकानें आणि आरडा ओरड, धक्काबुक्की करणारा तसलाच जनसमुदाय! बायकांमुलांना घेऊन चांगले चांगले इंग्लिश सद्गृहस्थ आज वाटेल तसले पोरकट खेळ येथें मनसोक्त खेळत आहेत. आमच्या हिंदुस्थानांत हें मात्र आढळणार नाहीं. 'सभ्य' कुटुंबवत्सल लोक एक दिवस कां होईना, पण सर्व घरबंध सोडून देऊन मनमोकळेपणानें असला पोरकटपणा करतील ? छेः, अशक्य !

एक खेळ आपल्या हिंदी जत्रेंत नसतो तो या इंग्लिश जत्रेंत होता. 'हॉंटेड हाऊस' ( Haunted House ) नांवाचें एक घर केलेलें होतें. तीन पेन्स देऊन आंत शिरावयाचें. आंत वांकडेतिकडे, उंचसखल, पायांखालून निसटणारे असे अरुंद रस्ते आणि मिट्ट काळोख. एका दरवाजानें आंत गेलें, कीं दुसऱ्या बाजूच्या दरवाजाशिवाय बाहेर पडतां येत नाहीं. तरुणतरुणी अहमहमिकेनें या घरांत शिरत होतीं. आंत काय होत असेल हें सांगण्याची जरुरीच नाहीं ! आरडाओरड, हास्याचे कल्लोळ आणि किंचाळ्या आंतून ऐकूं येत असत !

* * *

## ता. १८ मे—

मी ज्या बोटींतून रशियाला जाणार आहें ती ता. २६ मे रोजीं सुटावयाची आहे. पण रशियाचा पासपोर्ट मला मिळणार किंवा नाहीं तें मला अजूनहि कळलेलें नाहीं. फेनर ब्रॉकवे आणि सर स्टॅफोर्ड क्रिप्स् या पार्लमेंटच्या दोन मजूर सभासदांसाठीं माझ्याकडे परिचयपत्रें आहेत. पण परराष्ट्र खात्याकडून माझ्या पासपोर्टसंबंधीं नक्की काय तें कळल्याशिवाय या दोघांच्या ओळखीचा कांहींच उपयोग करतां येत नाहीं.

* * *

## ता. १९ मे—

### *शहरांतलें रान !*

केंस कापून घेण्याकरितां आज एका सलूनमध्यें गेलों. तिथला म्हातारा इंग्लिश हजाम सर्व जगांतल्या न्हाव्यांसारखाच मोठा जिज्ञासु

आणि बोलका होता. "मध्या तुमच्या मुंबईंत भयंकर उन्हाळा असेल नाहीं?" त्यानें मला विचारलें.

"हो तर!" मी म्हणालों.

"मग मुंबईचे लोक दार्जिलिंगला जात असतील उन्हाळ्यांत!" तो म्हणाला.

त्याला एक दार्जिलिंग माहीत होतें असें दिसतें. आपणाला हिंदुस्थानची खूप माहिती आहे असें 'इंप्रेशन्' त्याला मारावयाचें होतें! मीं हंसून त्याला दार्जिलिंग कुठें आहे आणि मुंबई कुठें आहे तें सांगितलें तेव्हां तो नरमला!

आज संध्याकाळीं हॅंपस्टेडमधलें 'केनवुड' नांवाचें जंगल (wood) पहावयाला गेलों. लंडन काउंटी कौन्सिलनें हें इतक्या नैसर्गिक अवस्थेंत ठेवलें आहे, कीं आंत गेल्यावर आपण लंडन शहराच्या एका भागांत आहोंत असें कुणाला सांगितलें तर त्याचा विश्वासहि बसणार नाहीं. आंत तळीं आहेत, त्यांत हंस पक्षी पोहतांना दिसतात. त्याप्रमाणेंच गर्द झाडींतून निरनिराळे रस्ते आहेत, त्यांवरून जातांना वाट चुकूं नये म्हणून ज्या पाट्या आहेत त्या रंगीत नसून झाडाचेच ढलपे काढून त्यांवर अक्षरें कोरलीं आहेत. कोणत्याहि प्रकारच्या कृत्रिमतेनें जंगलाची निसर्गशोभा बिघडूं नये याची अत्यंत काळजी घेण्यांत आली आहे. सर्व सुखसोयींसाठीं माणसाचा हात या जंगलावरून फिरला आहे, पण तो इतक्या सफाईदारपणें, कीं तो फिरला आहे असा भाससुद्धां होऊं नये.

गॉवर स्ट्रीटमधल्या हिंदी विद्यार्थ्यांच्या वसतिगृहांत मी आज गेलों होतों. हें गृह ज्या इमारतींत आहे तिथें पूर्वीं सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ चार्लस डार्विन रहात असे, असें म्हणतात. दारावरच एका लहानशा चौकोनी दगडावर 'Darwin lived here' अशीं अक्षरें कोरलेलीं आहेत.

* * *

ता. २० मे–

*किती चांगली ही लंडनच्या नागरिकांची सोय !*

माझे मुंबईतले एक मित्र श्री. सुरेश वैद्य गेलीं चारपांच वर्षें इंग्लंड-मध्यें स्थायिक होऊन राहिले आहेत. त्यांच्याकडे आज दुपारीं मीं 'लंच'ला गेलों. 'पटनी ब्रिज' या लंडनच्या भागांत ते रहातात. यांचा विशेष उल्लेख करावयाचें कारण असें कीं लेखकाचा व्यवसाय करून ते इथें आपला चरितार्थ चालवीत आहेत. लंडनमधील 'क्वीन्स प्रेस' या प्रकाशकांनीं त्यांची 'कैलास' ही कादंबरी नुकतीच प्रसिद्ध केली आहे. मुंबईतील गिरणीकामगारांच्या जीवनासंबंधीं 'किंग कॉटन' नांवाची दुसरी कादंबरी ते लिहीत आहेत. पटनी ब्रिज येथील फुलहॅम पार्क गार्डन्स रोड-वर एका लहानशा तीन खोल्यांच्या ब्लॉकमध्यें ते रहातात. मिस मॅज फ्रँकिस नांवाच्या एका इंग्लिश मुलीशीं त्यांचा विवाह झाला असून त्यांना एक छोटी कन्याहि आहे. तिचें नांव जलबाला. तिची इंग्लिश आई तिला 'जिल्ला' म्हणते ! मुलीला मराठी भाषा शिकविण्याची वडिलांची जोराची खटपट चालू आहे !

सौ. वैद्य मोठ्या समजूतदार आणि सुस्वभावी दिसल्या. एखाद्या हिंदु बाईप्रमाणें घरकाम त्या स्वतः करतात. आज ना उद्यां 'स्वदेशीं' येण्याचा दोघांचाहि विचार आहे.

या पटनी ब्रिज भागांत बिशप्स गेट पार्क नांवाची खूप मोठी बागाईत जमीन आहे. या जागेची लंडनच्या काउंटी कौन्सिलनें,–किंवा लंडन म्युनिसिपालिटीनें म्हणा, मोठी मजेदार व्यवस्था केली आहे. कुणा-लाहि बागबगीचा किंवा भाजीपाला लावावयाचा असेल, तर एक लहानसा जमिनीचा तुकडा आठवड्याचे फक्त दोन शिलिंग या भाड्यानें देण्यांत येतो. आपणाला हवी ती भाजी, फुलें तिथें लावावीं आणि घरीं घेऊन जावीं. ज्यांना बागबगीचा किंवा स्वतःचा भाजीपाला मिळविण्याची खूप हौस आहे, पण जमीन विकत घेण्याइतका जवळ पैसा नाहीं, अशा सामान्य माणसांची किती सुंदर सोय यामुळें झाली आहे ! लंडन काउंटी कौन्सिलचा कारभार खरोखरच अत्यंत नमुनेदार आणि लोकप्रिय आहे.

कुणाला टेनिस खेळावयाचें असेल तर एल्. सी. सी. चीं हवीं तितकीं टेनिस कोर्टें आहेत. चौघांनीं मिळून एक ' कोर्ट ' घ्यावें. तासाचें भाडें फक्त एक शिलिंग. ' बोटिंग ' करावयाचें असेल तर हाइड पार्कमध्यें एका तासाला ६ पेन्स टाकले कीं एक सबंध होडी तुमच्या ताब्यांत. लंडन काउंटी कौन्सिल जवळजवळ गेलीं दहाबारा वर्षें मजूर पक्षाच्या किंवा सोशालिस्टांच्या हातांत आहे; आणि पार्लमेंटमध्यें ' कॉंझर्वेटिव्ह ' पक्षानें जरी भक्कम बहुमत केलेलें असलें तरी एल्. सी. सी.च्या निवडणुकींत सोशालिस्टांकडून त्यांना गेलीं कित्येक वर्षें सारखा बेदम मार मिळतो आहे. लंडन शहराचा कारभार सोशालिस्ट चालवतात आणि त्यांनीं तो इतक्या आदर्श रीतीनें चालविला आहे, कीं मतदारांपुढें कॉंझर्वेटिव्हांचें कांहीं चालत नाहीं.

आमच्या हॅंपस्टेड्च्या टाऊन हॉलमध्यें आज रात्रीं ' स्पेन एड् कमिटी ' तर्फे एक कार्यक्रम आहे. कार्यक्रमाचें उत्पन्न स्पेनमध्यें एक अँब्युलन्स गाडी पाठविण्याकरितां देण्यांत येणार आहे. सध्यां हॅंपस्टेड्मध्यें ' स्पेनसप्ताह ' चालू आहे. ही गाडी विख्यात इंग्लिश नटी सिबिल् थॉर्नडाइक हिच्या हस्तें स्पॅनिश सरकारला अर्पण करण्यांत येणार आहे.

' न्यूज फ्रॉम स्पेन ' नांवाची एक फिल्म दाखविण्यांत आली. माद्रिदच्या आघाडीवर प्रत्यक्ष जाऊन घेतलेल्या हृदयद्रावक देखाव्यांची ही फिल्म होती. स्पेनच्या ' आलिकांते ' बंदरांत सोव्हिएट रशियाचें जहाज अन्नसामुग्री घेऊन आलें हा देखावा जेव्हां पडद्यावर आला तेव्हां प्रेक्षकांनीं टाळ्यांचा एकच कडकडाट केला !



## ता. २१ मे—

### *इंग्लंडच्या दुर्दशेचीं कारणें !*

सर्वसामान्य ब्रिटिश नागरिकांच्या अजब राजकीय ज्ञानाची एक लहानशी चुणूक मला आज दिसली. संध्याकाळीं मी सहज बाहेर पडलों. आमच्या पार्लमेंट हिल्च्या पायथ्याशीं नेहमींप्रमाणें एक ' सभा ' चालली होती. एक कम्युनिस्ट वक्ता इंग्लंडमधल्या बेकारीचें हृदयद्रावक वर्णन

करीत होता. एक मोठा थोरला आल्सेशियन कुत्रा बरोबर घेऊन फिरावयाला आलेली एक गलेलठ्ठ, मध्यमवयस्क श्रीमंत बाई श्रोतृवर्गांत उभी होती. तिनें मध्येंच वक्त्याला थांबवलें आणि ती म्हणाली,

"इंग्लंडच्या दुर्दशेचीं कारणें मी सांगतें. इंग्लंडमध्यें स्कॉचमेन, आयरिश, ज्यू इत्यादि परदेशी–Foreigners (?) लोकांची फार गर्दी झाली आहे; म्हणून इंग्लंडची बेकारी वाढत्या प्रमाणांत आहे!"

(राजकारणाचें इतकें अकटोपासून विकटोपर्यंत ज्ञान असलेल्या या इंग्लिश बायांच्या मतांच्या जोरावर जे शहाणे पार्लमेंटमध्यें निवडून येतात ते आमच्यावर राज्य करतात!!)

* * *

## ता. २२ मे–

### *शॉचें कँडिडा*

आज मला अत्यंत आनंद झाला आहे. रशियाचा पासपोर्ट मला मिळाला. पण दुपारीं 'इंटूरिस्ट'मध्यें जातों तों दुसरीच अडचण उत्पन्न झाली आहे. रशियन सरकारचा 'व्हिसा' अजून मॉस्कोहून आला नाहीं.

हॅंपस्टेडजवळच असलेल्या गोल्डर्स ग्रीन येथील हिप्पोड्रोम थिएटरांत आज रात्रीं सव्वा आठ वाजतां बर्नार्ड शॉचें सुप्रसिद्ध 'कँडिडा' नाटकें आहे, आणि त्याहूनहि महत्वाची गोष्ट म्हणजे 'कॅव्हलकेड्' या फिल्म-मध्यें प्रसिद्धीस आलेली सुप्रसिद्ध नटी डायाना वायनार्ड त्यांत कँडिडाचें काम करणार आहे.

रात्रीं आठला मी थिएटरांत गेलों. बरोबर सवाआठला पडदा वर गेला. राज्याभिषेक–समारंभाची सर्व फिल्म पहिलीं वीस मिनिटें दाख-विण्यांत आली. भली खोड मोडली शॉची थिएटरवाल्यानें! नंतर नाटक सुरू झालें. काळे डिनरसूट घातलेल्या पुरुषांचा आणि उघड्या पाठीचे झगे घातलेल्या स्त्रियांचा नुसता समुद्र थिएटरांत उसळला आहे. आणि प्रत्येक स्त्रीपुरुषाच्या तोंडांत सिगारेट असल्यामुळें सर्व थिएटर धुरानें भरून जाऊन माझा जीव तर गुदमरल्यासारखा होतो आहे. पांच शिलिंग दहा पेन्स देऊन ग्रँड सर्कलची तिकिटें मीं घेतलीं आहेत. बसावयाची लाल मखमलीची

खुर्ची छानदार आहे; पण थिएटर मात्र मुंबईतल्या रॉयल ऑपेरा हाऊस-पेक्षां कांहीं विशेष चांगलें असें वाटलें नाहीं.

नाटक मात्र सुंदर रंगलें. डायाना वायनार्डचें 'कॅंडिडा'चें काम अप्रतिम झालें. मात्र प्रत्येक अंकानंतर लोकांनीं टाळ्यांचा कडकडाट केला कीं सर्व नटनटी पडद्याबाहेर येऊन मान लववून टाळ्यांचा स्वीकार करतात तें मला कसेंसेंच वाटलें. क्षणापूर्वी नाटकांत मारामारी केलेलीं पात्रें हातांत हात घालून गुण्यागोविंदानें मध्येंच पुढें आलेलीं पाहिलीं, कीं नाटकाचा विरस होतो असें मला वाटतें. शॉला हें कसें काय पसंत पडतें कुणाला ठाऊक! सर्व नाटक संपल्यावर शेवटीं सर्व पात्रें बाहेर आलीं तर एक वेळ कदाचित् तें क्षम्य ठरेल; पण हा प्रकार मला कृत्रिम आणि आधुनिक नाट्यतंत्राला गालबोट लावणारा वाटतो. नाटक सव्वा-अकराला संपलें.

* * *

## ता. २३ मे—

आजच्या दिवसाचा विशेष म्हणजे हिंदुस्थानसारखें कडक ऊन पडलें आहे. अर्थात् उष्णतामान मुंबईत उन्हाळ्यांत असतें त्यापेक्षां खूप कमी आहे. हिंदुस्थानांतली उष्णता पत्करली, पण ही उष्णता मात्र आम्हांला सहन होत नाहीं. आमच्या इंग्लिश मित्रांना वाटतें, कीं आज आम्हांला अगदीं घरच्यासारखें वाटत असेल. पण आमचा जीव कासावीस होत आहे. मला हेंच सारखें राहूनराहून आश्चर्य वाटतें! हिंदुस्थानांत कमालीच्या उष्णतेची संवय असलेल्या आम्हां हिंदी लोकांचा या एवढ्याशा युरोपियन उष्णतेनें जीव नकोसा कां होतो? प्रत्येक हिंदी विद्यार्थ्यांचा हाच अनुभव आहे. मला वाटतें, या हवेंत दमटपणा असतो आणि त्यात उष्णता मिसळली कीं हवेचा चमत्कारिक परिणाम होतो!

* * *

ता. २४ मे–

*कॉमरेड स्लेटर.–ही पार्लमेंटची सभा !*

'लेफ्ट (Left) थिएटर'चे एक प्रमुख चालक आणि इंग्लंडचे एक तरुण नाटककार मि. मॉंटेग्यू स्लेटर यांची आणि माझी मुलाखत आज दुपारीं इथें जवळच असलेल्या 'बेनॉ रेस्टोरॉं'मध्यें व्हावयाची आहे. श्री. सुरेश वैद्य यांनीं आमची ओळख करून दिली आहे. आम्हीं मराठी रंगभूमीवर जशी नाट्यमन्वंतरची खटपट केली, तसलीच खटपट मि. स्लेटर इंग्लिश रंगभूमीवर करून राहिले आहेत. मला असल्याच 'धडपड्यां'ना भेटावयाची अत्यंत उत्सुकता आहे. शॉ, बॅरी, वेल्स या इंग्लंडमधल्या बड्या धेंडांना मी भेटत नाहीं आणि स्वतःचा मोठेपणा मिरवण्यासारखें इंग्लंडहून हिंदुस्थानला कांहीं आणीत नाहीं, म्हणून हिंदुस्थानांतले माझे कांहीं मित्र माझ्यावर रागावतील. पण खरोखरच या बड्या धेंडांना भेटून काय करावयाचें तेंच मला समजत नाहीं ! त्यांना पहाण्यापलीकडे मी काय करणार आणि मला तरी ते काय सांगणार ? त्यांना काय सांगावयाचें आहे तें मी त्यांच्या जगप्रसिद्ध ग्रंथांतूनच वाचूं शकतों. असो.

दुपारीं कॉमरेड स्लेटरची आणि माझी भेट झाली. ठेंगणासा, किडकिडीत, स्लेटर मोठा खेळाडू गडी आहे. नवीन तऱ्हेचीं नाटकें पुढें आणतांना स्लेटरला ज्या अडचणी येतात त्यांत आणखी नाट्यमन्वंतरच्या वेळीं आम्हांला आलेल्या अडचणींत विशेष फरक मला वाटला नाहीं. मात्र तो करीत असलेल्या दोन गोष्टी नाट्यसृष्टींत नवीन प्रयोग करतांना मला मराठी रंगभूमीवर कराव्याशा वाटतात. कदाचित् अशा तऱ्हेनें प्रयोग केल्यास नाट्यमन्वंतरपेक्षां ते यशस्वी होतील.

पहिली गोष्ट म्हणजे, रंगभूमीवर काम करूं पहाणाऱ्या हौशी तरुण-तरुणींचा एक गट करावयाचा. त्यांमधून प्रत्येक नाटकाच्या वेळीं जरूर तेवढे लोक निवडावयाचे. आणि दुसरी गोष्ट अशी, कीं हीं प्रायोगिक नाटकें नाट्यमन्वंतराप्रमाणें धंदा म्हणून करावयाचीं नाहींत, तर पहिल्यांदा पैसे देऊन येणाऱ्या निवडक शेंदोनशें रसिक प्रेक्षकांसमोर करून दाखवावयाचीं. हे रसिक उपरोक्त हौशी गटानें कायमचे आश्रयदाते (Patrons)

म्हणून अगोदरपासून जमवून ठेवावयाचे. अशा तऱ्हेनें नाटक यशस्वी झाल्यास मग इतरांसाठीं शक्य असल्यास आणखी प्रयोग करावयाचे.

अर्थात् ही नुसती ओझरती रूपरेषा झाली. यासंबंधीं एक विस्तृत योजना माझ्या मनांत घोळते आहे. ती केव्हांतरी मी पुढें मांडीन.

स्लेटरची मुलाखत मला जितकी आनंददायी, तितकीच उद्बोधक वाटली. ‘Easter 1916’ आणि ‘New Way Wins’ हीं आपलीं दोन नाटकें स्लेटरनें मला भेट दिलीं. आपणांशीं हिंदुस्थानहून पत्रव्यवहार चालू ठेवण्याची त्यानें मला आग्रहाची विनंति केली.

आज पार्लमेंटची बैठक सुरू झाली. ‘इंडिया ऑफिस’ची खास परवानगी घेऊन संध्याकाळीं चार वाजतां पार्लमेंटमधला वादविवाद ऐकावयाला मी मुद्दाम गेलों. पार्लमेंटची इमारत खूप भव्य आणि प्राचीन असली तरी यांतला काळोख आणि कोंदटपणा पाहिला कीं आमच्या मुंबई म्युनिसिपालिटीचा हॉल अधिक सुंदर वाटतो,—दिल्लीच्या असेंब्लीची इमारत दूरच राहो! या काळोख्या जागेंत जुनाट बांकड्यावर बसलेले हे सहाशें लोक ब्रिटिश साम्राज्याचा राज्यकारभार हांकतात! छे, खरें नाहीं वाटत!

आज बाल्डविन हजर नाहींत. अर्थमंत्री नेव्हिल चेंबर्लेन सरकारतर्फे भाषण करताहेत. ‘सिव्हिल लिस्ट’ किंवा राजघराण्यांतल्या मंडळींना द्यावयाच्या तनख्यावर वादविवाद चालला आहे. राजकुमारी प्रिन्सेस एलिझाबेथ हिला सध्यां वर्षाचे किती पौंड द्यावयाचे आणि कधीं काळीं तिनें लग्न केल्यास तिला किती द्यावे लागतील, या मुद्द्याचा चेंबर्लेन खल करताहेत.

“राजकुमारीचें लवकरच लग्न वगैरे कांहीं होणार असल्याची ‘आंतली बातमी’ तुम्हांला कांहीं आहे का?” एका तरुण मजूर सभासदानें मिस्किलपणें विचारलें.

‘छे बुवा! सध्यां तरी कांहीं चिन्ह दिसत नाहीं!’ चेंबर्लेन यांनीं हंसत हंसत उत्तर दिलें. नंतर विरुद्ध पक्षाचे पुढारी, मजूरपक्षाचे नेते मेजर ॲटली बोलले. हा बुटका गृहस्थ पार्लमेंटच्या विरोधी पक्षाचा पुढारी शोभण्यापेक्षां एकाद्या लहानशा इंग्लिश खाणावळीचा (Inn) मालक म्हणून चांगला शोभेल! विन्स्टन चर्चिल यांचें भाषण काय तें, वक्तृत्व या दृष्टीनें मला परिणामकारक वाटलें. ते बोलत असतांना सभागृहांत हास्याचे सारखे कल्लोळ उठत होते. स्वतंत्र मजूरपक्षाचे मि. मॅक्सटन

यांनीं 'राजा' हीं संस्थाच काढून टाकावी आणि ठेवावयाचीच असेल तर शेंपांचशें पौंड पगार देऊन ठेवावी,—लाखों पौंडाचा चुराडा करून ठेवूं नये असें सुचविलें !

पाऊणएक तासांतच या कोंदट वातावरणाचा आणि या पोरकट वादविवादाचा मला कंटाळा आला.

हे लोक आमच्यावर आणि अवाढव्य ब्रिटिश साम्राज्यावर सत्ता गाजवतात, यावर कुणाचाच विश्वास बसणार नाहीं ! ब्रिटिश साम्राज्याचें प्रचंड लष्कर आणि अजस्र आरमार हेंच ब्रिटिश सत्तेचें खरें केंद्र. हा बोलूकाकांचा मेळा काय करणार ?

* * *

## ता. २५ मे—

### *तिकिटाचा घोटाळा*

उद्यां माझी रशियाची बोट सुटणार आणि अजून माझ्या तिकिटाचा पत्ता नाहीं !

' इंटुरिस्ट 'मध्यें आज दुपारीं जाऊन चवकशी केली, तेव्हां सर्व कांहीं तयार असल्याचें त्यांनीं मला सांगितलें. माझा आनंद गगनांत मावेना. पण तिकिटें पाहतों तों प्रो. रॅफेच्या गटांतल्या इतर माणसांप्रमाणें लंडन ते लेनिनग्राड आणि लेनिनग्राड ते लंडन अशींच तिकिटें माझींहि तयार करून ठेवलेलीं ! मला लंडनला पुन्हा यावयाचें नाहीं, मला मॉस्कोहून रेल्वेनें बर्लिन—पॅरिसला जावयाचें आहे असें सांगितलें असूनहि या लोकांनीं हा घोंटाळा केला ! काय म्हणावें या इंटूरिस्टला ? रेल्वेनें यावयाचें म्हणजे पोलंडची सरहद्द ओलांडली पाहिजे. म्हणजे पोलंडच्या कॉन्सलचा ' व्हिसा ' पाहिजे. आणि साहजिकच माझ्यासाठीं तो या लोकांनीं घेतलेला नाहीं. मी कपाळाला हात लावला. तेव्हां कसेंहि करून उद्यां सकाळीं पोलंडच्या वकिलातींतून तुमचा ' व्हिसा ' मिळवतों आणि तुमचीं तिकिटें बदलून देतों म्हणून त्यांनीं मला सांगितलें. दुपारीं व्हिसा मिळणार आणि संध्याकाळीं सहाला माझी बोट सुटणार !

काय व्हायचें तें होवो. उद्यां मी सोव्हिएट बोटीवर पाय ठेवणार खरा.

* * *

# लाल ताऱ्याकडे–

## ता. १६ मे–

*इतरांत नाहीं व रशियन बोटीवर आहे तें हें !–मोठा उमदा गडी आहे हा माझा पार्टनर !–किती सुस्त हे रशियन लोक !–रशियांत सुद्धां 'चाय'ला 'चाय' म्हणतात ?–कॉ. शिंडलर.*

आज संध्याकाळीं ६ वाजतां सोव्हिएज जहाज एस्. एस्. सिबिर लेनिनग्राडला जावयास निघणार. दुपारीं 'इंटूरिस्ट'च्या ऑफिसमध्यें गेलों. सर्व कांहीं त्यांनीं तयार ठेवलें होतें. पोलंडचा व्हिसा मिळाला होता. जातांना समुद्रमार्गानें लंडन ते लेनिनग्राड आणि परत येतांना मॉस्को–वॉर्सा–बर्लिन–पॅरिस याप्रमाणें रेल्वेचीं तिकिटें त्यांनीं तयार ठेवलीं होतीं. माझा जीव खालीं पडला एकदांचा.

एकदोन मित्रांना भेटून मी घरीं परत आलों आणि सामान बांधावयास सुरवात केली. थेम्स नदीवरील 'हेज् व्हार्फ' या धक्क्यावरून आमची एस्. एस्. सिबिर ६-३७ ला सुटावयाची आहे. संध्याकाळीं ५ वाजतां चाफेकरांच्या मोटारमधून 'हेज् व्हार्फ'ला जावयाला मी निघालों. ६ वाजतां तिथें पोंचलों, तों सर्व शुकशुकाट दिसत होता ! 'सिबिर' धक्क्याला लागून उभी होती; पण उतारूंची गडबड वगैरे कांहीं एक दिसेना. चहाच्या शेंकडों पेट्या धक्क्यावर पडल्या होत्या आणि इंग्लिश हमाल त्या बोटीवर चढवीत होते. प्रख्यात इंग्लिश लेखक डब्ल्यू. डब्ल्यू. जेकब्ज आपल्या लघुकथांतून ज्या प्रकारच्या इंग्लिश गोदीकामगा-

रांचीं, गोदींतील मासलेवाईक खलाशांचीं आणि तेथील एकंदर देखाव्यांचीं वर्णनें करतो त्या प्रकारचा तो देखावा होता.

मी ज्या बोटीनें विलायतेला आलों त्या 'कॅांटे व्हर्डे' पेक्षां 'सिबिर' बरीच लहान आहे. ४००० टनांचें तें एक जहाज आहे. एका हमालाकडे सामान देऊन मी, चाफेकर आणखी एक मित्र बोटीवर चढलों. एक टक्कल पडलेला रशियन ऑफिसर तिथें उभा होता. त्यानें हंसतमुखानें आमचें स्वागत केलें आणि माझें तिकीट पाहिल्यावर माझ्या केबिनच्या 'स्ट्यूअर्डेस'ला हांक मारली. एक उंच, धिप्पाड, मध्यम वयस्क रशियन बाई हातांत किल्ल्यांचा जुडगा हालवीत आमच्यापुढें येऊन उभी राहिली. माझी केबिन मला दाखवायला त्यानें सांगितलें. उतारूबरोबर येणाऱ्या मित्रांना किंवा पाहुण्यांना सोव्हिएट बोटीवर यावयास किंवा फिरावयास कांहींच मज्जाव दिसला नाहीं.

माझी तिसऱ्या वर्गाची केबिन छान आहे. एका केबिनमध्यें चारजणांची सोय आहे. पण अजून या केबिनमध्यें कुणीच दिसत नाहीं' 'कॅांटे व्हर्डे'प्रमाणेंच मला एकट्याला एक सबंध केबिन मिळणार कीं काय? जेवणाचा हॉल वगैरे सर्व कांहीं माझ्या केबिनजवळच आहे. सामान केबिनमध्यें ठेवलें आणि आम्ही वर आलों. या बोटीवरली म्यूझिक् रूम, स्मोकिंग रूम, डायनिंग हॉल वगैरे लहानसेच आहेत; पण अत्यंत सुरेख आणि आल्हाददायक आहेत. रशियन बोटीवर पहिला, दुसरा, तिसरा असे वर्ग नसतात अशी पुष्कळ लोकांची कल्पना आहे; पण ती चुकीची आहे. रशियांत सर्वांना सारखे पगार असतात किंवा असावेत अशी पुष्कळांची कल्पना आहे, त्याप्रमाणेंच हीहि एक कल्पनाच आहे. सर्व जग कांहीं साम्यवादी झालेलें नाहीं आणि अमेरिकेहून रशिया पहावयाला येणाऱ्या लक्षाधीशांना पहिल्या वर्गाचीं सुखें वाटेल तितका पैसा देऊन पाहिजेत. तीं रशियानें कां देऊं नयेत आणि त्यांच्याकडून पैसा कां उकळूं नये? मात्र दुसऱ्या कुठल्याहि इंग्लिश, जर्मन, फ्रेंच किंवा इतर युरोपियन बोटीवर नसते आणि रशियन बोटीवर असते तें हेंच कीं, जेवण्याचा हॉल आणि रहाण्याचें केबिन यांखेरीज बोटीवरल्या म्यूझिक रूम, स्मोकिंग रूम, स्विमिंग पूल, फिरावयाचें डेक इत्यादि सर्व सुखसोयी पहिल्या, दुसऱ्या





पॅरीस येथील जागतिक प्रदर्शना-मधील रशिया (वरील) व जर्मनी (बाजूचा) यांचे पॅव्हीलियन्स.

आणि तिसऱ्या वर्गांना एकच आहेत. पी. अँड ओ. किंवा इटालियन बोटीवर चातुर्वर्ण्याचा किंवा अस्पृश्यतेचा करडा अंमल असतो. पहिल्या वर्गाला स्मोकिंग रूम निराळी, तिथें दुसऱ्या वर्गाच्या उतारूलाहि जातां यावयाचें नाहीं. दुसऱ्या वर्गाचें डेक मोकळें पडलेलें असलें तरी तिसऱ्या वर्गाच्या उतारूला पाय मोकळे करण्याकरितां तिथें फिरतां यावयाचें नाहीं. त्यानें आपल्या तिसऱ्या वर्गाच्या अरुंद डेकवरच शतपावली केली पाहिजे. रशियन बोटीवर या सर्व सुखसोयी सर्वांना मिळून एकच आहेत.

पी. अँड ओ. किंवा इटालियन बोटीचा कॅप्टन नवस केला तरी तिसऱ्या वर्गाच्या उतारूच्या कधीं दृष्टीलासुद्धां पडायचा नाहीं. रशियन बोटीचा कॅप्टन आणि त्याच्या हाताखालचे अधिकारी वेळ मिळेल तेव्हां कुठल्याहि उतारूशीं गप्पा करीत बसतील किंवा त्यांच्याशीं मिळूनमिसळून बोटीवरले निरनिराळे खेळ खेळतील.

पहिल्या अर्ध्यापाऊण तासांतच आम्ही दोन चार रशियन शब्द शिकलों 'उतारूचें केबिन' म्हणजे 'पॅसेंजिआस्का काह्योटा' आणि 'येथें धूम्रपान करूं नये' या अर्थी 'ने कोरीश'! ६-३० ला चाफेकर आणि माझा दुसरा एक मित्र यांनीं निरोप घेतला आणि ते निघून गेले. आतां मात्र या सबंध जहाजावर मला एकटें वाटूं लागलें. विलायतच्या बोटीप्रमाणें आपले देशबांधव इथें या बोटीवर कुणी भेटणें दूरच, पण निदान इंग्लिश बोलणारे तरी कुणी सोबती भेटतील काय? माझ्या केबिनमध्यें एखादा रशियन किंवा दुसरा कुणी जर सोबती आला तर पांच दिवस या बोटीवर काढायचे कसे? 'इंटूरिस्ट' सर्व व्यवस्था करतात खरे; पण सोबत्यांची आणि दोस्तांची व्यवस्था करीत नाहींत! आणि साडेसहा वाजले तरी या बोटीवर असा शुकशुकाट कां? आठ वाजेपर्यंत स्मोकिंग रूममध्यें, इकडे तिकडे बसून, वर्तमानपत्रें वाचीत मीं वेळ काढला.

आठ वाजण्याच्या सुमाराला सहज जेवणाच्या हॉलकडे गेलों, तों तिथें बसलेल्या एका युरोपियन बाईबरोबर एक चष्मा लावलेला पोरगेलासा गुजराथी विद्यार्थी तिच्याबरोबर बोलत उभा होता. हा गुजराथी पोरगा रशियाला येतो आहे कीं काय? मला अतिशय आनंद झाला. मला रशियन बोटीवर पाहिल्यावर तोहि चमकला.

'हॅलो !' तो एकदम उद्गारला. 'तुम्ही रशियाला जातां आहां कीं काय?'

'होय.' मी म्हणालों, 'आणि तुम्हीहि तिथंच चाललां वाटतं?'

'छे छे !' तो हंसून म्हणाला.

तो ज्या बाईबरोबर बोलत होता तिचें नांव मिसेस् जोसेफ. ती त्याची 'लँडलेडी.' तिच्या पहिल्या नवऱ्याचीं दोन मुलें—एक सोळासतरा वर्षांची मुलगी आणि एक दहा बारा वर्षांचा मुलगा—हींसुद्धां मि. दवेबरोबर (दवे हें त्या गुजराथी विद्यार्थ्याचें नांव) तिला निरोप द्यायला आलीं होतीं. मॉस्कोमध्यें काम करणाऱ्या एका रशियन गृहस्थाशीं मिसेस जोसेफचें दुसरें लग्न ठरलें होतें. ती लग्न करावयाला मॉस्कोला जात होती. लग्न उरकून ती पुन्हा इंग्लंडला परत येणार होती आणि मग मुलांना घेऊन ती रशियांत कायमची रहावयाला जाणार होती. सडपातळ, उंच, छत्तीससदतीस वर्षांची बाई होती ती. तिचीं मुलें गुटगुटीत आणि छान होतीं. 'डॅव्ही' 'डॅव्ही' करीत तीं दवेभोंवतीं नाचत होतीं. थोड्या वेळानें दवे आणि तीं मुलें निघून गेलीं.

मी माझ्या केबिनमध्यें जाऊन पहातों तों कुणाची तरी आणखी एक बॅग तिथें येऊन पडली होती. कुणाची असावी, असा विचार मी करतों आहे इतक्यांत एक उंच, भक्कम बांध्याचा, तरुण इंग्लिशमन् दरवाजांत येऊन उभा राहिला आणि "Hallo! You are my partner? I am glad there is no d-d Britisher as my cabin companion!" असें तो हंसत म्हणाला. ब्रिटिशांना शिवी देतो तेव्हां हा अमेरिकन असाव' असें मला वाटलें; पण तो ब्रिटिशच होता.

इंग्लंडमधील हंटिंगडनशायरमधल्या एका चांगल्या मोठ्या घराण्यांतला तो होता. पण अंगांत अस्सल ब्रिटिश रक्त असूनहि ब्रिटिशांचा त्याला भारी राग. त्याचें नांव जोसेफ गॉर्डन् मॅक्लाव्ड्. हंटिंगडनशायरमधल्या मजूरपक्षाच्या शाखेचा तो उपाध्यक्ष आहे. सर्व मजूरपक्षांच्या एकजुटीचा (United Front) तो पुरस्कर्ता आहे. कम्युनिस्ट पक्षाविषयीं त्याला फार सहानुभूति वाटते. एखाद्या इंग्लिशमनपेक्षां मी सोबती मिळालों याचा त्याला फार आनंद झाला. इंग्लिशमन असून त्याचें बोलणें चालणें

अतिशय मोकळेपणाचें आणि वागणूक अत्यंत खेळाडू वृत्तीची आहे. या प्रवासांत माझें नशीब जोरावर आहे खास. मला सोबती एकाहून एक चांगले मिळताहेत.

मॅक्लॉव्ड् हा कवि, नट आणि दिग्दर्शक आहे. आमच्या प्रो. रॅफेच्या 'पार्टी'मधून तोहि रशियन रंगभूमीच्या अभ्यासाकरितांच रशियाला जातो आहे. बोलतांबोलतां नाट्यमन्वंतरची हकीगत त्याला मीं सांगितली आणि त्या भानगडींत बरेचसे पैसे गमावल्याची रडकथा ऐकवली.

' The same here ! ' म्हणून छातीवर बोट ठेवून तो मोठ्यांदा हंसला, आणि केंब्रिज येथें रंगभूमीवर असाच एक नवीन प्रयत्न करण्यांत आपण घालविलेल्या पैशांची कहाणी त्यानें मला निवेदन केली. एकूण हा प्राणी आमच्याच कळपांतला !

८-४५ वाजले. अजून बोट हलण्याचें चिन्ह नाहीं. थेम्स नदीला ओहोटी आहे. रात्रीं भरती येईल तेव्हां बोट सुटणार म्हणे ! भुकेनें माझ्या पोटांत कावळे ओरडत आहेत. जेवण ( dinner ) मिळणार काय म्हणून मी चवकशी केली. 'छे, तुम्हीं डिनर घेऊन यायला पाहिजे होतं,' वेटर म्हणतो ! आम्हांला काय माहित कीं, बोट ६-३० ला न सुटतां रात्रीं सुटणार आहे म्हणून ? 'डिनर' नसलें तरी रात्रीं थोडेंसें 'सपर' मिळणार आहे, अशी आनंदाची बातमी थोड्या वेळानें कळली.

नवाच्या सुमाराला हातानें घंटा वाजवीत एका वेटरनें उतारूंशिवाय इतर पाहुण्यांना आगबोट सोडून जाण्याची सूचना दिली. आम्ही 'डिनर हॉल'मध्यें 'सपर' साठीं गेलों.

आम्ही सर्व बायकापुरुष मिळून तिसऱ्या वर्गांत अवघे १५ लोक आहोंत. सबंध हॉलमध्यें एकच वेटर आमच्या तैनातीला आहे. कुणाला कसलीच घाई नाहीं. हे रशियन मोठे थंड, सुस्त लोक दिसतात ! वेटर सावकाशपणें इकडे जातो आहे, तिकडे जातो आहे, याला बोलावतो आहे, त्याला बोलावतो आहे,—खटाऱ्यासारखें सावकाशपणें काम रखडतें आहे ! अशाच वेळीं इंग्लिश किंवा इटालियन बोटीवर काय चोख व्यवस्था आणि कडक वक्तशीरपणा असतो. इकडे आपला आमच्या हिंदुस्थानसारखा घरगुती कारभार ! गडबड नाहीं, घाई नाहीं, होईल काम, वेळेचें काय मोठेंसें !

आमचा वेटर रशियन तार्तर आहे. तो गोरा मुळींच नाहीं. माझ्या-इतकाच किंवा माझ्यापेक्षां कमीच पीतगौर वर्णाचा तो आहे. 'सपर'साठीं 'व्हाइट' आणि 'ब्राऊन ब्रेड', लोणी, 'चीज', अंडीं आणि बेकन आहे. माझ्यासमोर आमच्याच टेबलावर दोन अमेरिकन तरुणी बसल्या आहेत. ही जोडी मोठी पाहण्यासारखी आहे. एक जितकी सुंदर, तितकीच दुसरी कुरूप आहे. कुरूप म्हणजे इतकी, कीं ती स्त्री आहे हें मला बऱ्याच वेळानें कळलें. मी तिला मुलगाच समजत होतों! पुरुषासारखे तिचे केंस कापलेले आहेत. चेहरा खप्पड, वर्णानें माझ्यापेक्षां किंवा आमच्या वेटरपेक्षांहि काळी. ही कशी काय बुवा अमेरिकेंत जन्माला आली! आंतल्या कपड्यावर गळ्यापासून गुढग्यापर्यंत तिनें एक लांब ओव्हरकोट घातलेला असल्यामुळें खरोखरच पुरुषाहून ती मुळींच वेगळी दिसत नाहीं.

तिच्या शेजारीं बसलेली दुसरी मुलगी चोवीस-पंचवीस वर्षांची असेल. लांब सडक, सोनेरी केसांचा मधोमध भांग पाडून केसांचा भरदार अंबाडा तिनें मानेवर सोडला आहे. तिची कांती अत्यंत उज्वल गौर असून तिचे डोळे आकाशासारखे निळे आहेत. तिचा प्रत्येक अवयव रेखीव आणि गोंडस आहे. निळ्या रंगाचीं फुलें काढलेला शुभ्रसफेत फ्रॉक तिनें घातला आहे. खुर्चीवर बसतां बसतां या चमत्कारिक जोडी-कडे नजर गेली, तेव्हां क्षणभर मी पहातच राहिलों!

मुखशुद्धीकरितां म्हणून लाल रंगाच्या पाकांत घातलेलीं 'चेरी' फळें आम्हांला देण्यांत आलीं. रशियन लोक 'चेरीज'ना 'विशनी' म्हणतात. आम्हांला देण्यांत येत असलेल्या प्रत्येक बशीवर आणि कपावर सोनेरी विळ्याहातोड्यासह लाल बावट्याचें चिन्ह आहे. फळें खाऊन झाल्यावर जर्मन सिल्व्हरचें हँडल असलेल्या एका कडींत अडकविलेलें एक कांचेचें ग्लास आणि त्यांत जर्द पिवळ्या रंगाचें कसलें तरी गरम पेय आम्हांला देण्यांत आलें. त्यामध्यें लिंबाची एक कापटी तरंगत होती. युरोपियन जहाज़ावर जेवणानंतर कॉफी देतात. हें गरम पेय काय आहे म्हणून वेटरला मी खुणेनें विचारलें, तेव्हां तो म्हणाला, 'चाय!' मॅक्लॉइडनें तो चहा असल्याचें मला सांगितलें. मी क्षणभर चकितच झालों. मला वाटलें

या रशियन वेटरला चहाचा हिंदी शब्द 'चाय' हा माहीत असावा आणि मी हिंदी माणूस आहे असें बघून माझ्यावर 'इम्प्रेशन' मारा वयाला मोठ्या ऐटीनें 'चाय' म्हणाला असावा. खरोखर रशियन भाषेंत चहाला 'चाय' हाच शब्द आहे. मी जेव्हां मॅक्लॉव्डला सांगितलें, कीं 'आम्ही हिंदी लोकसुद्धां 'टी' या इंग्लिश शब्दाला रशियनांप्रमाणेंच 'चाय्' हाच शब्द वापरतों,' तेव्हां आमच्या टेबलावर बसलेल्या इंग्लिश जाणणाऱ्या एकदोन उतारूंना आणि त्या अमेरिकन मुलींना मोठें कौतुक वाटलें. ते रशियन माझ्याकडे किंचित् आपलेपणानें बघूं लागले! मात्र हा चहा माझ्यानें तोंडांत घालवेना! साखर नाहीं, दूध नाहीं, नुसती लिंबाची फोड! सकाळीं उठल्याबरोबर असाच चहा मिळणार असेल, तर आली कंबक्ति! प्रत्येक जेवणानंतर आणि दुपारीं असलाच चहा मिळणार असला तरी सकाळीं 'ब्रेकफास्ट्' बरोबर दुधासह हवी तितकी कॉफी मिळणार आहे असें कळल्यावर माझा जीव खालीं पडला.

जेवणानंतर मी डेक्वर जाऊन उभा राहिलों. १०–३० वाजले होते. अजूनहि बोट हालण्याचें चिन्ह दिसेना. शेकडों चहाच्या पेट्या मजूर बोटीवर चढवीत होते. इंग्लंडहून रशियाला चहाची बरीच निर्यात होत असावी, असें वाटतें. ती सुंदर अमेरिकन मुलगीहि त्याच डेकवर येऊन उभी राहिली होती.

" Do you know Udayshankar ? " ती मला म्हणाली.

" उदयशंकरचे नाच मीं पाहिले आहेत; पण उदयशंकरला मी ओळखीत नाहीं," म्हणून मी तिला सांगितलें. थोडे दिवसांपूर्वी उदयशंकरचे नाच न्यूयॉर्कमध्यें झाले होते आणि अमेरिकन प्रेक्षकांना त्यानें वेड लावून टाकलें होतें, असें ती म्हणाली. नृत्य, वाङ्मय, राजकारण इत्यादि विषयांची तिला खूपच माहिती दिसली. ती कम्युनिस्ट होती. तिचें नांव कॉमरेड बिआट्रिस शिंडलर. अमेरिकन मजूर-चळवळीची तिनें मला माहिती सांगितली. माझ्यासारखीच ती दोन आठवड्यांपूर्वी इंग्लंडमध्यें आली होती. ती ऑक्सफर्डला गेली असतांना हिंदी विद्यार्थ्यांच्या मजलसीमध्यें कुणीतरी कानडी कविता म्हणून दाखवल्या असें तिनें मला सांगितलें. पुण्याचे प्रो.

गोकाक हे उत्तम कानडी कवि आहेत आणि सध्यां ते ऑक्सफर्ड येथें आहेत हें मला माहीत होतें. ते तर नसतील ना ? तिला त्यांचें नांव आठवेना.

बोट केव्हां सुटणार म्हणून एका रशियन् ऑफिसरला आम्हीं दोघांनींहि निक्षून विचारलें. तेव्हां रात्रीं एक वाजतां नक्की सुटणार म्हणून त्यानें सांगितलें. बोट सुटेपर्यंत झोंपायचें नाहीं असें आम्हीं ठरविलें. रात्रींच्या वेळीं थेम्स् नदीचा देखावा मोठा अद्‌भुतरम्य आणि सुंदर दिसतो. काळोखानें काळवंडलेल्या पाण्यांतून लहान लहान लॉंचेस इकडून तिकडे 'सुर्' 'सुर्' 'सुर्' आवाज करीत फिरत असतात. त्यांच्या डोलकाठ्यांवरच्या हिरव्यातांबड्या दिव्यांचीं हिरवींतांबडीं प्रतिबिंबें पाण्याच्या पृष्ठभागावर लपंडाव खेळत असतात. कांठावरल्या घरांच्या काळ्या छायाकृति आकाशाच्या पार्श्वभूमीवर ओळीनें दिसतात. आणि तिथल्या दिव्यांचा अंधुक पिवळा प्रकाश नदीच्या पाण्यावर पडल्यामुळें त्या एकंदर काळोख्या वातावरणाला अधिकच विकटता आलेली असते. हें सर्व मनोरम दृश्य आणि एखादी बोट जाऊं लागली म्हणजे दुभंग होऊन वर जाणारा थेम्स् नदीवरला सुप्रसिद्ध 'टॉवर ब्रिज' आम्हांला पहावयाचा होता, म्हणून शेवटपर्यंत जागें रहायचें आम्हीं ठरविलें.

थोड्या वेळानें मॅक्लॉव्ड् आपला मोठाथोरला पाइप् ओढीत आला; आणि आमच्या गप्पांत सामील झाला. रंगभूमीवर नाटक करण्यापूर्वी त्याचें हस्तलिखित आम्हांला हिंदुस्थानांत पोलीस कमिशनरला दाखवावें लागतें, ही गोष्ट मीं सांगितली, तेव्हां तीं दोघेंहि स्तंभित झालीं. "खुद्द प्रेसिडेंट रूझवेल्टचें विडंबन करून त्यांचे विकृत चित्र दाखविणारीं नाटकें न्यूयॉर्कच्या ब्रॉडवेमध्यें दाखविलीं जातात, तरी अमेरिकेंत कुणी कांहीं करीत नाहीं." कॉमरेड शिंडलर म्हणाली. बोलतांबोलतां स्पेनकडे आमचा संभाषणौघ वळला ! "किती शरमेची गोष्ट आहे," शिंडलर म्हणाली, "कीं आमची अमेरिकन ॲंब्युलन्स स्पेनमधें जनरल फ्रँकोच्या बाजूनं काम करते आहे !"

रात्रीं बाराचे ठोके पडले आणि मॅक्लॉव्ड झोंपायला निघून गेला. या बोटीवर पाय ठेवल्यास आम्हांला सहा तास झाले होते. आतां अगदीं मनापासून कंटाळा आला होता. पण बोट सुटेपर्यंत डेकवर थांबायचें आणि सर्व थेम्स नदी पाहून घ्यायची, हा आमचा दोघांचा निश्चय कायम

होता. कॉमरेड् शिंडलरच्या 'चेस्टरफील्ड' सिगरेटच्या पाकिटांचा फडशा उडत होता. शेवटीं १ वाजतां बोट सुटली एकदांची. एक लहानशी 'टग्' बोट आमच्या बोटीला ओढून थेम्स नदीच्या बाहेर काढीत होती. उद्यां सकाळीं आम्ही 'नॉर्थ सी'मध्यें शिरणार म्हणतात.

* * *

## ता. २७ मे –

*'कोर्चाया वादा !'–प्रो. रॅफे.–रशियाचें राष्ट्रीय पक्वान्न 'कॅव्हिआर' !*

सकाळीं आठ वाजतां उठलों आणि दाढीकरितां गरम पाणी शोधायला लागलों; पण गरम पाणीच कुठें मिळेना ! आमच्या स्टूअर्डेसला इंग्रजी येत नाहीं. मॅक्लॉव्ड अजून झोंपलाच होता; त्याला जागा केला आणि रशियन भाषेंत गरम पाण्याला काय म्हणतात म्हणून विचारलें ! इंग्रजींतून रशियन शिकण्याचें एक पुस्तक त्यानें बोटीवर वाचण्याकरितां आणलें आहे. जांभया देत त्यानें सांगितलें, 'कोर्चाया वादा'. तो शब्द घोकीत मी स्टूअर्डेसकडे गेलों व मोठ्या ऐटींत 'कोर्चाया वादा !' म्हणून म्हणालों. ती हंसली आणि लगेच तिनें मला गरम पाणी आणून दिलें.

आमची बोट आतां 'नॉर्थ सी'मधून चालली आहे. टेबलावरचा 'ब्रेकफास्ट' पाहून मी खूष झालों. खायला तर हे रशियन भरपूर देताहेत. अंडीं, बेकन, लोणी, पाव, मासे आणि दूध घातलेली उत्तम कॉफी इतके पदार्थ 'ब्रेकफास्ट'करितां होते.

ब्रेकफास्टनंतर मी डेकवर फिरत होतों. समोरून एक म्हातारा पण देखणा युरोपियन गृहस्थ पुढें आला आणि 'गुड मॉर्निंग' करून म्हणाला,

"There you are I was looking up for you! I am Raffe'!"

हेच तर मग आमचे प्रो. रॅफे. रॅफे यांच्या नेतृत्वाखालीं रशियन रंगभूमि पहाण्याकरितां जाणाऱ्या गटांत मीं नांव दिलें होतें खरें; पण रॅफे किंवा आमच्या गटांतील इतर मंडळी यांची माझी गांठ भेटच झाली नव्हती. मॅक्लॉव्ड याच गटांत आहे हें त्यानें मला सांगितलें तेव्हां समजलें. या

गटात आणखी कोण मंडळी आहेत आणि रॅफे हे कोण गृहस्थ आहेत याची आम्हांला दोघांनाहि कल्पना नव्हती. म्हणूनच बोटीवरल्या आज पहिल्याच सकाळीं आपल्या गटांतलीं माणसें शोधीत प्रो. रॅफे फिरत होते.

म्हातारा मोठा बोलका आहे. रॅफेना हिंदुस्थानची बरीच माहिती आहे. कांहीं वर्षांपूर्वी लखनौ येथील आर्ट स्कूलचे ते प्रमुख अधिकारी होते असें त्यांनीं मला सांगितलें. "रशियाचे जगप्रसिद्ध रंगभूमि-दिग्दर्शक मेयरहोल्ड आणि स्टानिस्लाव्स्की यांची आणि आमची मास्कोमध्यें कदाचित् मुलाखत होईल." ते म्हणाले.

कॅलिफोर्नियाहून आलेल्या एका अमेरिकन गृहस्थाबरोबर आज सकाळीं मी डेक टेनिस खेळत होतों. हा माणूस मोठा मजेदार आहे. तो रशियन इतकें उत्तम बोलतो, कीं पहिल्यांदां तो रशियन असावा असेंच मला वाटलें. वर्णानेंहि तो आम्हां हिंदी माणसाइतकाच पीतगौर आहे. कॅलिफोर्नियाची हवा बरीच उष्ण आहे म्हणतात. त्याचें नांव मि. स्टीन. कम्युनिस्ट पक्षाचा सभासद आहे तो. त्याचीं मतें ज्वलज्जहाल असून तो एक नमुनेदार कम्युनिस्ट आहे. सिगरेट, तंबाखू किंवा मद्यमांसाला तो स्पर्श करीत नाहीं. पक्का शाकाहारी आहे. आमच्या वेटरला त्याचें कौतुक वाटतें आणि भाजीपाल्याचे पदार्थ बशा भरभरून तो त्याच्यापुढें ठेवतो. बोलतांनाहि कॉ. स्टीन् मोठ्या ठसकेबाज अमेरिकन भाषेंत बोलतो. बोलतांबोलतां तो मला म्हणाला,

"तुम्ही सर्व हिंदुस्थानी लोक जर एकाच वेळीं थुंकला तर साऱ्या इंग्रज लोकांना बुडवून टाकाल !"

आज दुपारीं 'लंच'च्या वेळीं आम्हांला 'कॅव्हिआर' हें रशियन पक्वान्न देण्यांत आलें. महाराष्ट्रीयांची 'पुरणपोळी,' बंगाल्यांचा 'रसगुल्ला' किंवा मद्राशांची 'इडली' त्याप्रमाणें रशियन लोकांचें 'कॅव्हिआर' हें 'राष्ट्रीय' पक्वान्न आहे ! या रशियन 'कॅव्हिआर'साठीं युरोपियन लोक नुसते तुटून पडतात. मला मात्र ती तोंडांत घालवेना ! मात्र टेबलावर ती किती मोहक दिसते ! जर्द केशरी रंगाच्या फुगलेल्या साबूदाण्यांचा, द्राक्षाच्या घोंसासारखा जर घोंस केला तर तो जसा दिसेल तशी 'कॅव्हिआर' दिसते. सुकलेल्या माशासारखा वास तिला येतो आणि

चवहि एखाद्या खारट पिठाच्या गोळ्यासारखी. पुन्हा 'कॅव्हिआर' माझ्याजवळसुद्धां आणूं नकोस म्हणून वेटरला मीं बजावलें! मात्र जेवणाचे इतर रशियन पदार्थ अत्यंत चवदार आणि इंग्लंडमधल्या पदार्थांपेक्षां फारच छान आहेत आणि दुसरी महत्वाची गोष्ट म्हणजे एकादा पदार्थ आवडला तर रशियन वेटर आग्रह करकरून पुन्हा वाढतो! रशियन लोकांचा हा शिष्टाचार आम्हां हिंदुस्थानी लोकांसारखा आहे. इतर युरोपियन देशांत ही पद्धत आढळणार नाहीं. मूकस्तंभासारखा वेटर मागें उभा राहील आणि खाऊन झालें कीं पट्कन् तुमची प्लेट घेऊन जाईल!

या रशियन बोटीवर माझा 'भाव' बराच वाढला आहे. या बोटीवर अमेरिकन आहेत, इंग्रज आहेत, रशियन आहेत, जर्मन आहेत, पण पौर्वात्य देशांतला असा मी एकटाच आहें. त्यामुळें प्रत्येकाला माझ्या-विषयीं मोठें कुतूहल वाटतें! प्रत्येकजण माझ्याशीं बोलण्याचा प्रयत्न करतो आणि त्यांत बऱ्याच स्त्रियाहि असल्यामुळें आमच्या बोटीवर असलेल्या त्या म्हाताऱ्या कॅनेडियन् 'एक्स-सोल्जर'ला तर माझा हेवा वाटूं लागला आहे!

रात्रीं आठच्या सुमाराला कांहीं मच्छीमार होड्या आम्हांला दिसल्या. किनाऱ्यावरील एकदोन दीपगृहेंहि दिसताहेत. बहुतेक हॉलंडचा किनारा असावा. 'टेलिव्हिजन' शिकण्याकरितां अमेरिकेला गेलेले चार तरुण रशियन एंजिनियर्स आमच्या बोटीवर आहेत. ते रशियाला परत जात आहेत. रात्रीं जेवणानंतर त्यांनीं ग्रामोफोन लावून डेकवर 'डान्स' सुरू केला आहे. सर्व स्त्री-पुरुष उतारू मोठी मजा करीत आहेत. मलाहि या मजेंत भाग घ्यावयाची इच्छा आहे; पण हा म्हातारा रॅफे मला धरून बसला आहे आणि भगवद्गीता, बायबल, हिंदु तत्त्वज्ञान, रामायण, महाभारत इत्यादिकांच्या 'तौलनिक अभ्यासासंबंधीं' माझ्याशीं मोठ्या आवेशानें चर्चा करतो आहे! काय करावें या म्हाताऱ्याला!

* * *

**ता. २८ मे–**

" Meester passenger, photographing is forbidden ! "
*अबब ! किती स्वस्त हीं ड्रेअर्सचीं पाकिटें !–कील कॅनाल.*

सकाळीं उठून डेकवर गेलों. उजव्या बाजूला निसर्गरमणीय देखावा दिसतो आहे. हिरवींगार शेतें, मधूनमधून लहानशीं तांबड्या विटांचीं घरें आणि पवनचक्क्या दिसत आहेत. माझ्याजवळ कॉमरेड शिंडलर उभी आहे. ती म्हणते, " हा हॉलंडचा किनारा असावा. किती पवनचक्क्या दिसताहेत ! " हॉलंड देश आणि पवनचक्क्या यांचें साहचर्य लहानपणापासून अनेक भूगोलाच्या पुस्तकांतून माझ्याहि मनावर ठसविलें गेलें आहे. पण आमच्या शेजारीं उभी असलेली जर्मन बाई म्हणते, " छे, छे, ही जर्मनी. सध्यां आपण एल्बे नदींतून चाललों असून पलीकडे कीलचा कालवा आहे. "

या जर्मन बाईचा नवरा इंग्लिश असून तो रशियांत नोकरीला आहे. तिला स्टेफान नांवाचा एक सातआठ वर्षांचा गोड मुलगा आहे. तो आईशीं जर्मन भाषेंत बोलतो, मधूनमधून रशियन भाषेंतहि बोलतो आणि त्याला थोडेंथोडें इंग्रजीहि येतें ! प्रत्येक रशियन घरांत एक ' रेड कॉर्नर ' नांवाचा भाग असतो. तिथें लेनिनची तसबीर किंवा पुतळा आणि सभोंवतीं लाल फडक्याची कमान असते. प्रत्येक सोव्हिएट बोटीवरहि हा ' रेड कॉर्नर ' असतो. कॉमरेड् शिंडलर म्हणाली, " चल, आपण आज आपल्या बोटीवरला रेड कॉर्नर पाहूं या. "

रशियन बोटीवरला कॅप्टन केव्हांकेव्हां बोटीवरल्या सर्व खलाशांशीं आणि अंमलदारांशीं एखाद्या प्रश्नाची चर्चा करतो. असल्या सभांसाठीं बोटीवर एक लहानसा हॉल आहे. त्याच्या पलीकडे हा ' रेड कॉर्नर् ' आहे. ' रेड कॉर्नर् 'मध्यें विशेषसा उजेड नव्हता. आंत शिरल्याबरोबर स्टालिनचा एक मोठा थोरला ब्रॉंझचा अर्धपुतळा आमच्या दृष्टीला पडला. एका बाजूला कार्ल मार्क्सची एक भव्य तसबीर आणि दुसऱ्या बाजूला फ्रेडरिक एंजल्सचें एक चित्र होतें. ' चारकोल'नें काढलेलें लेनिनचेंहि भव्य चित्र भिंतीवर माझ्या दृष्टीला पडलें. मला मोठें आश्चर्य वाटलें. याला ' रेड् कॉर्नर ' किंवा ' लेनिन कार्नर ' म्हणतात,

आणि लेनिनचाच पुतळा किंवा अर्धपुतळा इथें कसा नाहीं ? स्टालिनचा भव्य पुतळा आंत शिरल्याबरोबर दृष्टीला पडला आणि लेनिन कुठें आहे? या 'चारकोल ड्रॉइंग' वरच लेनिनची बोळवण केली आहे कीं काय? थोड्या वेळानें लेनिनचा पुतळा माझ्या दृष्टीला पडला. पुतळा एक फूट दीड फूट उंचीचा लहानसाच होता; पण एका हाताची मूठ वळून भाषण करतो आहे, अशा थाटाची लेनिनची काळ्या दगडाची आकृति सुंदर होती. बाजूला असलेला स्टालिनचा अर्धपुतळा फारच भव्य आणि मोठा असल्यामुळें लेनिनचा हा पुतळा चट्दिशीं नजरेंत भरत नाहीं इतकेंच.

दुपारचा ११–४५चा सुमार झाला आहे. 'कील कॅनाल'च्या तोंडाशीं आमची बोट आली आहे. कालव्याच्या या कांठापासून त्या कांठापर्यंत एक भलेंभक्कम पोलादी धरण आहे. वाफेच्या यंत्रानें हें धरण बाजूला सरकतें आणि मग बोट कालव्यांत शिरूं शकते. असेंच धरण कालव्याच्या दुसऱ्या टोंकाला आहे म्हणतात. बोट आंत घेऊन हीं दोन्हीं धरणें बंद केलीं कीं कुठलीहि बोट कोंडून ठेवतां येईल. गेल्या महायुद्धाच्या वेळीं जर्मनीचें सर्व आरमार या कालव्यांत होतें; आणि ह्या कालव्याची दोन्ही बाजूंनीं नाकेबंदी करून सबंध जर्मन आरमार एखाद्या बाटलींत कोंडावें तसें कोंडण्याचा दोस्त राष्ट्रांनीं प्रयत्न केला होता. कालव्याच्या तोंडाशीं आमची बोट येत होती तेव्हांच 'सर्सर् सर्सर्' करीत एक जर्मन लॉंच आमच्या बोटीजवळ आली आणि कैसरसारखे मिशांचे आंकडे असलेला एक गलेलठ्ठ जर्मन आमच्या बोटीवर चढला! हा जर्मन पायलट. कुठलीहि बोट कालव्यांतून जात असतांना ती जर्मन पायलटच्या ताब्यांत असते. दुपारीं १२ वाजतां आमची बोट कालव्यांत शिरली आहे. रात्रीं आठच्या सुमारास ती दुसऱ्या टोंकाला बाहेर पडेल म्हणतात. त्या जर्मन लॉंचवर नाझी निशाण फडकत होतें. नाझी निशाण रशियन लाल बावट्यासारखेंच आहे; फक्त विळयाहातोड्या-ऐवजीं एका सफेत वर्तुळांत स्वस्तिक चिन्ह असतें इतकेंच. आमच्या सोव्हिएट बोटीवर जर्मन पायलट आल्याक्षणापासून सर्पाच्या घरांत मुंगूस यावें त्याप्रमाणें स्मशानशांतता पसरली आहे. सर्व रशियन खलाशी आणि अंमलदार तोंडें मिटून फिरताहेत. आम्ही उतारूहि अस्वस्थ

आहोंत. बोटीवरच्या रेडिओचें संगीतहि बंद करण्यांत आलें आहे. बोट अगदीं कील कॅनॉलच्या तोंडाशीं आली आहे. डेकवर उभा राहून कालव्याच्या प्रवेशद्वाराचा फोटो घेण्याकरितां मी माझा कॅमेरा लावतों आहे, इतक्यांत वरून एक रशियन अंमलदार ओरडला, " Meester passenger, photographing is forbidden ! " रशियन लोक इंग्लिश बोलतांना दीर्घ उच्चार करतात. म्हणूनच मिस्टरचा उच्चार ते मीऽऽस्टर म्हणून करतात. तो ओरडेपर्यंत मीं कॅमेराची कळ दाबली होती आणि फोटो निघाला होतासुद्धां ! मी चट्‌दिशीं कॅमेरा बंद करून 'नाहीं फोटो काढीत' असें मानेनें खुणावून दुसरीकडे निघून गेलों. तो फोटो अजून माझ्याकडे आहे.

आतां आमची बोट त्या पोलादी धरणाच्या बाहेरच्या बाजूला एका प्रशस्त धक्क्याला लागून उभी आहे. बोटीवरल्या सरकारी कागद-पत्रांची तपासणी होऊन नंतर तें धरण उघडणार आणि आमची बोट आंत शिरणार. जर्मनीमधल्या निरनिराळ्या देखाव्यांचीं चित्रें आणि सिगारेटच्या पेट्या विकण्याकरितां बरींच जर्मन पोरें आलीं आहेत आणि आम्हां उतारूंना कांहींतरी विकत घ्या म्हणून आग्रह करताहेत. मला एका गोष्टीचें मोठें आश्चर्य वाटलें ! 'प्लेअर्स' सिगरेटस्‌च्या पन्नासांच्या पेटीला मुंबईत जवळजवळ एक रुपया पडतो. आणि ज्या लंडनमध्यें त्या तयार होतात, तिथें याच पेटीला दोन शिलिंग सहा पेन्स किंवा अदमासें पावणेदोन रुपये पडतात. आणि तीच पेटी हीं जर्मन पोरें एक शिलिंगाला किंवा अकरा आण्याला विकीत आहेत ! मॅक्लॉव्ड म्हणाला, " मी इंग्लिश आहें; पण आमच्या इंग्लिश सिगरेटस् जर्मनींत विकत घेणें मला अधिक स्वस्त पडतें आहे ! " त्यानें एकदम पांचसहा पेट्या विकत घेतल्या.

सुमारें १२–४५ ला तें पोलादी धरण दुभंग होऊन बाजूला सरकलें आणि आमची बोट कालव्यांत शिरली. किती सुंदर कालवा आहे हा ! दोन्ही बाजूंना रेताड वाळवंट आणि मधून मधून खजुरीचीं झुडुपें असलेला सुवेझ कुठें आणि हिरवीगार रम्य वनश्री असलेला हा रेखीव कील कालवा कुठें ! हातांत घ्यायची ती गोष्ट उत्कृष्टच करायची या जर्मन लोकांच्या सुप्रसिद्ध तत्त्वाप्रमाणें त्यांनीं हा कालवा जणुं काय एखाद्या चित्रां-

तल्या कालव्याप्रमाणें आंखून खोदून काढला आहे. जवळजवळ छप्पन मैल हा कालवा लांब आहे म्हणतात.

आतां दुपारचे तीनचार वाजले आहेत. स्वच्छ सोनेरी ऊन पडलें आहे. किनाऱ्यावर खेळत असलेलीं किंवा आंघोळ करीत असलेलीं गुट-गुटीत जर्मन मुलें आम्हांला डेकवर उभे असलेले पाहून हंसत खिदळत ' How do you do ? ' म्हणून आपणांला येत असलेलें एखादें इंग्रजी वाक्य मोठ्यांदा ओरडत आहेत. बोट संथपणें चालली आहे. मुलांच्या अशा एका घोळक्याचा चालत्या बोटींतून मीं एक फोटो घेतला.

सुमारें पांचच्या सुमाराला वरींचशीं जर्मन विमानें पांचपांच सहा-सहांच्या गटानें वर उडत असलेलीं आम्हीं पाहिलीं. करड्या रंगाचें एक सुंदर जर्मन क्रूझरहि आम्हांला वाटेंत भेटलें. आमच्या उलट्या दिशेनें चाललेली 'अँड्री इग्नीव्ह' नांवाची एक सोव्हिएट बोट आमच्या जवळून गेली तेव्हां दोन्ही बोटींवरल्या रशियन खलाशांनीं एकामेकांना सलामी दिली.

६—४५ ला कील कालव्याच्या दुसऱ्या टोंकापाशीं आम्हीं आलों. इथेंहि एक पोलादी धरण आहे. तिथें जवळच असलेल्या धक्क्याला आमची बोट लागली आहे. एक तासभर आमची बोट इथें थांबली. पलीकडे कील शहरांतल्या घरांचे पुंजके दिसत आहेत. शिकारीकरितां किंवा एकांतांत वेळ घालवण्याकरितां जर्मनीचा कैसर या कील शहरां-तच येत असे म्हणतात. आठ वाजतां तें धरण बाजूला सरकलें आणि आमची बोट बाहेर पडली. आतां आम्ही बाल्टिक समुद्रांत शिरलों आहोंत. कांहीं वेळ डेन्मार्कच्या किनाऱ्यानें आणि नंतर नॉर्वे—स्वीडन एस्थोनियाच्या किनाऱ्यानें आमची बोट जाईल असें उतारू म्हणत आहेत. आतां बोट फार जोरानें हालते आहे. रात्रीं दहाच्या सुमारास आमची उंच धिप्पाड स्टूअर्डेस् केबिनमध्यें आली आणि केबिनचें पोर्टहोल कडेकोट बंद करून गेली. बाल्टिक समुद्रांत वादळ होणार कीं काय ?

* * *

**ता. २९ मे–**

The Land of the Midnight Sun !

सकाळीं उठलों आणि माझ्या घड्याळांत पाहिलें तों आठ वाजले होते. पण बोटीच्या घड्याळांत नऊ वाजले आहेत ! मी विसरलोंच. इंग्लंडला येतांना ज्याप्रमाणें घड्याळ रोज एक तास मागें करावें लागे त्याप्रमाणें इंग्लंडहून रशियाला जातांना घड्याळ पुन्हा एकएक तास पुढें करावें लागतें.

त्या चार रशियन एंजिनियर्सपैकीं एक पोरगेलासा एंजिनियर माझ्याशीं आज बोलत होता. अमेरिकेंत कांहीं दिवस राहिल्यामुळें त्याला थोडेसें इंग्लिश येतें. "या दिवसांमध्यें लेनिनग्राडमध्यें बहुतेक तुम्हांला पांढऱ्या रात्री ( White nights ) पहावयाला मिळतील." तो म्हणाला. पांढऱ्या रात्री म्हणजे रात्रीं बाराएक वाजेपर्यंत बराचसा उजेड असतो, नंतर थोडा वेळ थोडासा काळोख होतो, आणि पुन्हा दीड दोन वाजतां स्वच्छ उजाडतें !

या बॉल्टिक समुद्रांतहि हा पांढऱ्या रात्रीचा प्रकार कदाचित् पहावयाला मिळेल म्हणतात. आज रात्रीं कितीहि जागावें लागलें तरी ही गंमत पाहिल्याशिवाय मी रहाणार नाहीं. लहानपणीं मेरी कॉरेलीच्या 'थेल्मा' या कादंबरींत नॉर्वे–स्वीडनचें 'The Land of the Midnight Sun' हें वर्णन वाचतांना माझें अंतःकरण थरारून येत असे आणि हें अलौकिक दृश्य आपणांला कधींतरी पहावयाला मिळेल काय अशा प्रकारच्या दिवास्वप्नांत मी रंगून जात असें. हें स्वप्न खरें होईल असें चुकूनसुद्धां मला कधीं वाटलें नव्हतें. पण आज रात्रीं माझी स्वप्नसृष्टि खरी होणार म्हणायची ! मी अधीर मनानें रात्रीची वाट पहातों आहें.

बाल्टिक समुद्रांत हवेचा एक विचित्र प्रकार दृष्टीला पडतो. कडक ऊन पडलेलें असतें आणि हाडें फोडून टाकणारी कडाक्याची थंडी पडते ! आज सकाळीं असेंच ऊन पडलेलें पाहून बोटीवरल्या बऱ्याचशा युरोपियन बायका हुरळून गेल्या आणि आपली कातडी पीतवर्ण

(Sunburnt) व्हावी म्हणून तासाचे तास निळेकाळे चष्मे लावून या उन्हांत पडून राहिल्या. आम्ही हिंदी लोक गोरे व्हायला धडपडतों आणि हे गोरे लोक उन्हांत भाजून घेऊन काळे व्हायला पाहतात ! 'You have sun in your skin !' असें म्हणत खरोखरच कांहीं युरोपियन तरुणी आमच्या पीतश्यामल कातडींचा अक्षरशः हेवा करतात !

या बायांची नंतर मात्र चांगलीच फजिती झाली ! कडक ऊन आणि कडक थंडीचा परिणाम असा झाला, कीं त्यांचीं नाकें सुजून लाल-बुंद झालीं आणि दुपारीं लंचला जेव्हां त्या टेबलापाशीं आल्या तेव्हां नाकें रंगवलेल्या सर्कशींतल्या विदूषकांसारख्या त्या दिसूं लागल्या !

आज मध्यरात्रीचा सूर्यप्रकाश दिसणार खरा. रात्रीं जेवल्यानंतर साडेआठ वाजतां मी डेकवर आलों. तेव्हां आपल्याकडे दुपारीं ४ वाजतां पडतें इतकें स्वच्छ ऊन पडलें होतें. रात्रीं साडेदहा वाजतां आम्ही 'स्मोकिंग रूम'मध्यें गप्पा करीत बसलों होतों; तेव्हां चांगला पिंवळसर संधिप्रकाश पडला होता. नाना विषयांवर आमच्या गोष्टी चालल्या आहेत. एक अमेरिकन मुलगी म्हणते, "फ्रेंच तरुण मोठ्या गरम रक्ताचे, बुवा. एखाद्या मुलीची ओळख होऊन पांच मिनिटें झालीं नाहींत तोंच एकदम ते तिच्यावर प्रेम करूं लागतात !" आमचा रॅफे मोठा मिस्किल म्हातारा आहे. माझ्याकडे तिरप्या डोळ्यानें पहात तो म्हणतो, "फ्रेंच तरुणांपेक्षांहि या हिंदी पोरांचें रक्त फार गरम ! अभ्यासाला म्हणून इंग्लंडला येतात आणि हां हां म्हणतां आमच्या पोरी उठवतात."

"इंग्लंड आमचं सगळंच उठवतं; तेव्हां निदान तुमच्या पोरी तरी आम्हांला उठवूं द्या !" मी म्हणालों.

आतां रात्रीचे १२–३० वाजले आहेत. तांबडेंलाल सूर्यबिंब नुकतेंच अस्ताला गेलें आहे. क्षितिजावर दूरच दूर लाल प्रकाशाचा एक पट्टा पसरला आहे. त्यावर सफेत प्रकाशाचा एक पट्टा दिसतो आहे. तो धूसर होत होत निळ्या आकाशांत विरून गेला आहे. एकाददुसरी चांदणी मधूनमधून कुठेंतरी चमकते आहे. चमत्कारिक रक्तधूसर प्रकाश डेकवर पडला आहे. हीच ती पांढरी रात्र. हेंच तें खरें, झालेलें माझें स्वप्न. वातावरणांत एक प्रकारची रम्यभीषण अद्भुतता भरून राहिली आहे.

निस्तब्धपणें बोट पुढें चालली आहे आणि एखाद्या भारून टाकलेल्या माणसाप्रमाणें अनिमिष नेत्रांनीं निसर्गाचा हा खेळ मी पाहून घेतों आहे.

कांहीं वेळानें पलीकडच्या डेकवरून कशी काय गंमत दिसते ती पहावयाला मी तिकडे गेलों, तों इकडल्यापेक्षांहि विलक्षण सौंदर्याची खैरात निसर्ग त्या बाजूला करत आहे. सूर्यबिंबासारखेंच तांबडेंलाल चंद्रबिंब क्षितिजावर आलें आहे. हा बाल्टिक चंद्र कांहीं चमत्कारिकच ! याला काय म्हणावें तेंच मला कळत नाहीं ! आतांपर्यंत चतुर्थीचा चंद्र, पौर्णिमेचा चंद्र वगैरे नाना तऱ्हेचे चंद्र मीं पाहिले आहेत; पण हा कांहीं विलक्षणच प्रकार आहे ! कॉमरेड शिंडलर रशियन शेतकरी बाया बांधतात तसलें एक रंगीबेरंगी तांबडें फडकें डोक्याला बांधून एकाद्या वेडावलेल्या माणसा-सारखी या चमत्कारिक चंद्राकडे पहात उभी आहे. चंद्र दिसतोच आहे तसा. एखादें तांबडेंलाल कलिंगड वांकडेंतिकडें फुटावें तसा चंद्र दिसतो आहे. तो धड गोल नाहीं, धड अर्धचंद्र नाहीं कीं धड चंद्रकोरीसारखाहि नाहीं ! कांहीं वांकडातिकडाच त्याचा आकार झाला आहे !

"Look at the Moon. How funny she looks !" शिंडलर म्हणते.

"She looks like er...er..." मला कांहींच सुचेना !

"She is crazy !" शिंडलर म्हणते.

"Crazy ! That's the word !" मी एकदम उद्गारलों.

Crazy ! खरोखरच Crazy ! वेडावलेला, माथें फिरलेला तो चंद्र दिसत होता ! चंद्राचा आणि चंद्रप्रकाशाचा मानवी मनावर कांहीं विलक्षण वेडावून टाकणारा परिणाम होतो असें मानसशास्त्रज्ञ म्हणतात. साध्या चंद्राचा जर असा परिणाम होतो, तर या वेडावलेल्या चंद्राचा मानवी मनावर काय परिणाम होईल ? या वेडावलेल्या बाल्टिक–चंद्राच्या चमत्कारिक रक्तधूसर प्रकाशांत उभ्या राहिलेल्या माणसाचें जर डोकें ठिकाणावर राहिलें तर मी म्हणेन तो माणूस नव्हे !

* * *



जुन्या पिढीतील सर्वोत्कृष्ट रशियन
नाटककार स्टानिस्लाव्हस्की



रशियाचा
लोकप्रिय तरुण नाटककार
ऑख्लॉप्कॉव्ह

## ता. ३० मे—

*काय हो, अरब आणि हिंदु यांत फरक काय ?*

आमच्या रशियन तार्तर वेटरनें आज एक मजेदार प्रश्न मला विचारला. त्याला इंग्लिश येत नव्हतें; पण रशियन समजणाऱ्या आमच्या त्या कॅलिफोर्नियाच्या अमेरिकन मित्राला दुभाषा करून तो माझ्याशीं बोलत होता. मी हिंदु आहे हें कळल्यावर तो म्हणाला, " काय हो, हिंदु आणि अरब यांत फरक काय ? "

मीं म्हटलें, " हिंदु हा हिंदुधर्मीय आणि अरब मुसलमानी धर्माचा दुसरा फरक म्हणजे हिंदु हे आर्यवंशीय आहेत. मुसलमान सेमिटिक वंशाचे आहेत. "

हा वेटर रशियन असला तरी तार्तर असल्यामुळें मुसलमान आहे. त्याचें मला विशेष आश्चर्य वाटलें नाहीं. पण बरेच चांगले शिकलेसवरलेले युरोपियन आणि अमेरिकनसुद्धां हा प्रश्न अनेक वेळां विचारतात. तुमच्या हिंदुस्थानांत हिंदु आणि मुसलमान आहेत, त्यांच्यांत फरक काय ? मला या प्रश्नाचा अर्थच समजत नाहीं. मीं एका अमेरिकन गृहस्थाला उलट विचारलें, " तुमच्या देशांत किंवा युरोपांत ज्यू आणि ख्रिश्चन आहे, त्यांच्यांत फरक काय ? धर्म आणि वंश वेगळे; हाच फरक, दुसरें काय ? तसाच हिंदु—मुसलमानांतला फरक. "

* * *

## ता. ३१ मे—

*लेनिनग्राडच्या रस्त्यांत आणि मशीद ?—' हॉटेल यूरोपा '— ह्या वृद्ध कुमारिका आम्हांला कां सतावताहेत ? रशियांत ही ' भिकारी ' मनोवृत्ती कां उत्पन्न झाली आहे ? ह्या लोकांना सौंदर्यदृष्टीच नाहीं !*

खरें म्हटलें तर आज सकाळीं आठ वाजतां आमची बोट लेनिन-ग्राडला पोंचावयाची. पण लंडनहून निघतांनाच सातआठ तास उशीर

झाल्यामुळें आज संध्याकाळीं सहासातपर्यंत आम्ही लेनिनग्राडला पोंचूं म्हणतात. आज सकाळपासून आम्ही फिन्‌लँडच्या आखातांत आहोंत. गर्द झाडी आणि लहानलहान डोंगर असलेल्या एका बेटाजवळून सकाळीं ९–३०च्या सुमाराला आमची बोट गेली. या बेटाचें नांव ' हेलिगोलँड.'

आज हवा चमत्कारिक आहे. आकाश ढगाळ आहे आणि थंडीहि फार वाजते आहे. बोटीवरचे रशियन उतारू म्हणतात, ' ही लेनिनग्राड वेदर ! ' सबंध युरोपांत इंग्लंडची हवा ज्याप्रमाणें आपल्या चमत्कारिकपणामुळें ' इंग्लिश वेदर ' म्हणून ओळखली जाते, तशीच रशियांत लेनिनग्राडची हवा चमत्कारिक समजली जाते. रशियांत इतर ठिकाणीं या दिवसांत उन्हाळा असला तरी लेनिनग्राडमध्यें थंडी असते, थोडा झिमझिम पाऊस असतो, आणि आकाशहि ढगाळ असतें.

दुपारीं २–३० चा सुमार झाला आहे, एका बाजूला फिनलँडचा आणि दुसऱ्या बाजूला एस्थोनियाचा किनारा दिसतो आहे. चारच्या सुमाराला एस्थोनियाऐवजीं रशियाचा किनारा दिसूं लागला. दूरवर एक लहानसें दीपगृह दिसतें आहे. हेंच तें कॉन्स्टाड्ट. झारच्या वेळेपासून रशियाचा एक प्रसिद्ध आरमारी तळ म्हणून हें ठिकाण प्रसिद्ध आहे. क्रांतीच्या वेळीं येथील खलाशांनीं केलेला पराक्रम सुविख्यात आहे. यामुळें रशियन क्रांतीच्या इतिहासांत क्रॉस्टाड्ट हें नांव अजरामर झालें आहे.

पांच साडेपांचची वेळ झाली आहे. आम्ही लेनिनग्राड बंदराच्या अगदीं जवळ आलों आहोंत. एक सोव्हिएट लॉंच वेगानें आमच्या बोटी-जवळ आली आणि कांहीं रशियन अधिकारी बोटीवर चढले. प्रत्येक उतारूचा पासपोर्ट आणि त्याच्याजवळ असलेले पैसे यांची त्यांनीं नोंद घेतली. चकचकीत काळा रंग दिलेल्या दोन सुंदर सोव्हिएट पाणबुड्या बोटी आमच्याजवळूनच जात होत्या. त्या पाण्यावर आलेल्या होत्या. त्यांचा फोटो घेण्याची मला अनावर इच्छा झाली; पण फोटो घेण्याची मनाई आहे !

बरोबर ६–३० ला बोट लेनिनग्राडच्या धक्क्याला लागली. ' इंटूरिस्ट'चे उतारू घेऊन येणाऱ्या बोटीसाठीं लेनिनग्राड बंदरांत ' इंटू-रिस्ट'चा खास धक्का आहे. या धक्क्यावरच निळया आणि सफेत रंगाची

'इंटूरिस्ट'च्या ऑफिसची टुमदार लांकडी इमारत आहे. आम्ही उतरल्या-बरोबर या इमारतींत शिरलों.

या इमारतीवर दोन उडत्या पंखांचें 'इंटूरिस्ट'चें सोनेरी चिन्ह लावलेलें आहे. तारा आणि विळाकोयत्याचें चिन्ह असलेला एक मोठा-थोरला लाल बावटा इमारतीवर फडकतो आहे. दरवाजांतून आंत गेल्याबरोबर एक भव्य हॉल लागतो. त्या हॉलच्या भिंतीवर लेनिन, स्टॅलिन, व्हॉरॉशिलॉव्ह आणि मॉलॉटॉव्ह यांचीं भव्य चित्रें टांगलेलीं आहेत. या इमारतींत एक सुंदर उपहारगृहहि आहे. या हॉलच्या पलीकडे असलेल्या दुसऱ्या हॉल-मध्यें रशियन कस्टमच्या अधिकाऱ्यांकडून आमच्या सामानाची तपासणी होणार आणि मग आमची सुटका होणार. हा हॉल मात्र छान आहे. बसावयाला सुंदर टेबलखुर्च्या असून टेबलावर नाना तऱ्हेचीं वर्तमानपत्र पडलीं आहेत. त्यांत 'मॉस्को डेली न्यूज' हें इंग्लिश वृत्तपत्र मला मिळालें.

या हॉलमध्येंच एक लहानसें ऑफिस असून तिथें पैसे बदलून मिळतात. किरकोळ खर्चासाठीं पांच शिलिंगांचे मीं रशियन पैसे घेतले. १ पौंडाला २६ रुबल या हिशोबानें मला ६ रुबल आणि ५० कोपेक मिळाले. पौंडाचे अदमासें तेरा रुपये होतात. याचा अर्थ एका रुबलची किंमत जवळजवळ आठ आणे होते. मीं मीतभीतच रुबल घेतलें कारण जास्त रुबल घेण्यांत अर्थ नाहीं. रुबलचे पुन्हा पौंड मिळणार नाहींत. बरें, रशियांतून बाहेर जातांना कांहीं रुबल उरले तर ते बाहेर नेतां येत नाहींत! रशियांतल्या मुक्कामांत होणाऱ्या प्रवासखर्चाचे, जेवणाखाणाचे, नाटकसिनेमांच्या तिकिटांचे सर्व पैसे आम्हीं एकदमच लंडनमध्यें 'इंटूरिस्ट'ला देऊन टाकलेले आहेत. त्यामुळें बाजवीपेक्षां फाजील रशियन पैसे जवळ बाळगणें धोक्याचें आहे.

सामानाच्या तपासणीला जरा वेळ होता म्हणून थोडा वेळ आम्ही इकडेतिकडे फिरलों. वाडी बंदर किंवा मशीद बंदर येथें मालगाड्यांचीं 'शेड्स्' आहेत तसा इथें भास होतो! एक रेल्वेलाईन इथून कुठेंशी गेली आहे आणि जिकडेतिकडे इमारती लांकडांचे प्रचंड ढीग पडले आहेत! लेनिनग्राड बंदरांतून इमारती लांकडाची फार मोठ्या प्रमाणावर निर्यात होते म्हणतात.

माझ्या सामानाची अगदीं कसून झडती घेण्यांत आली. प्रत्येक वस्तु उलटीसुलटी करून रशियन अधिकाऱ्यांनीं पाहिली. मामा वरेरकरांचें 'स्वैरसंचार' आणि 'जागत्या छाया' हीं दोन मराठी पुस्तकें माझ्या बॅगेंत होतीं. कसलीं पुस्तकें आहेत म्हणून विचारतां मराठी लघुकथांचीं तीं पुस्तकें आहेत म्हणून मीं त्या अधिकाऱ्याला सांगितलें. त्याला इंग्लिश भाषासुद्धां जेमतेम येत होती. तीं मराठी पुस्तकें आहेत असें म्हटल्यावर त्यानें जरा चमत्कारिक नजरेनें त्या पुस्तकांकडे पाहिलें आणि आपलें कर्तव्य केलेंच पाहिजे अशा ऐटीनें तीं तो चाळून पाहूं लागला ! 'हीं पुस्तकें जन्मभर तूं चाळीत बसलास तरी तुला त्यांतलें कांहीं समजणार नाहीं !' मीं हंसून त्याला इंग्रजींत म्हणालों.

माझे इतर कागदपत्र तपासतांना 'कॉंटे व्हेर्डे' बोटीचा एक भला थोरला 'प्लान' त्याला सांपडला. त्याची त्यानें इतक्या बारकाईनें चवकशी केली, कीं जणूं काय लष्करी किंवा आरमारी महत्वाचा तो गुप्त नकाशाच असावा ! त्याला मीं म्हटलें, "अरे बाबा, हा 'कॉंटे व्हेर्डे' नांवाच्या इटालियन बोटीचा प्लान आहे. मी या बोटीनं हिंदुस्थानहून विलायतेला आलों. माझी बोटींतली जागा निश्चित करण्याकरितां थॉमस कुक कंपनीनं मला तो दिला होता. त्यांत राजकीय किंवा लष्करी महत्वाचं कांहींएक रहस्य नाहीं."

धड इंग्रजी लिहितांवाचतां येत नसल्यामुळें त्याला तो कागद मोठा महत्वाचा वाटला आणि पांचसहा मिनिटें त्यानें मला उगाच सतावलें !

हे सर्व विधी होईपर्यंत रात्रीचे ९-३० वाजले होते—किंवा आजूबाजूचा उजेड पाहातां संध्याकाळचेंच ९-३० वाजले होते म्हणा ! प्रो. रॅफे, मॅक्लॉव्ड, मी आणि त्या दोन मध्यमवयस्क ब्रिटिश स्त्रिया असा आमचा पांचजणांचा रंगभूमि गट (Theatre group) 'इंटूरिस्ट'च्या एका छानदार फोर्ड गाडींतून आमच्या हॉटेलकडे जावयाला निघाला. 'इंटूरिस्ट'चे इतर उतारू एका मोठ्या थोरल्या बसमधून मागाहून येत होते.

लेनिनग्राड डॉकच्या मुख्य दरवाजांतून बाहेर पडण्यापूर्वी पांढरा कोट आणि पांढरेंच शिरस्त्राण घातलेल्या रशियन कस्टमच्या पोलिसानें आमची मोटर थांबविली आणि आंत वांकून आमच्या चेहऱ्यांकडे आणि आंतल्या एकंदर वस्तूंकडे निरखून पाहून आम्हांला सोडून दिलें !

आतां लेनिनग्राडच्या रस्त्यांतून आमची मोटार जात आहे. गोदीच्या बाहेर पडतांच एका बाजूला घुमट असलेली एक इमारत दिसली. कित्येक शतकांपूर्वीची ती एक जुनी मशीद आहे असें मला कळलें. लेनिनग्राडच्या रस्त्यांत आणि मशीद हें ऐकूण मला आश्चर्य वाटलें! पण त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. कित्येक शतकांपूर्वी मुसलमानांचें किंवा तुर्कांचें साम्राज्य रशियापर्यंत पसरलें होतें ही गोष्ट इतिहासप्रसिद्धच आहे; आणि त्या वेळचे अवशेष अजूनहि रशियांत आहेत. लेनिनग्राड किंवा मॉस्कोमधल्या बऱ्याचशा ख्रिश्चन प्रार्थना-मंदिरांच्या किंवा चर्चेसच्या शिल्पपद्धतीवर मुसलमानी छाप पडलेली दिसते. मशिदींसारखे मोठमोठे सोनेरी घुमट या चर्चेसवर आहेत. आमची मोटार लेनिनग्राडच्या रस्त्यांतून जात असतांना असे सोनेरी घुमट असलेलीं कितीतरी प्रार्थनामंदिरें आमच्या दृष्टीस पडलीं.

लेनिनग्राड हें एक भव्य पण जुनाट शहर वाटतें. बोटींतून बाहेर पडल्यावर रस्त्यांच्या आजूबाजूला जीं घरें दिसताहेत, तीं पाहून मुंबईत शेअर–बाजार किंवा जुनें कस्टमहाउस या बाजूला कंपनी सरकारच्या वेळचीं भव्य, लांबच लांब, पण जुनाट घरें किंवा वखारी आहेत त्यांची मला आठवण होते. लेनिनग्राड शहरांतून नेव्हा नदी वाहत असल्यामुळें आमची मोटार कितीतरी पूल ओलांडून जाते आहे. शेवटीं लासाल् स्ट्रीटमध्यें 'हॉटेल युरोपाच्या' सहासात मजली भव्य इमारतीपुढें आमची मोटर थांबली. नेव्हा नदीवरला एक मोठा थोरला भव्य पूल इथेंच जवळपास आहे.

लेनिनग्राडचा किंवा पूर्वीच्या पेट्रोग्राडचा हा अत्यंत रंगेल आणि विलासी भाग. लंडनची जशी पिकॅडिली, पॅरिसची शाँ एलिसी किंवा बर्लिनचा उंटरडन लिंडन, तसा पेट्रोग्राडचा हा 'नेव्हस्की प्रॉस्पेक्ट!' रशियन क्रांतीपूर्वी झारच्या जमान्यांत या 'नेव्हस्की प्रॉस्पेक्ट'वर भरजरी लष्करी पोषाख केलेले अमीरउमराव आणि कपड्यांची छानछोकी करणाऱ्या पांढरपेशा वर्गांतल्या रंगेल तरुणतरुणी संध्याकाळच्या वेळीं ऐटींत हिंडत असत. तो जमाना बदलला. पेट्रोग्रॅडचें लेनिनग्रॅड झालें. 'नेव्हस्की प्रॉस्पेक्ट'चें नवें नांव '25th October Prospect' असें आहे. १९१७ च्या

क्रांतींतला अत्यंत महत्वाचा दिवस २५ ऑक्टोबर; त्याच्या स्मरणार्थ हें नांव देण्यांत आलें आहे. पण 'नेव्हस्की प्रॉस्पेक्ट' हें नांव रशियन लोकांच्या तोंडांत इतकें बसून गेलें आहे, कीं सहज बोलतांना 'नेव्हस्की प्रॉस्पेक्ट' याच नांवानें ते या भागाला संबोधतात. याच 'नेव्हस्की प्रॉस्पेक्ट'वरील लसाल् स्ट्रीटमध्यें आमचें 'हॉटेल युरोपा' आहे.

'हॉटेल युरोपा'चा आंतला भाग एखाद्या राजवाड्यासारखा अत्यंत प्रेक्षणीय आहे. पांचव्या मजल्यावरची नं. १९० ची खोली मला आणि मॅक्डॉव्हला देण्यांत आली आहे. खोली ऐसपैस आणि सुंदर आहे. खोलीला लागूनच एक सुरेख बाथरूम आहे. अत्यंत आधुनिक पद्धतीच्या सजावट–सामानानें खोली शृंगारली आहे. असल्या हॉटेलांत राहावयाचा मला पुन्हा कधीं योग येईलसें वाटत नाहीं ! पण स्टालिनच्या कृपेनें रशियांत चार दिवस चैन झाली आहे खरी ! हॉटेलच्या अगदीं वर शेवटच्या मजल्यावर 'डायनिंग हॉल' आहे. आतां १०–३० वाजले आहेत. पण या हॉटेलांत वाटेल तेव्हां वाटेल तें जेवण मिळतें ! दुपारचा 'लंच' संध्याकाळीं घ्या, संध्याकाळचें 'डिनर' रात्रीं बारा वाजतां घ्या, केव्हांहि, कसलेंहि जेवण घ्या ! हें युरोप नव्हे, हा रशिया आहे !

हॉटेलांत आल्याबरोबर आमचे 'पासपोर्ट' घेणाऱ्या मुलीनें आम्हांला सांगितलें होतें, कीं लेनिनग्राडमध्यें सिनेमाचा 'शो' रात्रीं ११ वाजतां सुरू होतो. तेव्हां घाईघाईनें 'डिनर' घेऊन ११ च्या 'शो'ला जावें असा विचार केला होता. बोट सकाळीं येण्याऐवजीं लेनिनग्राडला संध्याकाळीं आल्यामुळें लेनिनग्राडच्या कार्यक्रमांतला आमचा एक दिवस फुकट गेलाच होता, तेव्हां रात्रीं निदान सिनेमा तरी पाहून घ्यावा असें आम्हीं ठरविलें. हो, या सर्व कार्यक्रमाचे भरपूर पैसे आम्हीं 'इंटूरिस्ट'ला भरले आहेत.

पण 'इंटूरिस्ट'च्या आणि या रशियन लोकांच्या गबाळेपणानें एक दिवसच काय, पण आणखी बराच वेळ फुकट जावयाचा होता. १०–३०ला जेवण घेऊन ११ चा 'शो' साधावयाचा आम्हीं खूप विचार केला, पण या हॉटेलच्या मंद आणि मठ्ठ वेटर्सच्या मनांतून आम्हीं 'शो' पाहावा असें कुठें होतें ! ते धीमेपणानें 'सूप'ची प्लेट गेल्यानंतर अर्ध्या तासानें दुसरी प्लेट आणीत होते. त्यानंतर चाळीस मिनिटांनीं तिसरा

कोर्स आणि शेवटीं बारा वाजून दहा मिनिटांनीं कॉफी ! अशा मोंगलाई आरामांत १०–४५ ला सुरू केलेलें जेवण आम्हीं १२-१५ ला आटोपलें ! सुदैवानें ' मेन्यू कार्ड 'वर इंग्लिश, जर्मन, फ्रेंच आणि रशियन या चारी भाषांत पदार्थोंचीं नांवें नंबरवार दिलीं होतीं. तेव्हां इंग्लिशमध्यें पाहून रशियन भाषेंतल्या त्याच नंबरावर बोट ठेवून दाखविल्यामुळें निदान पदार्थ तरी आम्हांला व्यवस्थित मिळाले. नाहींतर या गबाळ्या रशियन वेटर्सनीं ' सूप ' ऐवजीं कॉफी आणि कॉफीऐवजीं बटाटे आमच्या-पुढें आणून ठेवले असते !

अशा तऱ्हेनें स्वतःशीं चरफडत आम्हीं बाहेर पडलों. सिनेमा तर चुकलाच; आतां पांढऱ्या रात्री असल्यामुळें बाहेर पडावें आणि लेनिनग्राड शहर पाहावें असें आम्हीं ठरविलें.

पण संकटें येतात तेव्हां एकामागून एक येतात ! मॅक्लॉव्ड्, मी आणि तो केनेडियन म्हातारा अशा आम्हीं तिघांनीं बाहेर पडावयाचा बेत केला खरा; पण आमच्या गटांतल्या त्या दोन म्हाताऱ्या ब्रिटिश बाया आणि प्रो० रॅफे हेहि आमच्याबरोबर यावयाला निघाले ! या दोन ब्रिटिश म्हाताऱ्या वृद्ध कुमारिका ( Spinsters ) आहेत. समजत कांहीं नाहीं; पण आव मोठ्या शिष्टपणाचा आणतात ! रशियन रंगभूमीची काय, पण कसल्याच रंगभूमीची यांना माहिती नाहीं ! पैसा जवळ आहे आणि दर वर्षी कुठेंतरी जायचें म्हणून यंदां या रशियाला आल्या आहेत. गेल्या वर्षी जर्मनी पाहावयाला गेल्या होत्या ! आपणांलाहि कलेचें मर्म समजतें हें दाखवण्याकरितां आमच्या ' Theatre group ' मधून या आल्या असाव्या. आम्ही आपले मजेंत लेनिनग्राडमध्यें फिरणार आणि या म्हाताऱ्या आमच्याबरोबर कशाला ! " या वृद्ध कुमारिकांच्या संगतींत मी वेडा होईन ! " मॅक्लॉव्ड म्हणतो, "Our sole strategy in Russia ought to be to avoid these old women ! " मलाहि तें मना-पासून पटतें.

आम्ही बरोबरच बाहेर पडलों. १२–३० झाले आहेत; पण संध्या-काळीं सहासात वाजतां मुंबईत चौपाटीच्या रस्त्यावर गर्दी असते तशी गर्दी 'नेव्हस्की प्रॉस्पेक्ट'वर आहे. बायकामुलें घेऊन कामगारांच्या झुंडीच्या झुंडी

मजेंत रस्त्यावरून फिरताहेत–पांढऱ्या रात्री आहेत म्हणून कीं काय ? ट्रामगाड्यासुद्धां चिक्कार भरून जाताहेत. रस्त्यावरल्या गर्दींत रॅफेबरोबर त्या दोन म्हाताऱ्यांना सोडून देऊन आम्ही तिथें हळूच निसटलों आणि दुसऱ्या एका रस्त्यावर वळलों !

एवढ्या गर्दींतसुद्धां आम्ही परदेशस्थ आहोंत हें ओळखणें सोपें होतें. दोनतीन रशियन छोकरे आमच्याभोंवतीं जमले आणि रशियन व मोडक्यातोडक्या जर्मनमध्यें आम्हांला कांहीं विचारूं लागले. मॅक्लॉव्डला आणि त्या कॅनेडियनला थोडेंसें जर्मन येत होतें. माझ्या मनगटावरील ‘ रिस्टवॉच ’ पाहाण्याकरितां त्या पोरांनीं इतकी धडपड केली, कीं त्यांनीं ‘ रिस्टवॉच ’ ही वस्तु पहिल्यांदांच पाहिली कीं काय असा मला संशय आला ! मला वाटलें, त्यांना वेळ पाहावयाचा आहे. म्हणून मीं त्यांना हाताच्या बोटांनीं किती वाजले तें सांगावयाला लागलों. ते कांहींतरी मला विचारीत होते; त्यांना वेळ नको होती. तो कॅनेडियन म्हणाला, “ हें घड्याळ विकतोस का म्हणून तुला ते विचारीत आहेत ? ”

आमच्याकडचीं फाउंटनपेनें त्यांनीं पाहावयाला मागितलीं आणि इतक्या बालिश कौतुकानें ते माझ्या ‘ पार्कर ’ पेनकडे पाहात होते, कीं तें त्यांना देऊन टाकून त्यांना खूष करावें असा क्षणभर मला मोह झाला. पण तितकें औदार्य दाखविणें मला शक्य नव्हतें. फाउन्टन पेनें, घड्याळें इत्यादि वस्तु रशियांत इतक्या महाग आहेत, कीं सर्वसाधारण माणसाला त्या विकत घेणें जवळजवळ अशक्य आहे ! चैनीच्या वस्तु महाग करणें सोपें आहे; पण लोकांच्या मनांतील सुंदर वस्तूंची आवड मारून टाकणें वीस वर्षें समाजसत्तावादाचा ‘ डोस ’ पाजूनहि तितकेंसें सोपें नाहीं, हें रशियांतल्या माझ्या पहिल्या दिवसाच्या या पहिल्याच अनुभवानें मला ताबडतोब पटलें. ते तरुण किती आशाळभूतपणें आमच्याभोंवतीं घोंटाळत होते ! सर्वसाधारण रशियन जनतेचे प्रातिनिधिक ते तरुण होते असें म्हणणें धाष्ट्यार्चें आहे; कदाचित् ते कुणी ‘मौला’ हि असतील. पण असा प्रकार घडला खरा. कपड्यांचा सुंदर ‘ सूट ’ पाहूनहि रशियन लोकांच्या तोंडाला असेंच पाणी सुटतें आणि परदेशी प्रवाशाला “ तुझा सूट विकत देतोस का ? ” म्हणून ते केव्हांकेव्हां विचारतात असा रशियाहून आलेल्या आपल्या एका मित्राचा अनुभव मॅक्लॉव्ड्नें सांगितला.

भांडवलशाही फॅसिस्ट राष्ट्रांकडून केव्हां कसा हल्ला होईल आणि जगांतलें एकुलतें एक समाजसत्ताक राष्ट्र केव्हां उलथलें जाईल याचा नेम नसल्यामुळें रशियन सरकारला लोकांच्या इच्छाआकांक्षा, आवडीनिवडी बाजूला सावरून,—लोकांचीं मनें मारून, प्रचंड यंत्रें, शस्त्रास्त्रें, विमानें आणि इतर मोठमोठ्या औद्योगिक योजना यांवर आपलें सर्वस्व खर्च करावें लागत असेल आणि त्यामुळें कपडालत्ता, घड्याळें, फाउण्टन पेनें इत्यादि चैनीच्या वस्तूंच्या उत्पादनाकडे लक्ष द्यावयाला त्यांना वेळ किंवा ऐपत नसेल. पण त्यामुळेंच जनतेंत वर उल्लेखलेली 'भिकारी' मनोवृत्ति बळावत नसेल ना? अर्थात् एक वेळ ही मनोवृत्ति बळावली तर चालेल; पण पहिल्या समाजवादी राष्ट्राचें इतर बाबतींत बळ वाढविणें अधिक महत्वाचें आहे हें कुणीहि कबूल करील.

रस्त्यावरून जातांना मोठमोठ्या स्टोअर्सच्या 'शो केसेस'मध्यें मांडलेल्या इतर कांहीं वस्तूहि मला अशाच भयंकर महाग वाटल्या. 'हिज मास्टर्स व्हॉइस'च्या 'पोर्टेबल' ग्रामोफोनसारखाच दिसणारा एक रशियन ग्रामोफोन होता, त्याची किंमत ५५० रूबल्स लावलेली होती! ५५० रूबल्स म्हणजे अडीचशेंहून अधिक रुपये झाले! सैबेरियांतल्या पांढऱ्या अस्व-लांच्या केंसाळ कातडीचा एक 'फरकोट' मीं पाहिला. त्याची किंमत २३०० रूबल्स् किंवा ११५० रुपये लावलेली होती! या वस्तू विकत घेतो तरी कोण? चैनीसाठीं रशियांत प्रवास करणारे अमेरिकन लक्षाधीश रशियाची एक आठवण म्हणून या वस्तु विकत घेत असतील!

रात्रीं दहा वाजतां बंदरावरून आम्ही हॉटेलांत आलों, तेव्हां मी आणि मॅक्लॉण्ड् सिगारेट्स् विकत घ्यायला म्हणून हॉटेलच्या समोरच असलेल्या एका तंबाखूच्या दुकानांत गेलों. तिथेंहि महागाईचा हाच अनुभव आला. आंत गेलों तों पहिल्यांदां कुणी दिसलेंच नाहीं. एका कोंपऱ्यांत दोन पोरी गप्पा मारीत बसल्या होत्या. बऱ्याच वेळानें आम्ही खूण केल्यावर त्या डुलतडुलत आमच्याकडे आल्या. 'अलेग्रा' नांवाच्या उत्तम समजल्या जाणाऱ्या रशियन सिगरेट्स्चें एक पाकीट मॅक्लॉण्ड्नें विकत घेतलें. १० सिगरेट्स्च्या एका पाकिटाची किंमत २ रुबल्स म्हणजे एक रुपाया! त्यांत आणखी रशियन सिगरेट्समध्यें अर्धा भाग जाड काग-

दाची पोकळ नळी असते आणि अर्ध्या भागांत तंबाखु असते. याचा अर्थ १ रुपायाला ५ सिगारेट्स् ! मॅक्लॉव्डचे डोळे पांढरेच झाले ! पण त्याचा सिगरेट्चा शोक मोठा आहे. त्या मुलींच्या वागणुकींतील एकंदर चाल-ढकल आणि बेपर्वाई आमच्या हॉटेलमधल्या वेटर्सच्या तोडीचीच होती ! बेपर्वाई याचा अर्थ उद्धटपणा असा मात्र कुणीं घेऊं नये. ते वेटर्स काय किंवा या दुकानांतल्या मुली काय, त्यांच्यांत सौजन्य भरपूर होतें; पण 'माल पाहिजे तर घ्या अगर नका घेऊं, आम्हांला काय त्याचं मोठंसं ?' असा एक प्रकारचा निष्काळजीपणा मला आढळला. रशियन माणसांच्या स्वभावांतलाच हा गबाळेपणा आहे, कीं आपला माल संपून आपला फायदा व्हावा म्हणून मोठ्या तत्परतेनें भांडवलवाला गिऱ्हाईकांची मर्जी संभाळतो तशी परिस्थिति नसून स्पर्धारहित समाजवादी व्यवस्था असल्या, मुळें, माल संपो अगर न संपो आमचा पगार आम्हांला मिळणार, अशा तऱ्हेची बेपर्वा वृत्ति या लोकांची झाली आहे. काय असेल तें असो-मला हा प्रकार आवडला नाहीं.

मध्यरात्र झाली तरी 'नेव्हस्की प्रॉस्पेक्ट'वर स्वच्छंदपणें फिरत असलेल्या रशियन स्त्रीपुरुषांच्या या झुंडी पाहून मॅक्लॉव्ड म्हणतो,

"आमच्या ऑक्सफर्ड स्ट्रीटवर किंवा पिकॅडिल्ली सर्कसमध्यें रात्रीच्या वेळीं इतक्या मजेंत आणि निष्काळजीपणें फिरत असलेले इंग्लिश कामगारांचे आणि त्यांच्या बायकांचे कधींतरी घोळके दिसतात काय ?"

त्यावर आमचा कॅनेडियन म्हातारा म्हणतो, "बाबा, समाजवादी रास्ट्रांत प्रत्येकाला वाटणारी ही आर्थिक सुरक्षितता ! यांना 'उद्यां'ची काळजी असायचें कारण काय ?"

चैनींत फिरणाऱ्या या हजारों रशियन लोकांना पाहून आनंद होतो खरा, पण त्यांचे गचाळ कपडे मात्र माझ्यानें पाहावत नाहींत. युरोपमध्यें जसा, 'फेल्ट हॅट्स'चा सुकाळ दिसतो, तसा इथें मुळींच दिसत नाहीं. फार काय, औषधालासुद्धां या गर्दींत 'फेल्ट हॅट' मिळणार नाहीं ! बहुतेक पुरुषांच्या डोक्यांवर चुरगळलेल्या 'माकड टोप्या' (Monkey Caps). उरलेसुरलेले बोडकेच ! बायकांचेंसुद्धां तसेंच ! युरोपमधल्या स्त्रिया ज्याप्रमाणें निरनिराळ्या आकारांच्या आणि चित्र-

विचित्र रंगांच्या सुंदर टोप्या वापरतात तसें इथें कांहीं नाहीं! शेंकडा नव्वद बायकांच्यासुद्धां डोक्यावर 'बेरे कॅप्स्' (Beret Caps). उरलेल्या दहा टक्के उघड्या डोक्यांनीं किंवा कसलातरी रंगीत रुमाल डोक्याला गुंडाळून फिरतात! या 'बेरे' किंवा हे रुमालसुद्धां बहुतेक लाल रंगाचे. लाल रंगाची आवड साम्यवादावरील निष्ठा दाखवते; याबद्दल मला कांहींच म्हणावयाचें नाहीं; पण उठल्यासुटल्या वाटेल त्यासाठीं लाल रंग वापरलेला कांहीं चांगला दिसत नाहीं. एकाद्या मुलीचा भडक लाल रंगाचा झगा आणि त्यावर तांबडी बेरे टोपी पाहिली, कीं तिच्या रुचिहीनतेची आणि सौंदर्यदृष्टीच्या अभावाची कींव येते. पण या रशियन लोकांचे कपडे पाहिले कीं सौंदर्यदृष्टि किंवा रंगसंगती कशाशीं खातात हेंसुद्धां यांना माहीत नसावें याची खात्री होते! वाटेल त्या कापडाचे बायका झगे वापरतात आणि तेसुद्धां किती बेढब!

'फेल्ट हॅट' प्रमाणेंच 'टाय्' सुद्धां बहुतेक पुरुषांच्या गळ्यांत दिसत नाहीं. कसल्यातरी धुरकट, निळसर किंवा करड्या रंगाची तुमान, त्यावर तिसऱ्याच रंगाचा शर्ट आणि तसलाच कसला तरी धुरकट कोट हा पुरुषांचा 'ड्रेस'! रशियन पुरुषांच्या या झुंडी पाहिल्या कीं थोडेसे गोरे झालेल्या आमच्या गोव्याच्या 'बुटलेरां'चे थवेच्या थवे इकडे फिरताहेत कीं काय असा भास होतो!

हे लोक 'फेल्ट हॅट' वापरीत नाहींत किंवा कडक इस्तरीवरच्या कॉलरवर 'टाय' वापरीत नाहींत म्हणून मला मुळींच राग येत नाहीं. अमक्या वेळीं अमकेच कपडे वापरले पाहिजेत आणि तमक्या वेळीं तमकेंच केलें पाहिजे हा युरोपियन लोकांचा अतिशिष्टपणा मलाहि आवडत नाहीं. कपड्यालत्त्यांत स्वैरता असावी असेंच मला वाटतें. पण त्याचा अर्थ भिकार रंगांचे आणि कसेतरी शिवलेले कपडे वापरावे असा होत नाहीं. इतर चैनीच्या वस्तूंप्रमाणें कापडहि रशियांत महाग असेल आणि इतर राष्ट्रोपयोगी वस्तूंच्या उत्पादनामुळें उत्तम प्रकारचें कापड रशियन सरकार काढूं शकत नसेल, पण म्हणून रंगसंगतीला हरताळ फांसावा किंवा अव्यवस्थितपणें शिवलेले गबाळे कपडेच वापरावे असा रशियन सरकारचा हुकूम खास नसेल! पिढ्यान्

पिढ्या दारिद्र्यांत रुतलेल्या आमच्या गरीब हिंदी लोकांचे कपडे यांपेक्षां डोळ्यांना कितीतरी आल्हाददायक वाटतात.

रस्त्यांतल्या दुकानांतील वस्तूंची मांडणीहि मला विशेष मोहक वाटली नाहीं. या एकंदर सर्व गोष्टींमुळें रशियन शहरांतलें हें वातावरण अतिशय धुरकट, भकास आणि रंगहीन ( drab ) वाटतें. या खडबडीत चेहेऱ्याच्या आणि पिवळट रंगाच्या गबाळ लोकांतून फिरतांना पुढारलेल्या झकपक युरोपांतून आपण पुन्हा मागासलेल्या आशिया खंडांत आलों आहोंत असा भास होतो.

दुसरी एक मजेदार गोष्ट रस्त्यांतून फिरतांना माझ्या दृष्टोत्पत्तीस आली, त्यामुळें हा भास तर अधिकच होऊं लागला. आपल्याकडे संन्यासी किंवा सोंवळ्या बाया करतात त्याप्रमाणें सबंध डोक्याची गुळगुळीत हजामत केलेले कितीतरी रशियन लोक रस्त्यांत आणि दुकानांत मला दिसले. एका कॅफेच्या मॅनेजरनें तर टाय, बूटसूट वगैरे चांगले युरोपियन पद्धतीचे कपडे केले होते; पण वर तुळतुळीत गोटा! ही एक नवी फॅशन आहे, कीं उन्हाळ्यांत कांहीं वयस्क लोक आपलीं डोकीं तासतात, कांहीं समजत नाहीं. कारण रशियाचा उन्हाळा बराच कडक असतो !

आम्ही परत फिरेपर्यंत रात्रीचे १–४० झाले होते. बहुतेक दुकानें बंद झालीं होतीं आणि गर्दीहि खूप कमी झाली होती. दारू पिऊन झिंगलेले पांचसहा लोक तरी या एकदीड तासाच्या अवधींत आम्हांला रस्त्यांत आढळले. एका माणसाला तर दुकानचा द्वाररक्षक मानगुटीला धरून दुकानाच्या बाहेर ओढून काढीत होता आणि ढकलून दिल्यावर तो माणूस कोलमडत कोलमडत पुनःपुन्हा दुकानाच्या दारावर जाऊन पडत होता ! तंबाखू अतिशय महाग केल्यामुळें तंबाखूचें व्यसन रशियन तरुणांतून जवळजवळ नाहींसें होत चाललें आहे. या दारूच्या व्यसनाची रशियन सरकार अशीच विल्हेवाट कां लावीत नाहीं तें समजत नाहीं.

रस्त्यांतून आणखी एक चमत्कारिक गोष्ट आम्हांला दिसली. प्रत्येक बंद झालेल्या दुकानाच्या दारावर एखाद्या लांकडाच्या खोक्यावर किंवा घडवंचीवर डुलक्या घेत बसलेली कुणीतरी जख्खड म्हातारी किंवा म्हातारा आमच्या दृष्टीला पडत असे. रशियांत भिकारी नाहींत म्हणतात; पण हे

भिकारी तर नव्हेत ना असा आम्हांला संशय आला. पण नंतर आम्हांला कळलें, कीं इतर कांहीं काम करणें ज्यांना शक्य नाहीं त्यांना कांहींतरी काम म्हणून हें संरक्षकांचें ( Custodian ) काम देण्यांत येतें. काय खरें असेल तें असो.

बरोबर एक वाजतां रस्त्यांतले दिवे गेले होते. पण पांढरी रात्र असल्यामुळें वाट दिसावयाला अडचण नव्हती. दोनच्या सुमाराला आम्ही आमच्या 'हॉटेल युरोपांत' परत आलों.

* * *

## ता. १ जून—

*तो तांबडा रविवार !—'हार्मिटाज'—क्रांतीचें पदार्थ वस्तु-संग्रहालय.—बिचारा ट्राट्स्की !—सेंट ऐझॅक्स कॅथेड्रल.—हें नाटक महाराष्ट्र नाटक मंडळीचें तर नव्हे !*

आज उठायला साडेनऊ वाजले. 'ब्रेकफास्ट' वगैरे आटोपून मी आणि मॅक्लाव्ड् दुपारीं बारा वाजतां 'इंटूरिस्ट'च्या 'गाइड'मुलीबरोबर 'हर्मिटाज'—क्रांतीचें वस्तुसंग्रहालय (Museum of Revolution ) आणि सेंट ऐझॅक्स कॅथेड्रल हीं लेनिनग्राडमधलीं सुप्रसिद्ध स्थळें पाहावयास बाहेर पडलों.

मॅक्लॉव्डला एक रशियन—इंग्लिश डिक्शनरी पाहिजे होती म्हणून वाटेंत एका पुस्तकांच्या दुकानांत गेलों. तेथें डिक्शनरी सांपडली नाहीं; पण वॉल्ट व्हिटमन् या अमेरिकन कवीचें 'Leaves of Grass' हें इंग्लिश पुस्तक मात्र मला एका कपाटांत दिसलें.

थोड्याच वेळांत 'यूरीट्स्की स्क्वेअर'मध्यें आम्ही येऊन पोंचलों. लेनिनग्राडमधले एकएक स्क्वेअर खरोखरच केवढे तरी भव्य आहेत. चार किंवा अधिक रस्ते मिळतात तिथें मोठी थोरली मोकळी जागा प्रत्येक युरोपियन किंवा कुठल्याहि शहरांत दृष्टीला पडते हें खरें आहे. पण रशियन शहरांतले हे स्क्वेअर हें रशियाचें एक वैशिष्ट्य आहे. एकएक स्क्वेअर केवढा मोठा ! चार रस्ते एके ठिकाणीं मिळतात तिथें

मुंबईतल्या अफाट ‘कापाच्या मैदाना’इतकी मोकळी जागा मध्यें आहे असें समजा, म्हणजे हे स्क्वेअर किती भव्य दिसत असतील याची कल्पना येईल. समोरच झारचा इतिहासप्रसिद्ध ‘विंटर पॅलेस’ दिसतो आहे. याच विंटर पॅलेससमोरील याच स्क्वेअरमध्यें आपलीं गाऱ्हाणीं झारसमोर मांडण्याकरितां आलेल्या हजारों कामगारांवर इतिहासांत ‘तांबडा रविवार’ (Red Sunday) या नांवानें सुप्रसिद्ध असलेल्या रविवारीं झारच्या घोडे-स्वारांनीं आणि सैनिकांनीं तलवारी आणि बंदुकांचा बेफाम हल्ला करून रक्ताच्या नद्या वाहवल्या होत्या. त्या वेळेला या स्क्वेअरमध्यें बर्फ पडलें होतें आणि पांढऱ्या बर्फावरून अक्षरशः तांबड्या रक्ताच्या नद्या वाहिल्या होत्या असें इतिहासांत वर्णन आहे.

१९१७ सालच्या नोव्हेंबर महिन्यांत बोल्शेव्हिकांच्या पुढारीपणा-खालीं क्रांतीचा जेव्हां पहिला सशस्त्र उठाव या शहरांत झाला, तेव्हां या राजवाड्याच्या मागल्या बाजूनें वाहत असलेल्या नेव्हा नदीवरील युद्धनौकेंतील खलाशांनीं बोल्शेव्हिकांच्या बाजूनें बंड पुकारून या ‘विंटर पॅलेस’वर तोफांचा भडिमार केला. समोरच दिसत असलेल्या या ‘विंटर पॅलेस’वर पहिल्यांदाच दृष्टि गेल्याबरोबर वीस वर्षांपूर्वींच्या रशियन क्रांतीचा हा रोमांचकारी इतिहास माझ्या डोळ्यांसमोर उभा राहिला आणि क्षणभर अंतःकरण थरारून गेलें. त्या वेळेला या स्केअरचें नांव दुसरें होतें. क्रांतीनंतर यूरीट्स्की या सुप्रसिद्ध बोल्शेव्हिकाचा खून झाला. त्याच्या नांवानें हा स्केअर आतां ओळखला जातो.

आकाशांत ढग जमले आहेत आणि थोडासा झिमझिम पाऊसहि पडतो आहे. या पावसाळी वातावरणांत हा भव्य स्केअर आणि विंटर पॅलेसच्या आजूबाजूचा भाग अगदीं शांत आणि निर्जन दिसतो आहे. माझ्या मनांत एक चमत्कारिक विचार आला. एकादा खुनी माणूस आपण कोर्टांत पाहातों, तो किती गरीब आणि दीनवाणा दिसतो ! आपणांला केव्हांकेव्हां वाटते, खरोखरचा यानें खुनासारखें भयंकर कृत्य केलें असेल काय ?—तसेंच या वेळीं मला वाटलें. इतके भयंकर प्रकार या स्क्वेअर-मध्यें खरोखरच कांहीं वर्षांपूर्वीं घडले असतील काय ? असे खुळे विचार आपल्या मनांत केव्हांकेव्हां येतात खरे.

या विंटर पॅलेसचे आतां दोन भाग केले आहेत. या राजवाड्यांत एकंदर हजारांवर दालनें आहेत. एका भागाला 'हर्मिटाज' हें नांव दिलें असून त्यांत जुन्यानव्या जगविख्यात चित्रकारांच्या चित्रांचें संग्रहालय आहे. दुसऱ्या भागाला 'क्रांतीचें वस्तुसंग्रहालय' असें नांव दिलें आहे.

'हर्मिटाज्'च्या प्रवेशद्वारासमोर एका प्रचंड वीसपंचवीस फूट उंचीच्या कामगाराचा पुतळा आहे. त्याचा एक पाय एका प्रचंड ऐरणीवर असून आजूबाजूला तुटून पडलेल्या सांखळ्या आहेत. बाजूला एक हातोडा आहे आणि त्यानें एक हात वर उगारला आहे. जिन्याजवळच स्टालिनचा एक भव्य अर्धपुतळा आहे. 'हर्मिटाज्'मध्यें रेंब्रांड्ट, लिओनार्डो दा विंची, इत्यादि विख्यात प्राचीन चित्रकारांचीं मौल्यवान चित्रें मला पाहायला मिळालीं. आमच्या 'गाइड'ला चित्र-कलेचें सूक्ष्म ज्ञान आहे. प्रत्येक चित्राचें मर्म तिनें आम्हांला समजावून सांगितलें. आपण एका 'आर्ट स्कूल'मध्यें चित्रकलेचें शिक्षण घेत असल्याचें तिनें कबूल केलें.

नंतर आम्हीं 'क्रांतीचें वस्तुसंग्रहालय' पाहायला सुरवात केली. निरनिराळ्या दालनांतून रशियन दहशतवाद्यांची चळवळ, १९०५ ची अयशस्वी क्रांति आणि १९१७ सालची यशस्वी क्रांति यांमधल्या प्रसंगांचे प्रेक्षणीय अवशेष लावून ठेवण्यांत आलेले आहेत. एका खोलींत झारशाहींत कामगारांची राहाणी कशी होती आणि श्रीमंतांची कशी होती यांतला विरोध दाखवला आहे. एका बाजूला कामगाराची खोली दाखवली आहे. दुसऱ्या बाजूला मखमलीनें मढवलेल्या खुर्च्या आणि कोंच असलेली उमरावाची खोली दाखवली आहे. कामगाराची खोली आमच्या मुंबईत सिमिटाच्या चाळींत राहाणाऱ्या कुठल्याहि कामगाराच्या खोलीसारखी हुबेहुब आहे.

लेनिन, स्टालिन आणि व्हॉरॉशिलॉव्हचे तरुणपणींचे कितीतरी फोटो एका खोलींत आहेत. दाढ्या वाढलेले, फाटके कपडे घातलेले या फोटोंतले हे 'भाई'लोक कधींकाळीं रशियाचे राज्यकर्ते होतील असें त्या वेळच्या कुठल्याहि पांढरपेशा कारकुनाला वाटलें नसेल! दुसऱ्या एका खोलींत ज्या दुहेरी तळ असलेल्या एका बॅगेंतून लेनिन स्विट्झर्लंड किंवा इंग्लंड-

मधून ‘ इस्क्रा ’ पत्राचे अंक बेकायदेशीर रीतीनें रशियांत धाडीत असे ती जुनी बॅग, त्याचप्रमाणें झारशाहींत तळघरांतून बोल्शेव्हिकांचे जे गुप्त छापखाने असत त्या छापखान्यांच्या हुबेहूब प्रतिकृति ( Models ) आहेत.

एका खोलींत झार दुसरा अलेक्झांडर याची दहशतवाद्यांच्या बॉंबनें छिन्नविच्छिन्न झालेली घोड्याची गाडी आहे. या गाडीचा इतिहास मजेदार आहे. या गाडींत बसून रस्त्यांतून मिरवत झार अलेक्झांडर जात होता. एका नाक्यावर गाडी जाते न जाते तोंच कुठूनसा एक बॉंब आला. पण त्याचा नेम चुकला आणि झार वांचला. तेव्हां झार उद्गारला, “ God saved us ! ” हे शब्द बोलून गाडी पुढें दुसऱ्या नाक्यावर जाते तों दुसरा बॉंब आला आणि त्यानें गाडीसह झारचा फडशा उडवला आणि आमची गाइड म्हणाली, “ God did not save him ! ”

या एवढ्या मोठ्या वस्तुसंग्रहालयांत क्रांतीच्या वेळीं लेनिनच्या खांद्याला खांदा लावून काम करणाऱ्या ट्रॉट्स्कीचं एक बोटभरहि चित्र नाहीं, कीं त्याचा कुठें उल्लेख नाहीं. फक्त एका कोंपऱ्यांत प्लेखानॉव्ह हा सुप्रसिद्ध रशियन कम्युनिस्ट तत्त्वज्ञ आणि ट्रॉट्स्की या दोघांचीं वीत दीड वीत लांबीच्या कागदावर काळ्या शाईनें काढलेलीं दोन व्यंगचित्रें आहेत. ट्रॉट्स्कीच्या चित्राखालीं ‘ सशस्त्र उठावासाठीं कामगारांची संघटना करण्याची जरुरी नाहीं. ’ हें वाक्य त्याच्या तोंडीं घातलें आहे ! प्लेखानॉव्हच्या चित्राखालीं ‘ कामगारांना सशस्त्र करतां कामा नये ’ हें वाक्य आहे !

‘ क्रांतीचें वस्तुसंग्रहालय ’ पाहून संपेपर्यंत दुपारचे तीन वाजले होते. अजून लेनिनग्राडमधलें सुप्रसिद्ध सेंट ऐझॅक्स कॅथेड्रल पाहावयाचें राहिलें होतें. तें पाहून नंतर हॉटेलमध्यें परत जायचें आम्हीं ठरवलें. हें प्रार्थनामंदिर अतिशय भव्य आणि प्रेक्षणीय आहे. मुंबईच्या टाउनहॉलच्या प्रवेशद्वाराजवळ आहेत तसे भव्य दगडी खांब इमारतीच्या चारी बाजूंना असून ते अस्सल ‘ ग्रॅनाइट ’ दगडाचे आहेत. इमारतीच्या आंत सर्वत्र अत्यंत मौल्यवान् असा गुलाबी छटा असलेला ॲलबॅस्टर नांवाचा इटालियन दगड आणि हिरवट आणि निळसर रंगाचे इतर जातींचे नाना देशांहून आणलेले संगमरवरी दगड वापरले आहेत. ज्या झारच्या अमदानींत हें बांधलें गेलें, त्यानें त्यावर दोन कोटी

आणि तीस लाख रूबल्स खर्च केले. त्या वेळीं रूबलचा भाव रुपयाहून अधिक होता. सुप्रसिद्ध फ्रेंच शिल्पकार मॉंट् फेरॉं याच्या देखरेखीखालीं हें बांधण्यांत आलें. सोव्हिएट सरकारनें ही सुंदर इमारत अत्यंत काळजीपूर्वक जतन करून ठेवली आहे. इमारतींत शिरल्याबरोबर समोरच इतर चर्चेसमध्यें जिथें येशू खिस्ताची भव्य आकृति असते, त्या जागीं एका प्रचंड तांबड्या फलकावर पांढऱ्या रंगांत 'धर्म हें जुलमी सत्ताधाऱ्यांचें अत्यंत प्रभावी शस्त्र आहे' हीं अक्षरें दृष्टीला पडतात! वेदी( altar )च्या मागें असलेल्या ज्या मोठ्या थोरल्या काळोख्या दिवाणखान्याचा उपयोग पूर्वी पाद्री लोक कपडे बदलण्याकरितां करीत असत, तिथें शाळेंतल्या मुलांना हल्लीं शैक्षणिक चित्रपट दाखवण्यांत येतात. आंतमधल्या भिंतींवर नाना तऱ्हेचीं चित्रें टांगलीं असून त्यांच्या द्वारें धर्मोपदेशक आणि भिक्षुक यांच्या सहाय्यानें पूर्वीचे झार, अज्ञ जनतेची कशी छळणूक आणि लुबाडणूक करीत असत याचा इतिहास चित्रित केला आहे.

एका कोंपऱ्यांत प्राचीन काळच्या एका संताचा मसाले भरलेला देह ( mummy ) पूर्ववत् स्थितींत कांचेच्या पेटींत ठेवलेला आहे. याच पेटीच्या शेजारीं दुसऱ्या एका कांचेच्या पेटींत इजिप्तमध्यें किंवा दुसरीकडे कुठें तरी सांपडलेला एका सामान्य माणसाचा रसायनांच्या किंवा इतर मसाल्यांच्या सहाय्यानें जशाच्या तशा स्थितींत राखलेला देह सोव्हिएट सरकारनें मुद्दाम आणून ठेवला आहे. उद्देश हा, कीं कित्येक शतकें मृत देह जशाचा तसा टिकवून ठेवायचा असेल, तर तो एकाद्या धर्मवीराचाच असावा लागतो अशी थाप पाद्री लोक धर्मभोळ्या जनतेला मारतात, ती खोटी आहे हें सप्रयोग दाखवून द्यावें !

सेंट ऐझॅक्स पाहून आम्ही परत येईपर्यंत संध्याकाळचे साडेपांच वाजले होते. पुन्हां आठ वाजतां आम्हांला नाटकाला जावयाचें होतें. तेव्हां आतां साडेपांच वाजतां दुपारचें जेवण घ्यावें आणि रात्रीं नाटकाहून आल्यानंतर 'डिनर' घ्यावें असा आम्ही बेत केला. 'इंटूरिस्ट' हॉटेलमध्यें वाटेल तें जेवण वाटेल तेव्हां घ्यावें.

काउंट टॉल्स्टॉय याचा पुतण्या आणि एक सुप्रसिद्ध आधुनिक रशियन लेखक अॅलेक्सी टॉल्स्टॉय याचें 'पहिला पीटर ( Peter I )' हें

ऐतिहासिक नाटक पाहण्याकरितां आज रात्रीं आम्ही अलेक्झांड्रिस्कि थिएटरांत जाणार आहोंत. थिएटर आमच्या हॉटेलपासून पांचसहा मिनिटांच्या रस्त्यावर आहे.

आठाला पांच मिनिटें असतांना आम्ही थिएटरांत शिरलों. पांच-सहा मजले असलेलें हें भव्य थिएटर रशियन स्त्रीपुरुष प्रेक्षकांच्या गर्दीनें नुसतें फुलून गेलें आहे. तेरा रूबल किंमतीचीं आमचीं तिकिटें आहेत. स्टेजपासून अगदीं जवळ म्हणजे खालच्या मजल्यावर स्टेजपासून सहाव्या रांगेंत माझी आणि मॅक्लॉव्ह्ची जागा आहे. सर्व बाजूंना लाल आणि सोनेरी रंगाचा दर्या उसळला आहे. आमच्या खुर्च्या लाल मखमलीनें मढविलेल्या आहेत. रंगभूमीवरील पडदाही लाल मखमलीचाच असून त्यावर सोनेरी जरतारीमध्यें लहानलहान असंख्य विळ्याकोयत्यांचें सुंदर भरतकाम केलें आहे. मागल्या बाजूला थिएटरच्या मध्यभागीं 'रॉयल बॉक्स' असून ती सबंध लाल मखमलीनें आणि जरतारीनें मढवली आहे. 'रॉयल बॉक्स'वर भव्य विळ्याकोयत्यांचें एक सोनेरी चिन्ह आहे. पूर्वीं याच जागीं सोनेरी गरुडाचें झारचें चिन्ह होतें म्हणतात. झार नाटक पाहावयाला येत असे तेव्हां याच 'रॉयल बॉक्समध्यें' झार, झरीना आणि त्याचा परिवार बसत असे. आज कम्युनिस्ट अधिकारी तिथें बसलेले असतात ! हें थिएटर १८३२ सालीं बांधण्यांत आलें.

बरोबर आठ वाजतां थिएटरांत अंधार झाला. इतर थिएटरांत 'कर्रर्र घणघण' अशी कर्कश घंटा होते तसें इथें नाहीं. एकाद्या थाळी-वर कुणीतरी नाजूक टोला द्यावा तसा 'ठण्ण्' असा एकदां आवाज झाला आणि काळोख होऊन प्रेक्षकांत एकदम शांतता झाली. एका मिनिटानें दुसरा 'ठण्ण्' आवाज झाला आणि पडदा वर गेला.

समोरचा देखावा किती सुंदर दिसतो आहे ! समुद्रकिनारा आहे, पलीकडे चंद्रप्रकाशांत चमकणाऱ्या समुद्राच्या मंद लाटा हालतांना दिसताहेत. पुढें एका घिसाड्याचें दुकान असून त्याच्या भट्टींत पेटलेले लाल निखारे धगधगतांना दिसताहेत. एक नोकर भाता हालवतो आहे आणि तो रुबाबदार बांधेसूद घिसाडी एका लालभडक तापलेल्या लोखंडाच्या पट्टीवर आपल्या दणकट हातांनीं घणावर घण घालतो आहे.

हाच रशियाचा इतिहासप्रसिद्ध झार पहिला पीटर. पीटरला घिसाड्याचें काम करावयाची अत्यंत हौस होती म्हणतात. नाटकांतले इतर देखावे असेच सुंदर होते. 'इंटूरिस्ट' मध्यें नाटकाचा इंग्रजी सारांश असलेलें पत्रक अगोदर आम्हांला मिळालेलें असल्यामुळें नाटकाचें संविधानक समजणें कठीण गेलें नाहीं.

रशियन नटनटींचा अभिनय मला बरा वाटला; पण हे लोक आपलीं भाषणें म्हणतांना केवढ्यांदां ओरडतात! दाते, औंधकर, वैशंपायन, शाळिग्राम वगैरेंच्या महाराष्ट्र नाटक मंडळीचें 'भाऊबंदकी' किंवा 'कीचकवध' चाललें आहे कीं काय असा कांहीं वेळ मला भास झाला!

बारा वाजतां नाटक संपलें. साडेबाराला आम्हीं हॉटेलमध्यें परत आलों आणि वरच्या मजल्यावर जेवायला गेलों. 'डिनर हॉल'मध्यें चिकार गर्दी आहे. बँड वाजतो आहे आणि तरुणतरुणींच्या जोड्या नाचत आहेत. इतर युरोपियन हॉटेल्समध्यें कडक इस्त्रीचे काळे डिनरसूट घातलेले पुरुष नाचतांना दृष्टीला पडतात, तसे इथें नाहीं. कुणीं उघड्या गळ्याचा शर्ट घातला आहे, तर कुणीं कोट काढून ठेवून नाचतो आहे.

कालपासून मी इथें जेवायला येतों आहें तेव्हांपासून एका गोष्टीचें मला मोठें कुतूहल वाटून राहिलें आहे. इथें जेवायला येणारे बहुतेक आमच्यासारखे प्रवासी लोक आहेत; पण मधूनमधून चांगले तुकतुकीत चेहऱ्याचे, सुरेख, व्यवस्थित कपडे घातलेले, चेहऱ्यावरूनच भांडवलवाल्यांसारखे, सुखासीन दिसणारे बरेच रशियन, केव्हां एकटेच तर केव्हां बायकांमुलांबरोबर, इथें जेवायला येत असलेले आणि खाण्यापिण्याची हवी तशी मौज करीत असलेले आमच्या दृष्टीला पडले. हे कोण? हे रशियन कामगार किंवा किसान खास नव्हत. लेनिनग्राडच्या रस्त्यांत दिसणाऱ्या गबाळे कपडे केलेल्या सर्वसाधारण रशियन माणसांपेक्षां हे कुणीतरी मोठे प्रतिष्ठित आणि निराळे दिसतात. हे नेप-मेन (Nep-men) तर नव्हेत? सर्वसाधारण रशियन माणसाला या वैभवशाली, महाग हॉटेलांत जेवण घेणें अशक्य आहे; हे लोक कोण आहेत तें जाणून घेण्याची मला अत्यंत उत्कंठा आहे. मी, शिंडलर आणि मॅक्लाव्ड ज्या टेबलावर जेवायला बसलों आहोंत त्याच टेबलावर एक तरुण रशियन पोरगा बसला आहे. आमची ओळख करून

घेऊन मोडक्यातोडक्या इंग्लिश व जर्मनमध्यें तो आमच्याशीं बोलूं लागला. तो इंजिनिअर आहे. तो म्हणाला, 'हे लोक वैमानिक किंवा मोठे एंजिनिअर्स असावेत. 'यांना पगारहि चांगला मिळतो आणि सरकारी कामाकरितां जेव्हां हे फिरतीवर असतात, तेव्हां 'इंटूरिस्ट' हॉटेलमध्यें फुकट राहाण्याची आणि जेवणाचीं तिकिटें यांना दिलेलीं असतात. या लोकांना सरकारी करही द्यावा लागत नाहीं.' तो म्हणाला.

रात्रीं २–१५ वाजतां जेवण संपवून मी झोंपावयाला निघून गेलों.



## २ जून १९३७—

*मादाम वॅगांगोव्हा.—ती संस्मरणीय स्मोल्नी !—हा रशियांतील सॉफ्ट क्लास.—रशियन आगगाडींत बर्थ—कंट्रोलर !*

सकाळीं पावणेअकराला एका गाईडबरोबर लेनिनग्राडमधलें सुप्रसिद्ध 'Ballet Dancing School' किंवा ज्याला 'Choriographic Technicum' असें नांव दिलेलें आहे तें पाहावयाला आम्ही निघालों.

इमारतींत आंत शिरल्याबरोबर दरवाजाजवळच स्टालिनचा एक भव्य अर्धपुतळा दृष्टीला पडला. आंत जाऊन आम्ही ऑफिसमध्यें बसलों; तिथें भिंतीवर लेनिन, स्टालिन, मॉलॉटॉव्ह व व्हॉरॉशिलाव्ह यांचीं चित्रें टांगलेलीं होतीं. 'टेक्निकम'च्या मॅनेजरनें आम्हांला आपल्या आंतल्या खोलींत भेटावयाला बोलावलें. आपल्या भव्य टेबलाजवळ भारी किंमतीची 'अलेग्रा' सिगारेट ओढत तो बसला होता. डोक्याचा तुळतुळीत गोटा केलेला, बूटसूट, नेकटाय वगैरे व्यवस्थित घातलेला असा हा लठ्ठ, ठेंगणासा, मध्यमवयस्क रशियन, भांडवलशाही देशांतल्या एकाद्या मॅनेजरसारखा मला वाटला. दर पांच मिनिटांनीं एक सिगरेट संपली कीं तो दुसरी पेटवत होता. अर्धा पाउण तास त्यानें आमच्याशीं आमच्या गाइडतर्फे गप्पा केल्या आणि शाळेचे निरनिराळे फोटो दाखवले. नंतर आपल्या हाताखालच्या एका बाईला हांक मारून आम्हांला मादाम वॅगांगोव्हाकडे घेऊन जा म्हणून त्यानें तिला सांगितलें.

मादाम वॅगांगोव्हा वयानें साठपासष्ठ वर्षांच्या आहेत. या नृत्यशाळेच्या त्या मुख्याधिकारी आहेत. जगप्रसिद्ध रशियन नर्तिका मादाम पाव्हलोव्हाच्या त्या समकालीन आणि सहकारी. पाहिल्याबरोबर आदर उत्पन्न व्हावा असें साधा सफेत वेष केलेल्या या वृद्ध रशियन स्त्रीचें बोलणें, चालणें, आणि वागणें आहे. मादामच्या हाताखालीं या शाळेंत १४० शिक्षकशिक्षकिणी, ४६३ मुलेंमुली, दोन डॉक्टर्स आणि चार नर्सेस आहेत. एकंदर नृत्यशिक्षणाचा 'कोर्स' तीनचार वर्षांचा आहे. सकाळीं नऊपासून संध्याकाळीं पांचपर्यंत वर्ग चालू असतात. मोठ्या मुलांमुलींचा वर्ग सकाळींच असतो. अकरा वाजतां लहान मुलांचे वर्ग सुरू होतात. तुळतुळीत लांकडी तक्तपोशीवर नाचाचे धडे चालू होते. बारा वाजतां दुसऱ्या वर्गाची वेळ झाली. सहासहा सातसात वर्षांचीं चिमुरडीं रशियन मुलें आंत येत, मादामपुढें किंचित् मस्तक वांकवत आणि त्यांचा हात हातांत घेऊन त्याचें चुंबन घेत. मादाम स्मित करीत त्यांच्या डोक्यांवर हात फिरवून कांहींतरी कुशल प्रश्न विचारीत. मला हा देखावा अत्यंत कौतुकास्पद वाटला.

एका बाजूला तीसचाळीस तरुण मुलेंमुली 'कॅथेरिना' नांवाचा एक नृत्यप्रसंग बसवत आहेत. मुलींनीं स्वच्छ, सफेत तंग मोजे घातले आहेत आणि त्यांवर दुग्धधवल रेशमी कापडांचे आंखूड झगे परिधान केले आहेत. पायांच्या नुसत्या आंगठ्यांवर त्या इकडून तिकडे फुलपांखरांसारख्या तरंगत आहेत. प्रत्येकीची शरीरयष्टि बांधेसूद व रेखीव असून त्यांचे चेहेरेहि मोहक आहेत. सोनेरी केंसांच्या आणि निळ्या डोळ्यांच्या या इतक्या रशियन सुंदर मुली एकदम एके ठिकाणीं पाहून, रस्त्यांतल्या गचाळ कपडे केलेल्या ओबडधोबड रशियन बायका पाहून स्त्रीसौंदर्याबद्दल साशंक होत असलेल्या आमच्या मनाला थोडा धीर वाटला!

दुपारीं तीन वाजतां 'Pioneer's palace' किंवा मुलांचें थिएटर पहावयाला गेलों. एका बागेंत मुलांचें चिमुकलें नाटकगृह आहे. इथें मुलें नाटक करतात आणि मुलांचाच प्रेक्षकसमुदाय नाटक पहावयाला येतो. अर्थात् त्यांच्यावर शिक्षकांची देखरेख असते. मी तीन वाजतां आंत शिरलों तेव्हां नाटक संपून मुलें बाहेर पडत होतीं. आज बारा ते

तीन नाटक होतें. मला वाटलें नाटक तीन वाजतां सुरू व्हावयाचें आहे म्हणून आमची गाइड मला तीन वाजतां इथें घेऊन आली. मुलें जातांना पाहून 'हें काय ?' म्हणून मीं विचारलें.

'मला वाटलं, तुला नुसतं मुलांचं थिएटरच पहायचं आहे !' आमची गाइड म्हणते.

मला मुलांचें नाटक पाहावयाचें आहे असें मीं सकाळीं स्पष्ट सांगितलेलें असतांना 'इंटूरिस्ट'नें ही अशी चोख व्यवस्था केली !

आज 'इंटूरिस्ट'नीं आपल्या ढिल्या कारभाराची शर्थ केली. आज रात्रीं साडेनऊच्या गाडीनें पूर्वी ठरलेल्या कार्यक्रमाप्रमाणें आम्हीं मॉस्कोला जावयाला निघावयाचे होतों; पण लेनिनग्राडमध्यें 'स्मोल्नी इन्स्टिट्यूट' नांवाची एक जागा आहे; ती जर आम्हांला उद्यां पाहा-वयाला मिळणार असेल तर मॉस्कोंतला एक दिवस कमी करून लेनिन-ग्राडमध्यें एक दिवस मुक्काम वाढवायला आम्हीं तयार आहोंत असें आम्हीं सकाळीं सांगितलें होतें. या स्मोल्नींत बसून ता. ७ नोव्हेंबर १९१७ रोजीं रात्रीं लेनिन व ट्रॉटस्की यांनीं बोल्शेव्हिक क्रांतीचीं सर्व सूत्रें हाल विलीं. आम्हांला ही जागा पाहावयाची अतिशय इच्छा होती. सध्यां इथें लेनिनग्राडमधील कम्युनिस्ट पक्षाच्या शाखेचें ऑफिस आहे म्हणतात.

किरॉव्ह या सुप्रसिद्ध बोल्शेव्हिकाचा खून झाल्यापासून ही जागा कुणालाहि दाखवण्याची रशियन सरकारनें बंदी केली आहे असें आम्हांला सांगण्यांत आलें ! आमची अतिशय निराशा झाली. इतकें सर्व बोलणें झालें अस-तांहि संध्याकाळीं जेव्हां रात्रीं केव्हां निघावयाचें म्हणून चवकशी करावयाला आम्हीं गेलों 'तेव्हां आज रात्रींच्या गाडींत 'हार्ड क्लास'मधें जागा नाहीं; तुम्हांला उद्यां जावं लागेल' असें 'इंटूरिस्ट'ची मॅनेजरबाई आम्हांला सांगूं लागली ! सकाळीं 'स्मोल्नी' पाहावयाला मिळत नाहीं हें ठरलें तेव्हांच तिनें आमची जागा रिझर्व्ह करावयाला हवी होती; पण सर्व कार्यक्रम ठरलेला असतांना तिनें तसें कांहींएक केलें नाहीं. रशियन आग-गाड्यांत 'कठीण वर्ग (Hard class)' आणि 'मृदु वर्ग (Soft class)' असें दोन वर्ग असतात. आमचा सर्व प्रवास हार्ड क्लासनें करावयाचें ठरलें होतें.

"आम्हीं लेनिनग्राडमध्यें विनाकारण एक दिवस अधिक राहावयाला मुळींच कबूल नाहीं' असें आम्हीं तिला निक्षून सांगितलें. तेव्हां 'सॉफ्ट क्लासनें तुम्हीं जाऊं शकतां, पण तुम्हांला प्रत्येकीं वीस रूबल्स अधिक द्यावे लागतील' असें ती सांगूं लागली. 'हार्ड क्लास' रिझर्व्ह न करण्यांत तुमची चूक झाली आहे; आम्ही आज निघणार आणि एक कवडीहि अधिक देणार नाहीं. पाहिजे तर तुम्हीं स्वतःचे पैसे भरून आम्हांला 'सॉफ्ट क्लास' नें पाठवा." असें आम्हीं तिला सांगितलें!

शेवटीं पुढीलप्रमाणें तडजोड ठरली. आम्हीं लेनिनग्राडमध्यें ३१ तारखेला आलों त्या दिवशीं ठरलेल्या कार्यक्रमाप्रमाणें आम्हांला 'इंटूरिस्ट'नें एक नाटक दाखवावयाला हवें होतें. पण बोट उशिरां येऊन सर्वच घोंटाळा झाल्यामुळें आमचें त्या दिवसाचें नाटक चुकलें होतें. तेव्हां त्या नाटकाच्या तिकिटांचें तेरा रूबल्स् आणि वर आम्ही प्रत्येकीं सात रूबल्स द्यावें म्हणजे सॉफ्ट क्लासनें त्या रात्रींच आम्हीं निघूं शकूं असें ठरलें आणि 'सॉफ्ट क्लास' मध्यें आमच्या जागा टेलिफोनवरून तिनें रिझर्व्ह केल्या!

संध्याकाळीं सहज मी लेनिनग्राडच्या रस्त्यांतून फिरत होतों. एकादा रशियन शर्ट किंवा टोपी एक आठवण म्हणून विकत घ्यावी असा विचार केला. एका दुकानांत शिरलों आणि चवकशी केली तों साध्या सुती कापडाच्या माकडटोपी (Monkey-Cap)ची किंमत तेवीस रूबल्स् किंवा अकरा रुपये आठ आणे! कॅन्व्हासच्या एका बुटाच्या जोडीची किंमत एकोणीस रुबल्स किंवा साडेनऊ रुपये! असला बूट कुठेंहि दीडदोन रुपयांना मिळेल. बरें, वस्तूहि दिसावयाला मुळींच सुबक नाहींत. तेव्हां कांहींच न घेतां मी बाहेर आलों.

रस्त्यांत एक मजेदार गोष्ट दिसली. रशियन लोकांना वर्तमानपत्रें वाचावयाचें फार वेड लागलें आहे. एका लहानशा वृत्तपत्रविक्र्याच्या दुकानासमोर जवळजवळ पन्नास स्त्रीपुरुषांची एकेरी रांग लागली होती. पहिल्यांदा ही एवढी रांग कशाकरितां उभी आहे हें मला समजेना. म्हणून मी पुढें जाऊन पाहातों तों एकएकजण वृत्तपत्र घेऊन पुढें जातो आहे!

रात्रीं नऊ वाजतां लेनिनग्राड स्टेशनवर जावयाला 'इंटूरिस्ट'च्या मोटारींतून आम्ही निघालों. आमच्याबरोबर एक 'इंटूरिस्ट'चा माणूस

होता. लेनिनग्राड स्टेशन भव्य आहे. त्यांत आंत शिरल्याबरोबर लेनिनचा एक भव्य पुतळा दृष्टीला पडतो. बाजूच्या भिंतींवर इतर सर्वत्र दिसतात त्याचप्रमाणें इथेंहि स्टालिन, मॉलॅटॉव्ह आणि व्हॉरॉशिलॉव्ह या त्रयीचे फोटो आहेतच. आंत प्लॅटफॉर्मवर गेल्यावर एंजिन जिथें थांबतें त्याच्या-समोर लेनिनचा दुसरा एक सुंदर पुतळा आहे. त्याभोंवतीं शोभिवंत कठडा असून निरनिराळ्या तऱ्हेच्या फुलझाडांच्या कुंड्या ठेवल्या आहेत.

रशियन लोकांचा एकंदर गबाळेपणा पाहून गाडी बरोबर साडे-नवाला सुटेल असें मला वाटत नव्हतें; पण सुटली बुवा बरोबर साडेनऊ वाजतां ! आमची 'सॉफ्ट क्लास'चीं कंपार्टमेंट्स् छान आहेत. मी, त्या दोन ब्रिटिश म्हाताऱ्या आणि रॅफे एका कंपार्टमेंटमध्यें आहोंत आणि मॅक्लॉव्ड् शेजारच्या कंपार्टमेंटमध्यें आहे. रशियांत स्त्रियांसाठीं निराळे डबे नाहींत—रात्रींच्या प्रवासालासुद्धां ! परदेशी प्रवाशांची त्यामुळें केव्हांकेव्हां धांदल उडते. रशियांत प्रवास करीत असलेल्या एका इंग्लिश बाईची एक मजेदार गोष्ट बऱ्याचजणांनीं वृत्तपत्रांतून वाचली असेल.

रशियन गाडीच्या प्रत्येक डब्यासाठीं एक 'बर्थ—कंट्रोलर' (birth नव्हे, berth !) नांवाचा माणूस असतो. तो त्या डब्यांतल्या उतारूंच्या सुखसोयींकडे लक्ष देतो. एकदां एक इंग्लिश बाई रात्रीच्या वेळीं आपली जागा रिझर्व्ह केलेल्या कंपार्टमेंटमध्यें शिरली तों त्या कंपार्टमेंटमधल्या दुसऱ्या जागेवर पांघरूण घेऊन पडलेल्या दुसऱ्या उतारूचा केंसाळ पाय पांघरुणांतून बाहेर पडलेला तिच्या दृष्टीस पडला ! त्यासरशीं ती ओरडत बाहेर आली 'Oh ! there is a man in my compartment. Where is the berth-controller ?'

आमची थोडीशी अशीच धांदल झाली. रात्रीं अकरा वाजतां आमचा बर्थकंट्रोलर येऊन आमचे बिछाने तयार करून गेला. पण या बायांसमोर आम्ही कपडे बदलायचे कसे आणि त्यांनीं तरी आमच्यासमोर बदलायचे कसे ? शेवटीं रॅफेनें एक युक्ति काढली. त्या बायांना त्यानें सांगितलें, 'आम्ही बाहेर जातों. तुम्ही कंपार्टमेंटचा दरवाजा लावून घेऊन कपडे बदला आणि खालच्या दोन जागांवर गळ्यापर्यंत पांघरूण घेऊन स्वस्थ पडा ! मग पंधरावीस मिनिटांनीं आम्ही आंत येतों आणि वरच्या बर्थवर जाऊन वरच्या वर कपडे बदलतों !' वरच्या वर कपडे बदलणें म्हणजे

मला एक सर्कसच करावी लागली. किती वेळां वर डोकें आपटलें त्याची मोजदादच नाहीं !

साडेनऊला आमची गाडी निघाली तेव्हां हिंदुस्थानांत चांगला सहा साडेसहाला असतो इतका उजेड होता. दोन्ही बाजूंचा निसर्गाचा देखावा प्रेक्षणीय होता. उंच उंच 'बर्च' वृक्षांचीं गर्द जंगलें कांहीं वेळ दोन्ही बाजूंना दिसत होतीं. त्याचप्रमाणें हिंदुस्थानसारखी मैलन् मैल दूरवर पसरलेलीं शेतें युरोपमध्यें आजच पहिल्यांदां माझ्या दृष्टीला पडलीं. रशिया किती हिंदुस्थानसारखा आहे !

* * *

## ता. ३ जून—

*—'यामा'च्या लेखकाचें स्वागत.—पॉक्रॉस्की म्युझियम.— किती सुंदर नी भव्य ही रंगभूमि !*

सकाळीं जागा झालों तेव्हां ८–१५ वाजले होते. मॉस्कोच्या उपनगरांतून गाडी चालली आहे. दहाच्या सुमारास आम्ही मॉस्को स्टेशनांत पोंचूं. मॉस्कोजवळच्या या खेड्यांतलीं घरें मजेदार आहेत. विटा, चुना किंवा दगड यांचीं तीं बांधलेलीं नसून नुकत्याच तोडलेल्या झाडांच्या ओबडधोबड ओंडक्यांचीं तीं बांधलेलीं आहेत.

बरोबर दहा वाजतां आमची गाडी मॉस्को स्टेशनांत शिरली. एंजिन जिथें उभें राहिलें, त्याच्यासमोरच लेनिनचा एक भव्य पुतळा उभा आहे. इंटूरिस्टतर्फे एक मनुष्य आणि एक गाईड मुलगी आम्हांला उतरून घेण्याकरितां स्टेशनवर आली होती. एका मोठ्या बसमधून 'हॉटेल नोव्हा मॉस्कोव्हाया' या नांवाच्या लेनिनग्राडमधल्या हॉटेलपेक्षांहि भव्य आणि सुंदर हॉटेलमध्यें आम्हांला नेण्यांत आलें.

हॉटेल नोव्हा मॉस्कोव्हायाची जागा मला अतिशय आवडली. कम्यूनिस्ट इंटरनॅशनलचीं आणि रशियन सरकारचीं सर्व ऑफिसें ज्या सुप्रसिद्ध 'क्रेमलीन' मध्यें आहेत, त्या क्रेमलीनच्या समोरच हें हॉटेल आहे. मॉस्कोंतून वाहणाऱ्या चिमुकल्या 'मॉस्को' नदीच्या कांठावर हें

हॉटेल आहे आणि पलीकडच्या कांठावर क्रेमलीनचे इतिहासप्रसिद्ध भव्य तट आहेत. माझी खोली पांचव्या मजल्यावर असून क्रेमलीन टॉवरच्या घड्याळांत किती वाजले तें पडल्यापडल्या मला बिछान्यावरून पाहातां येतें- क्रेमलीनच्या पलीकडल्या तटांच्या बाजूलाच रशियन क्रांतीच्या स्मृति-दिनाच्या दिवशीं लाल पलटणींतले लाखों सैनिक जिथें कवाईत करतात, तो अफाट लाल चौक (Red square) आहे आणि याच चौकांत लेनि-नचा देह ज्यांत जशाचा तसा राखून ठेवला आहे, तें लेनिनचें सुप्रसिद्ध थडगें (Lenin Mausoleum) आहे.

ब्रेकफास्ट घेऊन आम्ही कांहींतरी बोलत बसलों होतों, इतक्यांत मॉस्कोमधलें प्रमुख इंग्लिश दैनिक 'मॉस्को डेली न्यूज' या पत्राचा प्रतिनिधि आम्हांला भेटावयाला आला. रशियन रंगभूमि पाहावयाला आलेल्या गटाचा त्याला एक फोटो घ्यावयाचा होता. हॉटेलच्याच भव्य हॉलमधें मॅक्लॉव्ड, मी, रॅफे आणि त्या दोन ब्रिटिश स्त्रिया यांना एके ठिकाणीं बसवून त्यानें आमचा फोटो घेतला.

नंतर सहज 'मॉस्को डेली न्यूज'चा आजचा अंक चाळीत असतां एक महत्वाची बातमी मला वाचावयाला मिळाली. मराठी वाचकांना सुपरिचित असलेल्या 'यामा, दी पिट' या कादंबरीचा कर्ता अलेक्झांडर कुप्रिन कालच पॅरिसहून मॉस्को येथें आला. सर्व जुने नवे रशियन लेखक त्याचें स्वागत करण्याकरितां मॉस्को स्टेशनवर हजर होते. सरकारतर्फेंही त्यांचे थाटाचें स्वागत करण्यांत आलें. पंचवीस वर्षांनीं कुप्रिन मायदेशाला परत येतो आहे. झारच्या अमदानींत तो देशत्याग करून पॅरिस येथें राहावयाला गेला. तेथेंच आपल्या बहुतेक जगप्रसिद्ध कादंबऱ्या त्यानें लिहिल्या. सोव्हिएट सरकारच्या खास आमंत्रणावरून हा थोर रशियन साहित्यिक पत्नीसह आतां कायमचा रशियांत राहावयाला आला आहे. मॉस्को स्टेश-नांत उतरल्याबरोबर त्यानें पहिलेच उद्गार काढले, "I am so happy to see so many Russian faces and hear Russian words!" मला त्याचें म्हणणें विशेष पटतें. हिंदुस्थान सोडून दोन महिने झाले नाहींत, तोंच ओळखीचे हिंदी चेहेरे दृष्टीला पडावे आणि मराठी शब्द कानांवर यावे अशी अनावर इच्छा एकटाच बसलों असतां मला केव्हांकेव्हां होते. कुप्रिन तर इतक्या वर्षांनीं स्वदेशीं परत येतो आहे.

दुपारीं १२–१५ वाजतां आमच्या गाईडबरोबर 'पॉक्रॉव्स्की म्यूझियम' किंवा रंगभूमीचें वस्तुसंग्रहालय पाहावयाला आम्ही निघालों. क्रांतीपूर्वी हें संग्रहालय पॉक्रॉव्स्की नांवाच्या एका श्रीमंत व्यापाऱ्याच्या खासगी मालकीचें होतें. रशियन रंगभूमीचा प्राचीन कालापासूनचा इतिहास चित्रांच्या आणि इतर अवशेषांच्या द्वारें या संग्रहालयांत पाहावयाला मिळतो.

निरनिराळ्या खोल्यांतून रंगभूमीचा विकास आणि उत्क्रांति दाखविणारीं चित्रें क्रमवार लावून ठेवलीं आहेत. एका दालनांत गॉर्की, चेकॉव्ह इत्यादि नाटककारांचीं आणि स्टानिस्लाव्हस्की, टायरॉव्ह, मेयरहोल्ड इत्यादि आधुनिक, थोर नाट्यनिर्मात्यांचीं (Producersचीं) भव्य छायाचित्रें ठेवण्यांत आलीं आहेत. याच दालनांत सुप्रसिद्ध रशियन नर्तिका ॲना पाव्हलोव्हा इच्या पायाचें हिरव्या रंगाचें एक सुंदर 'प्लास्टर मॉडेल' आहे. दुसऱ्या एका दालनांत सोव्हिएट यूनिअनमधल्या उझबेकीस्तान, ताजिकीस्तान, यूक्रेन, आर्मेनिया इत्यादि निरनिराळ्या देशांतल्या राष्ट्रीय रंगभूमीवरल्या (National Theatresच्या) प्रातिनिधिक देखाव्यांचीं प्रेक्षणीय 'मॉडेल्स' ठेवण्यांत आलेलीं आहेत. सोव्हिएट यूनिअनमध्यें जीं निरनिराळीं प्रजासत्ताक राज्यें आहेत, त्यांत एकंदर छपन्न वेगवेगळ्या भाषांतून नाटकें होतात. जिप्सी भाषेंतसुद्धां नाटकें करण्यांत येतात आणि त्यांकरितां एक स्वतंत्र जिप्सी थिएटर आहे! मुलांकरितां Children's Theatres आहेत. इतर वाङ्मयापेक्षां नाट्यवाङ्मय राष्ट्राचें जीवन प्रतिबिंबित करण्याचें आणि त्याला वळण लावण्याचें काम अधिक प्रत्यक्षपणें आणि परिणामकारक रीतीनें करतें म्हणूनच कीं काय रशियांत नाटकांना आणि रंगभूमीला इतकें महत्व प्राप्त झालें आहे. या म्यूझियमचा तरुण रशियन डायरेक्टर या सर्व गोष्टी आम्हांला रशियनमध्यें समजावून सांगत होता आणि आमची गाईड त्याचें इंग्लिश भाषांतर करीत होती. दुपारीं ३–३० वाजतां आम्ही हॉटेलमध्यें परत आलों.

हिंदुस्थानांत आतां सर्वांना माहीत झालेला सुप्रसिद्ध तरुण रशियन लेखक शॉलॉकॉव्ह याच्या 'And Quiet Flows the Don' या कादंबरीचें संगीत नाटक (Opera) करण्यांत आलें आहे. तें पाहावयाला

संध्याकाळीं ७–३० ला मॉस्कोमधल्या बॉल्शॉय थिएटरमध्यें आम्हांला जायचें आहे. कादंबरीचें नाटकांत रूपान्तर झर्झिन्स्की यानें केलें असून नाटकांतले देखावे (Settings) सुप्रसिद्ध कलावंत फिऑडॉरॉव्ह यानें केले आहेत.

बरोबर ७–३० ला आम्ही थिएटरांत गेलों. लेनिनग्राडमधल्या अलेक्झांड्रिस्की थिएटराप्रमाणेंच झारच्या जमान्यांतलें हें जुनाट पण भव्य थिएटर आहे. सहाहि मजल्यांवरच्या खुर्च्या लाल आणि सोनेरी मखमलीनें मढवलेल्या आहेत. थिएटरांत नेहमींप्रमाणें चिकार गर्दी आहे. आज श्रोतृवर्गामध्यें मला बरेचसे ओळखीचे एशियाटिक चेहेरे दिसताहेत. पिवळट मोंगोलियन चेहेरे आणि बारीक डोळे असलेल्या, काळया कुळकुळीत केंसांच्या, लांबसडक वेण्या पाठीवर सोडलेल्या आणि रंगीबेरंगी झगे घातलेल्या कितीतरी उझबेक मुली आणि वेलबुट्टी काढलेले सदरे आणि लाल, हिरव्या, जांभळया रंगाच्या चित्रविचित्र पानाफुलांच्या आकृति काढलेल्या टकलटोप्या (Skull-Caps) घातलेले उझबेक तरुण जिकडेतिकडे हंसतांखिदळतांना दिसत आहेत. उझबेकीस्तानच्या रंगभूमीचें पुनरुज्जीवन करण्यांत ज्यांनीं पुढाकार घेतला होता, त्या नटनटींचा आणि कार्यकर्त्यांचा सन्मान करण्याकरितां आज त्यांना मुद्दाम मॉस्को येथें सरकारतर्फे बोलावण्यांत आलें होतें. आज सकाळींच या मंडळींचें नेतृत्व जिच्याकडे आहे, त्या उझबेकीस्तानच्या सर्वश्रेष्ठ आणि लोकप्रिय नटीला खुद्द स्टालिनच्या हस्तें 'Order of Lenin'चें अमोल पदक आणि रशियांत कलावंतांना देण्यांत येणारी सर्वांत मोठी पदवी 'People's Artist' देण्यांत आली. सबंध रशियांत स्टानिस्लाव्हस्की टायरॉव्ह, मेयरहोल्ड यांच्यासारखे फक्त पांचसात People's Artists आहेत. या पदवीच्या खालोखाल कलावंतांना देण्यांत येणारी Honoured Artist ही दुसरी पदवी आहे. ही पदवी असलेले बरेच कलावंत आहेत. या नटीबरोबर आलेली उझबेकीस्तानच्या रंगभूमीवरली ही सर्व मंडळी आज मुद्दाम या थिएटरांत नाटक पाहावयाला आली आहेत.

या 'ऑपेरा'मधले भव्य देखावे, रंगीबेरंगी कपडे आणि सामुदायिक संगीत अक्षरशः डोळे दिपवून टाकणारें आणि भान हरून नेणारें

आहे. केवढी भव्य रंगभूमि! एका वेळीं शेदीडशें माणसें रंगीभूमीवर असत. देखावे तरी किती सुंदर! डॉन नदी मागल्या बाजूला वाहाते आहे. तिच्यावर मंद चंद्रप्रकाश पडला आहे. बाजूला एक उंच पवनचक्की आहे. तिथें पंधरावीस रशियन शेतकऱ्यांच्या बायका पीठ दळून घेत आहेत. खालीं एका बाजूला पांचदहा शेतकरी आणि त्यांच्या बायका गाणीं गात-गातच गवताच्या पेंढ्या बांधताहेत. चंद्रप्रकाशांत चमचमणाऱ्या नदींतल्या पाण्याच्या मंद लहरी हुबेहूब दिसत होत्या. फार काय, मागें दिसत असलेल्या फिकट निळ्या आकाशांत पांढरे, करडे ढग हळुहळु फिरतांना प्रत्यक्ष दिसत होते! हा ढगांचा देखावा सिनेमाच्या यंत्राच्या द्वारें हुबेहूब उभा केला जातो म्हणतात. रंगभूमीवर इतकें सुंदर आणि भव्य दृश्य दाखवितां येईल असें मला स्वप्नांत वाटलें नव्हतें. विचारप्रवर्तक वास्तववादी नाटकांबरोबरच जनसमुदायाची भरपूर करमणूक करणारीं असलीं संगीत नाटकें जर आम्ही दाखवूं लागलों, तर सिनेमाच्या चढाओढीला रंगभूमीनें भिण्याचें कांहींएक कारण उरणार नाहीं.

रात्रीं ११-३०ला नाटक संपल्यावर मी आणि मॅक्लॉव्ड लाल चौकांतून लेनिनच्या मॉसोलियमच्या बाजूनें हॉटेलकडे पायींच चालत आलों. रात्रींच्या शांत वेळीं क्रेमलीनचा देखावा मोठा रम्य व गंभीर दिसतो. रस्त्याच्या पलीकडे क्रेमलीनच्यासमोर असलेल्या उंच इमारतींच्या छपरांवर सहासहा प्रचंड विजेच्या दिव्यांचे सात गट रांगेनें ठेवण्यांत आले आहेत. या प्रचंड बेचाळीस दिव्यांचा प्रकाश सबंध रात्रभर क्रेमलीनच्या लांबच लांब पसरलेल्या तटावर खेळत असतो. त्या प्रकाशांत फडकणारा क्रेमलीनमधील मध्यवर्ति इमारतीच्या घुमटावरला प्रचंड लाल बावटा निरभ्र निळ्या आकाशाच्या पार्श्वभूमीवर एकाद्या रक्तवर्ण ज्वालेसारखा शोभिवंत दिसत होता.

आम्ही क्रेमलीनच्या प्रवेशद्वाराजवळ आलों इतक्यांत द्वारावरला विजेच्या दिव्यांचा भव्य लाल तारा एकदम प्रकाशित झाला, दारावरले दोघे लाल शिपाई (Red Guards) बंदुका सांवरून ताठ उभे राहिले. पलीकडे न जातां आम्हांला जागच्या जागीं थांबावें लागलें. दोनतीन मिनिटांनीं एक भव्य बंद मोटार दरवाजांतून बाहेर पडून निघून गेली,

तो तारा विझला आणि आम्ही पलीकडे जाऊं शकलों. क्रेमलीनच्या आंतून कुणाहि कम्यूनिस्ट अधिकाऱ्याची मोटर निघाली, कीं प्रवेशद्वारावरला हा लाल तारा पेटतो. म्हणजे रस्त्यावरली गाड्यांची आणि माणसांची रहदारी तात्पुरती थांबते.

रात्रीं दीड वाजतां जेवण संपवून मी झोंपीं गेलों.

* * *

## ता. ४ जून—

*—कुठें ती रशियन चुणचुणीत पोरगी आणि कुठें आमच्या त्या जी. ए., पी. ए., आणि बी. ए., विदुषी !—ही जगांतली सर्वांत उंच इमारत !—लेनिन जिवंत तर नाहीं ना !*—Your Socialism is still underground !!

आज सकाळीं ब्रेकफास्टनंतर कांहीं पत्रें लिहावयाला बसलों. या इंटूरिस्ट हॉटेलमध्यें सर्व कांहीं बादशाही थाटाचें आहे; पण पत्रें लिहिण्याकरितां ठेवलेले नोटपेपर्स आणि शाई अगदीं भिकार आहे. कागद अगदीं हलक्या प्रतीचा आणि काळसर असून त्यावर शाई फुटते. रशियांत कागदाचें उत्पादन अगदींच थोड्या प्रमाणावर होतें म्हणतात. बाहेरचा कागद घ्यावयाचा नाहीं असें सरकारनें ठरविल्यामुळें सर्व ठिकाणीं कागदांचा पुरवठा अगदीं जपून करण्यांत येतो. रशियन पोस्टकार्डें तर इतकीं पातळ असतात, कीं योग्य पत्त्यावर पोंचेपर्यंत तीं टिकतील किंवा काय याचा संशय येतो. वृत्तपत्रांना वापरण्यांत येणारा कागदहि अगदीं हलक्या प्रकारचा असतो. पण जाहिरातींचा जवळजवळ पूर्ण अभाव असल्यामुळें वृत्तपत्राला फारसा कागद लागत नाहीं.

११–३० वाजतां मी, मॅक्लॉव्ड आणि बॅरी नांवाचा एक तरुण इंग्लिश प्रवाशी आमच्या गाईडबरोबर मॉस्कोमधील आधुनिक कलेचें वस्तुसंग्रहालय ( Modern Art Museum ) पाहावयाला निघालें.

क्रांतीपूर्वी सॅामॉरॉव्ह आणि शुकीन् नांवाच्या मॉस्कोमधल्या दोन श्रीमंत गृहस्थांच्या खासगी मालकीचे आधुनिक चित्रांचे मौल्यवान् संग्रह

होते. ते दोन्ही एकत्र करून सोव्हिएट सरकारनें हें संग्रहालय बनविलें आहे. पहिल्या दालनांत १९व्या शतकांतल्या फ्रेंच चित्रकारांचीं चित्रें टांगलेलीं आहेत. त्यांत पौर्वात्य देशांचे बरेचसे देखावे आहेत. ते समजावून देतांना आमच्या चिमुकल्या गाईडनें अगदीं शंभर टक्के शास्त्रीय मार्क्सवादी टीका केली. ती म्हणाली, "पाहिलंत, त्या काळीं पौर्वात्य देशांतल्या वसाहती काबीज करण्याकडे फ्रान्सचें लक्ष लागलें होतें. म्हणून फ्रेंच सत्ताधारी वर्गाच्या आकांक्षा आणि विचार फ्रेंच चित्रकारांच्या या कलाकृतींतहि प्रतिबिंबित झाले आहेत !" आमची गाईड अठरा एकोणीस वर्षांची असेल.पण मोठी हुषार आणि चुणचुणीत पोरगी आहे ही. नव्या रशियाची ती एक आदर्श बालिका मला वाटते. एका प्रख्यात फ्रेंच चित्रकारानें काढलेल्या नग्न स्त्रीच्या एका सुंदर चित्राचें मर्म आम्हांला ती समजावून देत असतां मला तिचें आदरयुक्त कौतुक वाटलें. किती मोकळेपणानें आणि निर्भयपणें ती त्या चित्रांतल्या छायाप्रकाशाचे आणि वर्णच्छटांचे ( Tonal values ) बारकावे आम्हांला सांगत होती ! दोनतीन तरुण पुरुष आणि एकदोन स्त्रिया यांच्यासमोर आपण एका नग्न स्त्रीच्या चित्राचें वर्णन करतों आहोंत याची तिच्या अकृत्रिम मनाला जाणीवहि नव्हती ! स्वतःला क्रांतिकारक समजणाऱ्या आमच्याकडल्या बऱ्याचशा जी. ए., बी. ए. आणि पी. ए. विदुषी, स्त्री-पुरुषांच्या मिश्र समाजांत हें चित्र नुसतें पाहावयाला तर उभ्या राहिल्या नसत्याच, पण शंभर वेळां 'इश्श ! इश्श !'चा जप करीत आणि पन्नास वेळां नाक उडवीत तिथून पळाल्या असत्या !

वरच्या मजल्यावर मोने, रेन्वा, पिकासो, मातीस, सेझान् इत्यादि आधुनिक आणि 'इंप्रेशनिस्ट' संप्रदायाच्या प्रख्यात फ्रेंच चित्रकारांचीं चित्रें आहेत. सुप्रसिद्ध फ्रेंच शिल्पकार रोदाँ याचा 'The burgher of Calais' हा पुतळाहि इथें पाहावयाला मिळाला. गोगेन नांवाच्या चित्रकारानें निरनिराळ्या धर्मांचे भीतिदायक परिणाम दोन ताहीती बायकांवर कसे झाले हें दाखवणारें एक चित्र काढलें आहे. त्यांत ख्रिश्चन धर्माचें एक प्रतीक आहे. मुसलमान धर्म मशिदी आणि चंद्रकोर यांनीं दाखविला आहे. मूर्तिपूजा दाखविण्याकरितां बुद्धधर्म घेतला आहे ! आणि बुद्धाची मूर्ति एकाद्या यमपुरींतल्या बाहुल्यासारखी काढली आहे !

अडीच वाजतां हॉटेलकडे परत येत असतां वाटेंत 'Palace of Soviets' म्हणून जी इमारत रशियन सरकार बांधीत आहे, तिचा पाया आम्हीं पाहिला. ही इमारत सर्व जगांत उंच होणार आहे. तळमजल्यावर एक हॉल होणार आहे. त्यांत २०००० लोक सुखानें बसू शकतील. आधुनिक शिल्पकलेचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून ती ओळखली जाईल. कळसाकडे लहानलहान होत तिचा कळस म्हणजे लेनिनच्या अजस्र पुतळ्याचा पाया होणार आहे. हा पुतळा १०० मीटर उंच होणार असून पुतळ्याच्या हाताचें एकएक बोट सहा फूट लांब होईल म्हणतात ! "१९४३ सालीं ही इमारत पुरी होईल. ती पाहायला जरूर या!" आमची गाईड म्हणाली. "आमची मॉस्को राजधानी सर्व जगांत सुंदर करावयाचा आमचा विचार आहे !"

नंतर माझ्याकडे पाहून ती पुटपुटली, "We had nothing before the Revolution, you see. We have to do so mueh !" तिच्या आवाजांतली आर्तता आणि तिच्या नजरेंतली उदात्त खिन्नता माझें अंतःकरण भेदून गेली. तिच्या त्या शद्वांनीं मला एकदम नवी दृष्टि दिली. माझी मला लाज वाटली. या साध्याभोळ्या, अडाणी रशियन लोकांची युरोपांतल्या इतर लोकांशीं तुलना करून त्यांच्या गबाळेपणाबद्दल, त्यांच्या बावळटपणाबद्दल, त्यांच्या मागासलेल्या स्थितीबद्दल त्यांना हंसणारा आणि त्यांच्यावर चिडणारा किती मूर्ख मी ! हजार पंधराशें वर्षें एका अत्यंत क्रूर, मध्ययुगीन राक्षसी सत्तेच्या टांचेखालीं एकसारखें चिरडलें गेलेलें हें राष्ट्र अवघ्या वीस वर्षांपूर्वी स्वतंत्र झालें आहे. शतकानुशतकें अज्ञानांत आणि दारिद्र्यांत रुतलेल्या या लोकांना राजसत्तेनें हजारों वर्षांत केलेलीं पातकें धुवून काढून आपल्या राष्ट्राची पुनर्घटना करावयाची आहे. व्यक्तीच्या आयुष्यांत एका क्षणाला जितकी किंमत आहे तितकीसुद्धां राष्ट्राच्या इसिहासांत वीस वर्षांना नाहीं. आणि तरीहि इतक्या चिमण्या अवधींत आम्हां हिंदी लोकांसारख्याच गरीब आणि मागसलेल्या या लोकांनीं केवढें प्रचंड कार्य केलें आहे ! एके काळीं अत्यंत मागसलेल्या या लोकांच्या शिरावर इतिहासांतला एक अद्वितीय आणि अजस्र सामाजिक प्रयोग करण्याची जबाबदारी येऊन पडली आहे आणि किती दुर्दम्य उत्साहानें ती ते पार पाडीत आहेत !

त्यांचें मागसलेंपण, त्यांच्या चुका, त्यांचा गबाळेपणा, त्यांची स्टालीनपूजा या सर्व गोष्टी त्यांच्या या शौर्यशाली कार्यापुढें क्षुद्र वाटूं लागतात. त्या चिमुकल्या रशियन मुलीच्या आवाजांतल्या त्या आर्ततेनें माझ्या डोक्यांत एकदम प्रकाश पडला.

संध्याकाळीं ७–३० वाजतां सुप्रसिद्ध रशियन लेखक चेकॉव यांचें 'The Cherry Orchard' हें नाटक पाहावयाला आम्हांला मॉस्को आर्ट थिएटरमध्यें जायचें आहे. पण जातांजातां वाटेंत लेनिनचें थडगें आणि मॉस्कोची सुप्रसिद्ध जमिनीखालची रेल्वे पाहावयाचें आम्हीं ठरविलें आहे. म्हणून मी आणि आमचा कॅलिफोर्नियन मित्र मि. स्टाइन सहा वाजतांच हॉटेलांतून बाहेर पडलों. हॉटेलपासून पांचसहा मिनिटांच्या रस्त्यावर लाल चौकांत लेनिनचें हें मॉसोलियम आहे. आम्ही तिथें गेलों तों चारपांचशें लोकांची रांग दरवाज्यावर लागली होती. आसपासच्या खेड्यांतून मॉस्कोला येणारे रशियन शेतकरी आणि त्यांच्या बायका लेनिनच्या देहाचें एकदा तरी दर्शन घेतल्याखेरीज जात नाहींत. त्याशिवाय मॉस्को पहा-वयाला येणाऱ्या इतर प्रवाशांची गर्दी असतेच. त्यामुळें सकाळ-संध्याकाळ केव्हांहि या इमारतीपुढें अशी रांग लागलेली दिसते. बाहेरच्या दरवाजावर दोन लाल शिपाई बंदुका घेऊन उभे आहेत. ते एकेकाला आंत सोडीत आहेत. पांचसहाशें लोकांची गर्दी होती तरी आम्हांला मुळींच वाट पाहावी लागली नाहीं. परदेशी माणूस दिसला कीं त्याला एकदम रांगेच्या अगदीं पुढें उभें करून ताबडतोब आंत सोडण्यांत येतें. 'रेड गार्डस्'नीं आम्हांला ताबडतोब आंत सोडलें. कांहीं पायऱ्या उतरल्यानंतर आणखी दोन लाल शिपाई तिथें उभे असलेले दिसले. अशा तऱ्हेनें बाहेर पडेपर्यंत दोन्हीं बाजूंना बरेच लाल शिपाई सारखे उभे असलेले दिसले. आंत जाणाऱ्यांच्या हाताकडे बारीक नजरेनें ते निरखून पाहात होते. न जाणों रशियाच्या एखाद्या शत्रूनें हातांतून बॉंब आणला तर! आंतमध्यें एका कांचेच्या पेटींत लेनिनचा देह आहे. तो नेहमीं घालीत असलेला खाकी कोट त्याच्या अंगांत आहे. डोक्याजवळ त्याची नेहमींची टोपी आहे. लेनिनचा देह इतक्या चांगल्या स्थितींत आहे, कीं एक हात छातीवर ठेवून तो स्वस्थ झोंपला आहे असा भास होतो. जिवंत माणसाच्या कातडीवर असतो तसा तजेला त्याच्या कातडीवर आहे. लेनिन अगदीं

लहानसा ठेंगणा माणूस असावा. हें 'मॉसोलियम' अत्यंत सुंदर आणि मौल्यवान अशा काळ्या आणि गुलाबी रंगाच्या 'पॉरफिरी' दगडाचें बांधलेलें आहे. त्याचें शिल्पकाम अत्यंत आधुनिक पद्धतीचें आहे. 'क्रेमलिन्'च्या प्राचीन तटांच्या पार्श्वभूमीवर तें अधिकच खुलून दिसतें.

आम्ही ६–३० ला मॉसोलियम्‌मधून बाहेर पडलों. अजून नाटकाला एक तास अवकाश होता. तेव्हां मॉस्कोच्या 'मेट्रो'मधून भटकावयाचें आम्ही ठरविलें. 'ऑस्कोनी' नांवाच्या जवळच असलेल्या एका स्टेशनांत आम्हीं शिरलों. लंडनमधल्या जमिनीखालच्या रेल्वेप्रमाणेंच 'Escalators' (सरकते जिने) वगैरे सर्व कांहीं इथली व्यवस्था चोख आहे. आम्ही 'कीव्हस्काया' स्टेशनाबाहेर पडलों आणि थोडा वेळ इकडेतिकडे फिरून पुन्हां परत आलों. मॉस्को टयूबचें एकएक स्टेशन म्हणजे शिल्पसौंदर्याचा एकएक अद्वितीय नमुना आहे. एका स्टेशनाचें शिल्पकाम दुसऱ्यासारखें नाहीं. एका स्टेशनांतले खांब हिरवट पिवळ्या संगमरवरी दगडाचे आणि चौकोनी आकाराचे, तर दुसऱ्यांतले गोल आकाराचे आणि लाल काळसर दगडांचे. तिसऱ्याच्या छतांत उमलत्या कमळाच्या आकाराचे विजेचे दिवे, तर चौथ्या स्टेशनांत गोल आणि त्रिकोणी दिव्यांचे चित्रविचित्र पुंजके ! समाजवादामुळें जिकडे तिकडे कंटाळवाणी एकजातता (Uniformity) आणि ठोकळेबाजी होईल असें ज्यांना वाटतें त्यांनीं मॉस्कोमधल्या जमिनीखालच्या या यक्षनगरींतली विविधता आणि वैचित्र्य डोळे भरून पाहावें. भावी समाजवादी कला कशी असेल याची थोडीशी चुणूक मॉस्कोच्या भूगर्भांत पाहायला मिळते. मॉस्कोमधल्या जमिनीवरल्या बऱ्याचशा जुनाट इमारती आणि जमिनीखालची ही अत्याधुनिक सुंदर शिल्पकला पाहून एका रशियन माणसाला कुणीसें म्हटलेलें मला आठवतें, 'Your Socialism is still undergound !'

बरोबर ७–३० वाजतां आम्ही मॉस्को आर्ट थिएटरांत शिरलों. अलेक्झांड्रिस्कि किंवा बॉल्शॉयप्रमाणें हें जुन्या पद्धतीचें भव्य थिएटर नाहीं, हें लहान थिएटर आहे. लाल मखमल आणि जरतारीचें प्रदर्शन इथें नाहीं. साध्या पण सुबक लांकडी खुर्च्या बसावयाला आहेत. आजच्या 'Cherry Orchard'च्या प्रयोगाचें वैशिष्टय म्हणजे चेकॉव्हची पत्नी मॅडाम चेकॉव्हा

आजच्या नाटकांत म्हातारीचें काम करणार आहे. तरुणपणीं ओल्गा निपर या नांवानें मॅडाम चेकॉव्हा रशियन रंगभूमीवरील एक सुप्रसिद्ध नटी म्हणून ओळखल्या जात होत्या. नंतर त्यांनीं चेकॉव्हशीं लग्न केलें. चेकॉव्हच्या मृत्यूनंतरहि त्यांनीं रंगभूमीची सेवा अव्याहत चालू ठेवली आहे. एक थोर नटी आणि चेकॉव्हसारख्या विख्यात लेखकाची पत्नी म्हणून सारा रशिया त्यांच्याकडे आदरानें पाहातो. त्या अलीकडे मधूनमधून काम करतात. 'चेरी ऑर्चर्ड' हें चेकॉव्हचें एक उत्कृष्ट नाटक आहे, त्यांत आणखी मॅडाम चेकॉव्ह काम करणार आहेत. त्यामुळें आज थिएटरांत रशियन स्त्रीपुरुषांचा नुसता समुद्र उसळला आहे. प्रत्येक जागा भरून गेली आहे. मॅडाम चेकॉव्हांनीं रंगभूमीवर प्रवेश केल्याबरोबर लोकांनीं टाळ्यांचा प्रचंड गजर करून त्यांचें स्वागत केलें. नाटक फारच सुंदर रंगलें.

* * *

## ता. ४ जून–

*श्रीयुत आणि सौ. पॉल रोब्सन्.–'हो! आम्हांलासुद्धां परंपरेचा नी संस्कृतीचा अभिमान आहे!'–कोण म्हणतो रशियांत कॉमरेड्स आहेत?–काळ्या नवऱ्याची गोरी बायको!*

काळोख होऊन 'चेरी ऑर्चर्ड' नाटक सुरू झाल्यावर कांहीं वेळानें एक कुणीतरी धिप्पाड नीग्रो गृहस्थ माझ्या शेजारच्याच खुर्चीवर येऊन बसला होता. एक अंक संपल्यानंतर जेव्हां पुन्हां उजेड झाला तेव्हां माझ्या शेजारीं बसलेला कॉमरेड स्टाइन मला म्हणतो, "तुझ्या पलीकडे कोण बसला आहे माहीत आहे का?"

मीं म्हटलें, "कोण?"

"He is the great Paul Robeson!" स्टाइन् हलक्या स्वरांत म्हणतो.

इतक्यांत आमच्या बऱ्याच पुढल्या रांगेंत बसलेला मॅक्लॉव्ड् एका बाईसह माझ्याजवळ आला; आणि त्यानें त्या बाईची आणि त्या नीग्रो गृहस्थाची माझ्याशीं ओळख करून दिली. तो खरोखरच पॉल रोब्सन्

होता. ती बाई मिसेस पॉल रोबसन्. मॅक्लॉव्डची आणि रोबसन् कुटुंबाची लंडनमधली फार जुनी ओळख होती. मॉस्कोमध्यें हॉटेल मेट्रोपोलमध्येंच हल्लीं रोबसन पतिपत्नी राहात आहेत.

मॅक्लॉव्ड् दुपारीं त्यांना भेटायला गेला होता. तिथून परस्पर तो आणि मिसेस रोबसन् नाटकाला आलीं. पॉल रोबसन् किंचित् उशीरानें मागाहून आला. ' Show boat ',' Sanders of the River ' इत्यादि चित्रपटांत काम करून जगद्विख्यात झालेला आणि हॉलीवुडमध्यें लाखों डॉलर्स मिळवणारा हा नीग्रो नट आणि गायक इतका साधा आणि विनयशील आहे, कीं त्याला पाहिल्याबरोबर हाच तो रोबसन यावर कुणाचा विश्वाससुद्धां बसणार नाहीं.

रोबसन् नुसता ' एक्टर ' नाहीं. रोबसन् आणि त्याची बायको दोघेंहि अमेरिकन विश्वविद्यालयाचे पदवीधर आहेत. त्याचप्रमाणें जागतिक राजकारणाचाहि रोबसन् यानें सूक्ष्म अभ्यास केला आहे. हिंदी, नीग्रो इत्यादि काळ्या लोकांची जगांत जिकडेतिकडे गोऱ्या साम्राज्यवाद्यांकडून जी गळचेपी चालली आहे, तिचा रोबसन्ला अत्यंत संताप येतो आणि या लोकांच्या भवितव्याबद्दल त्याला अतिशय कळकळ वाटते. माझ्याशीं बोलतांना त्यानें हिंदी राजकारणाविषयीं मला कितीतरी माहिती विचारली. हिंदी राजकारणाचें त्याला चांगलेंच ज्ञान असलेलें दिसलें. महात्मा गांधी आणि जवाहरलाल यांच्या दृष्टिकोनांतला फरक आणि नव्या राज्यघटने-विरुद्ध हिंदी लोकांनीं चालविलेली चळवळ याबद्दलची त्याला असलेली इत्थंभूत माहिती पाहून मला आश्चर्य वाटलें.

लवकरच लंडनच्या रंगभूमीवर काम करण्याकरितां रोबसन् जाणार आहे.'वेस्ट एंड'मधल्या श्रीमंत रंगभूमि-चालकांनीं देऊं केलेलीं हजारों पौंडांचीं कामें नाकारून इंग्लिश कामगारवर्गाच्या रंगभूमीवर ( Unity Theatre ) पदराला खार लावून तो काम करणार आहे. प्रख्यात रशियन डायरेक्टर आयझेन्स्टाइन् याच्या हाताखालीं काम करण्याकरितां अमेरिकेहून तो रशियांत आला. आयझेन्स्टाइननें त्याची एक फिल्म पुरी करून तो दुसरी हातांत घेणार होता; पण इतक्यांत आयझेन्स्टाइनचें आणि सोव्हिएट सरकारचें थोडेंसें बिनसलें; आणि ती दुसरी फिल्म तशीच अर्धवट पडली

आहे. आयझेन्स्टाइन, पुदॉव्हकिनसारखे जगन्मान्य चित्रपट–दिग्दर्शक आणि मेयरहोल्डसारखे नाट्यदिग्दर्शक अलीकडे सोव्हिएट सरकारच्या मर्जींतून उतरले आहेत म्हणतात! हे लोक नवीन नवीन प्रयोग करतात आणि सामान्य जनतेच्या टप्प्यापलीकडल्या कलाकृति निर्माण करतात, असा रशियन सरकारचा त्यांच्यावर आरोप आहे म्हणे!

मॅक्डॉव्ड्सारख्या रशियाच्या पक्षपाती माणसाला सुद्धां कलावंतांच्या बाबतींतलें रशियन सरकारचें हें धोरण पसंत नाहीं. तो म्हणतो–'सर्वसाधारण जनतेला समजेल अशी कलाकृति कलावंतानें निर्माण केली पाहिजे हें कबूल; पण म्हणून कलावंतानें सामान्य जनतेच्या पातळीवर जातां कामा नये. जनतेनें त्याच्या प्रतिभेच्या पातळीला पोंचण्याचा प्रयत्न केला पाहिजे. या भलत्याच धोरणाला बळी पडून, अलीकडे रशियन सरकार पुष्किन्, शेक्सपियर, चेकॉव्ह इत्यादि जुन्या आणि एके काळीं 'Bourgeois' या शिवीनें संबोधल्या जाणाऱ्या लेखकांच्या कृति रंगभूमीवर आणणाऱ्या नाट्यदिग्दर्शकांना आणि नवशिक्या चित्रपट–दिग्दर्शकांना उत्तेजन देत आहे; आणि मेयरहोल्ड, आयझेन्स्टाइन, पुदॉव्हकिन् यांच्यासारख्या नामांकित आणि पहिल्या दर्जाच्या क्रांतिकारक कलावंतांना मागें टाकीत आहे. या धोरणाच्या मुळाशीं आणखीहि एक उद्देश असावा असें मला वाटतें. फॅसिस्ट राष्ट्रांच्या चढाईच्या भीतिनें फ्रान्स, इंग्लंड इत्यादि भांडवलशाही (Bourgeois) राष्ट्रांशीं रशिया अलिकडे दोस्ती करूं पाहतो आहे आणि या राष्ट्रांवर 'आम्ही कांहीं अगदींच बेछूट भाईलोक नाहीं; आम्हांलाहि परंपरेचा, संस्कृतीचा अभिमान आहे. शेक्सपियर, पुष्किन्, चेकॉव्ह, डिकन्स, इत्यादि जुन्या लेखकांचें स्वारस्य आम्हांलाहि समजतें!' अशा तऱ्हेनें 'सभ्य'पणाचें 'इंप्रेशन' मारण्याचा हा प्रयत्न आहे. नाहींतर मेयरहोल्ड, आयझेन्स्टाइनसारख्या क्रांतिकारक कलावंतांच्या कृती मागें टाकून मालकीहक्काला धक्का बसल्यामुळें दुःखीकष्टी झालेल्या एका पांढरपेशा कुटुंबाचें सहानुभूतिपूर्वक चित्रण ज्यांत केलें आहे तें चेकॉव्हचें 'Cherry Orchard' नाटक किंवा अतिरिक्त भावनाविवशतेच्या आहारीं जाणाऱ्या डिकन्सच्या 'Pickwick Papers' वर बसविलेलें विनोदी प्रहसन रशियन जनतेंत लोकप्रिय करण्याचें कारण काय? या कलाकृतींत कसला आला आहे समाजवाद, पुरोगामित्व आणि क्रांतिप्रवणता?

या शिष्टपणाचें आणखीहि एक लहानसें उदाहरण सांगण्यासारखें आहे. एकदां एका रशियन तरुणाला मीं म्हटलें, "तुम्ही सर्व लोक एकमेकांना 'तोव्हारिश' म्हणजे कॉमरेड म्हणतां ना ?"

"छे, छे !" तो एकदम म्हणाला, "फक्त जवळच्या मित्राला किंवा एका ठिकाणीं काम करतांना एकमेकांना आम्ही 'तोव्हारिश' म्हणतों. बाकी सर्वसाधारणपणें रशियन लोक एकमेकांना 'ग्राझदानिन्' किंवा 'सिटिझन्' म्हणतात !" कोण म्हणतो रशियांत कॉमरेड्स आहेत ? हे तर सिटिझन्स !

सौ. रोब्सन् मोठ्या उमद्या स्वभावाच्या आहेत. नवऱ्यापेक्षां त्या खूपच गोऱ्या किंवा माझ्याइतक्या काळ्या आहेत म्हणा ना ! नीग्रो बाई इतकी उजळ असूं शकेल असें मला वाटलें नाहीं. मीं त्यांना म्हटलेंसुद्धां, "आपण 'मुलाटो' आहांत कीं काय ?"

मुलाटो म्हणजे गोरा बाप आणि नीग्रो आई यांची संतति. ही जात नीग्रोसारखी असली तरी बरीच गोरी असते.

"छे, छे !" त्या हंसून एकदम उद्गारल्या, "मी अगदीं अस्सल नीग्रो रक्ताची आहें आणि मला त्याचा अभिमान वाटतो ! माझ्या गोरे-पणामुळं आमचं लग्नसुद्धां मोडत होतं !"

"तें कसं काय ?" मी म्हणालों.

"पॉल काळा म्हणून माझे आईबाप मीं त्याच्याशीं लग्न करूं नये असं म्हणत होते; आणि पॉलची मंडळी माझ्याविरुद्ध होती, कारण मी माझ्या गोरेपणाच्या तोऱ्यांत त्यांच्याशीं उद्धटपणानं वागेन अशी त्यांना भीति वाटत होती म्हणून !"

हिंदु लोकांत काय, किंवा नीग्रो लोकांत काय, प्रेमविवाहाला येणाऱ्या अडचणी सारख्याच असतात म्हणायच्या !

नाटक संपल्यानंतर हॉटेलमध्यें परत येईपर्यंत साडेअकरा वाजले होते. रात्रीं दोन वाजेपर्यंत मला झोंप आली नाहीं. आमच्या हॉटेलच्या बाजूनें जाणाऱ्या 'मॉस्को' नदीचें पात्र रुंद करून मोठा थोरला 'मॉस्को–व्होल्गा' कालवा बांधण्याचें काम रात्रंदिवस चालू आहे. या कालव्यामुळें मॉस्को हें एक मध्यवर्ती बंदर होईल आणि मोठमोठीं जहाजें क्रेमलिनच्या

आणि आमच्या हॉटेलच्या बाजूनें मॉस्को बंदरांत येऊं शकतील. हजारों मजूर विजेच्या प्रकाशांत इथें रात्रीचें काम करीत आहेत. त्यांच्या करमणुकीकरितां रेडिओ चालू आहेत; 'खाड्खाड्' 'ठोकठोक' सारखा आवाज येतो आहे; कामाच्या ठिकाणीं जिकडेतिकडे मोठेमोठे लाल फलक लावले आहेत आणि त्यांवर 'भाई हो, तुमचा हा कालवा जितक्या लवकर तयार कराल तितकें तुम्हालाच बरें!' अशा अर्थाची उत्तेजनपर ब्रीदवाक्यें आहेत. २–३० ला मी झोंपीं गेलों.

* * *

## ता. ५ जून–

'The Theatre of the Young Spectators'—*११ महिन्यांत* 'The Bayonet' चे २९० *प्रयोग*!

सकाळीं अकरा वाजतां मॉस्कोंतलें मुलांचें सुप्रसिद्ध नाटयमंदिर पाहायला आम्ही निघालों. या नाट्यमंदिराला 'The theatre of the young spectators' असें नांव आहे. सध्यां मुलांना रजा असल्यामुळें इथें काम चालू नाहीं. पण थिएटरच्या चालकांची (Regisseur) आणि आमची मुलाखत होणार आहे.

हा 'रेजिस्यूर' अगदीं अठ्ठावीस–एकोणतीस वर्षांचा तरुण रशियन आहे. मोठा सुस्वभावी आणि विनयशील मला वाटला तो. आम्ही विचारूं ती माहिती मोठ्या आनंदानें तो आम्हाला देत होता. अत्यंत साधा वेष केलेली एक तरुण रशियन मुलगी त्याची असिस्टंट म्हणून या थिएटरांत काम करते.

इथें येणाऱ्या मुलांचे दोन गट करण्यांत आले आहेत. एक गट रंगभूमीवर काम करतो. दुसरा देखावे, कपडे, नेपथ्यरचना इत्यादि गोष्टींत लक्ष घालतो. पंधरापंधरा आणि सोळासोळा वर्षांच्या मुलांमुलींनीं कांहीं नाटकांतील देखाव्यांचीं स्वतःच्या कल्पनेप्रमाणें केलेलीं 'स्केचीस्' पाहून मला खरोखरच अपरंपार कौतुक वाटलें. मुलांना संधि दिली तर तीं काय करूं शकतात तें या थिएटरमधील एकंदर व्यवस्था पाहिल्याशिवाय कळणार नाहीं. सर्वसाधारणपणें नाटक पहावयाला नऊशें बाल-

प्रेक्षक हजर असतात. त्यांचीं तिकिटें त्यांच्या शाळेचे अधिकारी अगोदरच विकत घेऊन ठेवतात. मुलांच्या मानसशास्त्राचे तज्ज्ञ असलेल्या खास लेखकांकडून या थिएटरकरितां नाटकें लिहून घेण्यांत येतात. धंदेवाईक नट मुलांना अभिनय शिकविण्याकरितां येतात; आणि केव्हांकेव्हां त्यांच्यामध्यें स्वतः कामहि करतात.

१९१७ च्या क्रांतीनंतर रशियांतील Whites ( झारशाही आणि भांडवलवाले यांचें पक्षपाती सैन्य ) आणि Reds ( कम्युनिस्टांचें सैन्य ) यांच्यामध्यें जें तुंबळ युद्ध (Civil war) झालें, त्या प्रसंगावर आधारलेल्या एका नाटकाची हकीगत तो 'रेजिस्यूर' आम्हाला सांगत होता.

"No child was willing to play the white!" तो म्हणाला.

"म्हणजे साऱ्या रशियांत आतां उनाड (Naughty) किंवा विकृत (Perverse) मनोवृत्तीचं एकहि मूल उरलेलं नाहीं कीं काय?" मीं हंसत हंसत त्याला विचारलें.

"छे, छे, तसं नाहीं कांहीं!" तो म्हणाला, "तशीं वाईट मुलं क्वचित् कुठं कुठं आहेत."

"मग अशा मुलांत साम्यवादविरोधी (Anti-Communist) मनःप्रवृत्ति दिसल्या तर तुम्ही काय करतां?" मी म्हणालों.

"त्या मुलावर आम्ही विशेष देखरेख ठेवतों आणि त्याला सुधारण्याचा प्रयत्न करतों." तो म्हणाला. "इतकंच नव्हे, तर त्याची घरची परिस्थिति आणि त्याच्या आईबापांचा पूर्वेतिहास यांचीहि कसून चौकशी करतों."

"वाटलंच मला!" मी हंसून म्हणालों.

हें सर्व थट्टेंत बोलणें चाललें होतें; पण रॅफे आणि त्या दोन ब्रिटिश म्हाताऱ्या या सुस्वभावी रशियन लोकांना ज्या तऱ्हेनें प्रश्न विचारतात आणि त्यांना पकडण्याचा प्रयत्न करतात, त्याचा मला अतिशय राग येतो. हे लोक खोटें बोलणारे चोर आहेत, आणि आपण कुणीतरी यांची उलटतपासणी करणारे न्यायाधीश आहोंत अशा ऐटींत रॅफे त्या रशियन तरुणाबरोबर किंवा त्या मुलीबरोबर बोलतो.

'The Black Ravine' आणि 'The Bayonet' या मुलांनीं केलेल्या नाटकांचे अनुक्रमें दोनशें आणि अडीचशें प्रयोग झाले, अशी माहिती ती ऑसिस्टंट मुलगी सांगत होती.

" हे आंकडे खरे कशावरून ? " रॅफे म्हणतो.

त्या मुलीला राग आला. "मी तुम्हांला रजिस्टरच काढून दाखवतें." ती हंसून म्हणाली.

ऑफिसांतलें कपाट उघडून ती रजिस्टर शोधूं लागली. तिला तें कुठें मिळेना ! रॅफे विजयोत्साहानें तिच्याकडे पाहूं लागला ! पण तेवढ्यानें डरणारी ती नव्हती. तिनें दुसरें कपाट उघडून धुडाळलें. शेवटीं मिळालें एकदांचें तें रजिस्टर. तें उघडून तिनें रॅफेला दाखविलें. ' The Bayonet' नाटकाचे २९०.प्रयोग झाले होते ! तरीहि रॅफे डगमगला नाहीं.

" हे एका वर्षांत २९० प्रयोग झाले कीं अनेक वर्षांत मिळून ? " तो मोठ्या तोऱ्यांत प्रश्न विचारतो.

तिनें शांतपणें रजिस्टरमधल्या तारखा दाखवल्या. ११ महिन्यांत २९० प्रयोग झाले होते !

हा गृहस्थ स्वतःला रशियन रंगभूमीचा तज्ज्ञ समजतो, आणि रशियन भाषा याला मुळींच येत नाहीं !

संध्याकाळीं ७–३० वाजतां वाख्तांगॉव्ह थिएटरमध्यें शेक्सपियरचें ' Much Ado about Nothing ' हें नाटक पहावयाला गेलों. या रशियन प्रोड्यूसरनें हें नाटक फारच सुंदर बसविलें आहे. त्यानें मुद्दाम तयार करून घेतलेले देखावे आणि प्रकाश–योजना मला अतिशय आवडली. वादळाचा देखावा दाखवितांना रंगभूमीच्या मागें एक फिकट जांभळा पडदा सोडण्यांत आला होता आणि त्यावर प्रच्छन्न सिनेमा–यंत्राच्या सहाय्यानें धोधो–धोधो पडणारा पाऊस आणि मधूनमधून विजेचा लखलखाट दाखविण्यांत येत होता. नाटकांतले देखावे वास्तवपूर्ण असले तरी तपशीलवार बोजड वास्तवता त्यांत नव्हती. ते नुसते सूचक होते. उदाहरणार्थ, राजवाड्याचा नुसता दर्शनी भाग हुबेहूब दाखवून मागें नुसत्या साध्या कमानींची एक रांग दाखविली होती. आमच्या मराठी रंगभूमीवर ही पद्धत अमलांत आणली तर वास्तवतेच्या आणि खर्चाच्या दोन्ही दृष्टींनीं तें बरें पडेल असें मला वाटतें. राजवाडा म्हणजे राजवाड्याचा प्रत्येक बोजड भाग वाटेल तितका खर्च करून रंगभूमीवर उभा करावयला नको. नाटकाहून आम्ही साडेअकराला परत आलों.

* * *

## ता. ६ जून–

*हा आठवडा कीं सहावडा ?–'रेजिस्यूर' हाच खरा नाटकाचा निर्माणकर्ता–मीऽऽस्टर पीक्विक !*

आज रशियाचा 'Rest Day' आहे. आज रविवार आहे खरा; पण तो केवळ योगायोग आहे. इथें रविवारची सुटी नसते. सर्व कालगणनाच सोव्हिएट सरकारनें बदलली आहे. पांच दिवसानंतर सहावा दिवस रजा. त्या दिवसाला 'Rest Day' म्हणावयाचें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे सहा दिवसांचा आठवडा, आणि एका आठवड्यांत (कीं सहावड्यांत ?) एक रजा.

आज आम्ही दोन नाटकें पाहाणार आहोंत. सकाळीं ११–३० वाजतां ॲफिलिएटेड मॉस्को थिएटरमध्यें बुलॅकॉव्हचें 'The Days of the Turbins'; आणि त्याच थिएटरांत संध्याकाळीं ७–३० वाजतां स्टानीत्सेन या रशियन प्रोड्यूसरनें डिकन्सच्या सुप्रसिद्ध कादंबरीवर बसविलेलें 'The Pickwick Club' हें नाटक.

रशियाचा प्रख्यात प्रोड्यूसर स्टानीस्लाव्हस्की याचा शिष्य सुडॉकॉव्ह यानें 'The Days of the Turbins' बसविलें आहे. रशियन रंगभूमीवर नाटककार किंवा नटनटी यापेक्षांहि 'प्रोड्यूसर' किंवा रशियन लोक ज्याला 'Regisseur' म्हणतात त्याला अतिशय महत्व आहे. प्रत्येक 'रेजिस्यूर'ची नाटक बसविण्याची वेगवेगळी पद्धत आहे. सिनेमा-फिल्ममध्यें ज्याप्रमाणें इतर सर्व गोष्टींपेक्षां 'डायरेक्टर'ला खरें महत्व आणि चित्रपट–सृष्टींतल्या कलाकृतीचा खरा निर्माणकर्ता (Creative) कलावंत (Artist) डायरेक्टर किंवा दिग्दर्शक, तसाच थोडासा प्रकार आधुनिक रशियन रंगभूमीचा आहे. स्टानीस्लाव्हस्कीनें बसविलेलें शेक्सपियर किंवा चेकॉव्हचें नाटक, वाख्तांगॉव्हनें बसविलेलें गटे किंवा शेक्सपियरचें नाटक असें येथें म्हटलें जातें.

'पिक्विक् क्लब' हें नाटक कमालीचें सुंदर वठलें. भाषा रशियन असूनहि प्रत्येक प्रसंग आणि प्रत्येक पात्र माहीत असल्यामुळें समजावयाला तें मुळींच कठीण गेलें नाहीं. या नाटकांतले देखावेहि साधे होते. कांहीं-

कांहीं प्रवेश तर रंगवलेल्या पडद्यावर करण्यांत आले. रशियन नटी इंग्लिश उच्चार मात्र दीर्घ आणि आपल्याकडील मद्रासी अय्यासारखे करतात!– मीस्टर विंकला!–मीऽऽस्टर पीक्‌वीक!

* * *

## ता. ७ जून–

*रशियाची सुप्रसिद्ध 'त्रेत्याकॉव्ह गॅलरी'.–कुठेंही जा– हा स्टालिन कांहीं तुमची पाठ सोडीत नाहीं!–किती निराळे-पणा आहे ह्या 'अथेल्लों'त?*

दुपारीं बारा वाजतां सुप्रसिद्ध 'त्रेत्याकॉव्ह गॅलरी' पहावयाला गेलों. या गॅलरींत चौदाव्या शतकापासून तों आजतागायतपर्यंतच्या रशियन चित्रकारांच्या कलाकृतींचें प्रदर्शन आहे. जुनीं चित्रें मला विशेष आवडलीं नाहींत. नव्या चित्रांत मॅक्झिम् गॉर्कीचें चित्र मला फार आवडलें. नवीन सोव्हिएट चित्रकारांचीं चित्रें मला अगदींच तिसऱ्या दर्जाचीं वाटलीं. कामगार–सैनिकांचें लाल आणि काळ्या रंगांत 'इंप्रेश-निस्टिक' पद्धतीनें काढलेलें एक चित्र त्यांतल्या त्यांत बरें होतें.

म्यूझियमच्या बाहेर असलेल्या बागेंत सफेत संगमरवरी दगडाचा लेनिनचा एक सुरेख पुतळा आहे. त्याहूनहि खूप मोठा असा पांढऱ्या दगडाचाच स्टालिनचा एक पुतळा या इमारतीचा जिना चढल्याबरोबर पहिल्या मजल्यावर आहे! सोव्हिएट प्रतिनिधींच्या एका सभेंत स्टालिन बोलतो आहे अशा तऱ्हेचें एक भलें थोरलें चित्र याच मजल्यावर आहे. तुम्ही कुठेंहि गेलांत तरी स्टालिन कांहीं तुमची पाठ सोडीत नाहीं!

मॉस्कोच्या सुप्रसिद्ध 'Realistic Theatre' मध्यें ऑख्लॉप्कॉव्ह या तरुण प्रोड्यूसरनें बसविलेलें शेक्सपियरचें 'Othello' नाटक पहावयाला संध्याकाळीं ७-३० वाजतां गेलों.

ऑख्लॉप्कॉव्ह नेहमीं नवेनवे प्रयोग करून पहातो. आज तीनचार आडवेतिडवे काळे पडदे रंगभूमीवर दिसत आहेत. रंगभूमीवर सीमादीप (Foot-light) मुळींच नाहींत. थिएटरांत निरनिराळ्या ठिकाणीं विद्युद्दीप ठेवलेले आहेत. आणि पात्रांच्या तोंडावर किंवा रंगभूमीवरल्या एकाद्या

विशिष्ट भागावर निरनिराळया वेळीं निरनिराळया दिव्यांचा प्रकाश विशिष्ट हेतूनें पाडण्यांत येतो. थिएटरांत काळोख झाला आणि एका बाजूचा एक काळा पडदा बाजूला सरकून रंगभूमीचा फिरता भाग (Revolving stage) हळुहळु पुढें सरकूं लागला. त्यावर एक व्हेनिशियन गोंडोला होता. त्या होडींत होडीवाला आणि हातांत कंदील घेतलेला आयागो उभा होता. रंगभूमीच्या वरल्या कोंपऱ्यांत एक खिडकी दिसत होती. आणि तिच्यांत एक मेणबत्ती लुकलुकतांना दिसत होती. श्रोत्यांच्या समोर होडी आल्याबरोबर 'ब्रॅबन्शियो ! ब्रॅबन्शियो !!' म्हणून मोठ्यांदा देस्देमोनाच्या बापाच्या नांवानें कंदील वर करून आयागो ओरडला. वरची खिडकी उघडली आणि कानटोपी घातलेल्या म्हाताऱ्या ब्रॅबन्शियोनें खिडकीच्या बाहेर आपलें डोकें काढलें. नाटकाला अशी सुरुवात झाली.

नाटकांत प्रतीकात्मक पडदे बरेच होते. एकदां आयागोच्या प्रवेशापूर्वी लांडग्याचें क्रूर डोकें बरोबर मध्यभागीं रंगवलेला एक पडदा होता. पडदा बाजूला झाला आणि लांडग्याच्या तोंडाच्या जागीं आयागोचें तोंड बाहेर आलें! देस्देमोना आणि अथेल्लो यांचा एक प्रवेश चालू असतां मागें अर्धा निळा आणि अर्धा लाल असा एक साधा पडदा होता. निळा रंग देस्देमोनाचें निरागसत्व आणि लाल रंग अथेल्लोची भडकती असूया यांचा निदर्शक असावा.

अथेल्लो, एमोलिया इत्यादि नटनटींचीं कामें उत्कृष्ट झालीं. मला एक प्रकार कसासाच वाटला. एक प्रवेश किंवा अंक झाला, कीं उजेड व्हावयाचा आणि काळा कोट आणि डोक्याला लाल फडकें बांधलेली स्टेज झाडणारी थिएटरची मोलकरीण खुशाल रंगभूमीवर श्रोत्यांसमोर यायची आणि झाडून साफसफाई करीत पुढील प्रवेशाला जरूर असलेलें फर्निचर किंवा इतर सामान श्रोत्यांच्या डोळ्यांसमोर मांडून ठेवावयाची

नाटक संपल्यावर हॉटेलकडे परत येतांना मी बसनें आलों. मॉस्कोंतल्या बसेस अगदींच भिकार आहेत. मुंबई—महाड सर्व्हिसच्या लॉऱ्याच म्हणा ना ! बसच्या कंडक्टर बायाच असतात. एका स्टेशनावर एक दारू पिऊन झिंगलेला माणूस सारखा आंत चढायचा प्रयत्न करीत होता. आमच्या कंडक्टरबाईनें त्याला कितीतरी वेळां नको चढूं म्हणून

विनवून सांगितलें; तरीहि तिला ढकलून तो आंत येऊं लागला. तेव्हां त्या भक्कम रशियन बाईनें एक ठणठणीत ठोसा त्याच्या नाकावर ठेवून दिला आणि त्याला खालीं उडवून देऊन बस चालू केली !

* * *

## ता. ८ जून—

*पंडित जवाहरलाल तर ह्या हॉटेलांत उतरले नसावेत ! —हें टॉलस्टॉयचें घर !—लेनिन म्युझियम्.—'ट्रॉट्स्की' या नांवाचा माणूस रशियांत कधीं झालाच नाहीं ! !—उत्तर ध्रुवावर बसून लेखक नाटक ऐकतो आहे ! हें नाटकगृह कीं उत्तर ध्रुव ? खरोखरच हें सारें स्वप्न आहे !*

ब्रेकफास्टनंतर खालीं आपलीं पत्रें आहेत का म्हणून पहावयाला गेलों तों एक मजेदार प्रसंग घडला. पत्रें देणारा उंच, म्हातारा रशियन कारकून मला इंग्रजींत म्हणाला, "तुमच्या हिंदी बायका कपडे किती सुंदर करतात हो ! त्या अंगाभोंवतीं गुंडाळतात त्याला काय म्हणतात ?"

मी म्हणालों, "साडी."

त्यानें एकदम हिंदी बायकांविषयीं प्रश्न विचारलेला पाहून मला आश्चर्य वाटलें.

"तूं कुठं पाहिल्यास आमच्या हिंदी बायका ?" मी स्मित करीत त्याला विचारलें.

"कांहीं वर्षांपूर्वीं या हॉटेलांत कांहीं हिंदी पुरुष आणि बायका उतरल्या होत्या." तो म्हणाला, "किती सुंदर होत्या म्हणून सांगूं !"

कोण बरें असाव्यात या हिंदी स्त्रिया ? कांहीं वर्षांपूर्वीं जवाहरलाल नेहरू आपल्या बहिणी आणि पत्नीसह रशियाला गेले होते. ती मंडळी तर या हॉटेलांत उतरली नसेल ना ?

हा म्हातारा कारकून भलताच खूष दिसला हिंदी स्त्रियांवर ! "काय हो, आणखी कपाळावर लाल ठिपका कसला लावतात तुमच्या स्त्रिया ?" तो विचारतो, "त्यामुळें तर त्या फारच सुरेख दिसतात !"

त्या ठिपक्याचें नांव कुंकूं आणि हिंदी स्त्रिया कुंकू कां लावतात तें सर्व मीं त्याला समजावून सांगितलें.

आज दुपारीं टॉल्स्टॉयचें मॉस्कोमधलें घर पाहावयाला जावयाचें आहे. टॉल्स्टॉयच्या चरित्रांत ज्या " यास्नाया पोल्याना " या घराचें नांव आपण बऱ्याच वेळां वाचतों तें हें घर नव्हे. " यास्नाया पोल्याना " मॉस्कोपासून दोनशें मैल अंतरावर आहे. हें मॉस्कोमधलें टॉल्स्टॉयचें जे घर आहे त्यांत तो हिंवाळ्यांत रहावयाला येत असे. शहरापासून बरेंच लांब जवळ जवळ शहराच्या बाहेरच हें घर आहे म्हणा ना. दुपारीं बारा वाजतां आम्हीं आमच्या गाइडसह तिथें जाऊन पोंचलों. हिरव्यागार झाडांची एक मोठी राई आहे आणि तिथें हें घर आहे. टॉल्स्टॉयचें हें घर एकाद्या खेळांतल्या बंगल्यासारखें दिसतें. विटांचा भाग त्यांत फार थोडा असून हिरवा आणि पिवळा रंग दिलेल्या लांकडी फळ्यांनीं तें बांधलेलें आहे. लेनिनला आपल्या राष्ट्राच्या संस्कृतीच्या संरक्षणाची किती काळजी वाटत होती त्याचें हें घर म्हणजे उत्तम उदाहरण होय. १९२१ सालीं रशियांत बोल्शेव्हिक आणि त्यांचे शत्रू यांचें तुंबळ युद्ध ( Civil war ) चालू असतां टॉल्स्टॉयचें हें घर, त्याचप्रमाणें इतर ऐतिहासिक अवशेष यांचें रक्षण करण्याकरितां लेनिननें खास हुकुम सोडले. आणि त्या हुकुमान्वयें या घराची व्यवस्था लावण्यांत आली. टॉल्स्टॉयचे नातेवाईक, गडीनोकर या सर्वांना बोलावण्यांत आलें आणि या घरांतल्या सर्व वस्तु पूर्वीं होत्या तशा लावून ठेवण्यांत त्यांची मदत घेण्यांत आली.

घरांत शिरतांनाच उजव्या बाजूच्या एका लहानशा खोलींत या घरावर देखरेख करण्याकरितां नेमलेल्या म्हाताऱ्या बाईचें ऑफिस आहे ! मला आणि आमच्याबरोबर असलेल्या एकदोन अमेरिकन बायांना आमच्या गाईडनें त्या ऑफिसांत नेलें. तिथें आमच्या पायांतल्या बुटांवर घालण्याकरितां खास शिवलेल्या गरम कापडाच्या पिशव्या देण्यांत आल्या. नुसत्या बुटांनीं आंत फिरल्यास कचरा आणि धूळ आंत पसरेल म्हणून मुद्दाम प्रवाशांना या पिशव्या देण्यांत येतात; त्या दोरीनें बुटावर बांधावयाच्या आणि नंतर आंत जावयाचें.

टॉल्स्टॉयच्या 'डायनिंग टेबल'वर बशा, कांटे, चमचे मांडून ठेवलेले आहेत. स्वतः टॉल्स्टॉय आणि त्याची आवडती मुलगी मराया हीं दोघें शाकाहारी होतीं. त्यांच्या खुर्च्या वेगळ्या ठेवलेल्या आहेत. टॉल्स्टॉयच्या बायकोची खोली, मुलांमुलींच्या आणि गडीनोकरांच्या खोल्या नंतर आम्हीं पाहिल्या. वरच्या मजल्यावर एक मोठा थोरला हॉल आहे. इथें काउंटेस टॉल्स्टॉय आपल्या पाहुण्यांचें आगतस्वागत करीत असे. टॉल्स्टॉय ज्या खोलींत लिहावयाला बसत असे ती अगदीं लहानशी आहे. टेबलावर एक जुनाट रॉकेलचा दिवा असून या दिव्याच्या उजेडांत टॉल्स्टॉय लिहित बसत असे. टॉल्स्टॉयचे व्यायाम करावयाचे 'डंबेल्स', काउंटेस टॉल्स्टॉयचे झगे वगैरे वस्तूहि बघण्यासारख्या आहेत. प्रत्येकानें कांहींतरी हस्तव्यवसाय केलाच पाहिजे असें टॉल्स्टॉयचें तत्त्व होतें. औरंगजेब जसा टोप्या शिवीत असे, तसा टॉल्स्टॉय जोडे शिवीत असे! एका खोलींत टॉल्स्टॉयची आरी, टोचा वगैरे सर्व चांभारकामाचीं हत्यारें आहेत. टॉल्स्टॉयनें शिवलेली एक बुटाची जोडीहि त्या खोलींत आहे आणि ती खरोखरच कुठलाहि चांगला चांभार करील इतकी चांगली आहे!

घराशेजारींच बाहेरल्या आवारांत एक लहानशी इमारत आहे. टॉल्स्टॉयचीं पुस्तकें छापून प्रसिद्ध करण्याकरितां काउंटेस टॉल्स्टॉयनें येथें एक लहानसा छापखाना ठेवला होता आणि एक प्रकाशनसंस्था काढली होती म्हणतात. या इमारतीच्या दारावर काउंटेस टॉल्स्टॉयनें रंगवून घेतलेली एक जुनाट पाटीहि अजून आहे. हिंवाळ्यांत टॉल्स्टॉय इथें रहावयाला आला म्हणजे पाणी आणण्याचें आणि या सबंध आवाराची झाडलोट करण्याचें काम तो स्वतः करीत असे. टॉल्स्टॉयला 'स्केटिंग'ची अतिशय आवड होती आणि हिंवाळ्यांत बर्फ पडलें म्हणजे या आवारांत वयाच्या बहात्तराव्या वर्षीं देखील तो यथेच्छ 'स्केटिंग' करीत असे.

हें घर पाहून झाल्यावर दुपारीं दोन वाजतां मॉस्को शहरांत टॉल्स्टॉय म्युझियम आहे तें पहावयाला आम्ही गेलों. टॉल्स्टॉयच्या चरित्रांतले प्रसंग दाखविणारीं कांहीं चित्रें, इतर अवशेष त्याचप्रमाणें त्याच्या पुस्तकांच्या निरनिराळ्या आवृत्त्या, निरनिराळ्या भाषांतलीं भाषांतरें वगैरे गोष्टी वेगवेगळ्या दालनांतून व्यवस्थितपणें मांडून ठेवल्या आहेत.

इथलें एक चित्र फार मजेदार आहे. पिरॅमिडचा एक त्रिकोण काढला आहे. पिरॅमिडच्या कळसावर झार उभा आहे; तो म्हणतो 'मी तुमच्यावर राज्य करतों !' त्याच्या खालच्या आडव्या थरावर धर्ममार्तंड पाद्री उभे आहेत; ते म्हणतात, 'आम्ही तुमच्या डोळ्यांत धूळ टाकतों !' त्याच्या खालच्या थरावर सैनिक उभे आहेत; ते म्हणतात 'आम्ही तुम्हांला गोळ्या घालतों.' त्यांच्या खालीं ऐदी श्रीमंत उभे आहेत; ते म्हणतात, 'आम्ही तुमच्याकरतांच खातों पितों !' आणि सर्वांच्या खालीं तळाला, सर्वांचें ओझें पाठीवर तोलून कामगार व शेतकरी उभे आहेत; ते म्हणतात, 'आम्ही तुमच्याकरितां धान्य पिकवतों आणि काम करतों !'

संध्याकाळीं ६ वाजतां लाल चौकाच्या पलीकडे जवळच असलेलें लेनिन म्यूझियम पहावयाला मी गेलों. ही लाल विटांची इमारत बाहेरून जुनाट आणि कोंदट वाटते; पण आंतून ती अतिशय सुरेख आहे. खालीं पांचपन्नास खोल्या आहेत. त्याचप्रमाणें वरच्या मजल्यावरहि खूप खोल्या आहेत. एका खोलींत लेनिनचीं चित्रें, तर दुसरींत त्याचे निरनिराळे पुतळे अशा तऱ्हेनें प्रत्येक खोलींत लेनिनशीं संबंध आलेल्या शक्य त्या सर्व वस्तू मांडून ठेवण्यांत आलेल्या आहेत. लेनिन लिहावयाला बसत असे तें टेबल, त्याच्या खुर्च्या, क्रांतीच्या वेळीं त्यानें घाईघाईत खरडलेल्या चिठ्याचपाट्या, तो वेष बदलून पळाला त्या वेळचा त्याचा केंसांचा टोप, त्याचा ओव्हर कोट, त्याचीं पुस्तकें, त्यांचीं हस्तलिखितें, लेनिन मेल्यानंतर त्याच्या चेहऱ्यावरून घेतलेला प्लास्टरचा मुखवटा ( Mask ), प्लास्टरवर घेतलेले त्याच्या हाताचे ठसे,—सर्व सर्व कांहीं त्या संग्रहालयांत आहे. लेनिनचें हस्ताक्षर अत्यंत सुंदर आहे.

लेनिनच्या आयुष्यांतल्या निरनिराळया प्रसंगांचीं भव्य तैलचित्रेंहि इथें आहेत. त्याच्या साथीदारांची म्हणजे मुख्यत्वेंकरून स्टालिन, मॉलॉटॉव्ह, व्हॉरॉशिलॉव्ह यांचीं निरनिराळीं चित्रेंहि जिकडेतिकडे आहेत. मात्र हें सबंध म्यूझियम पाहिल्यानंतर रशियन क्रांतीचा इतिहास ज्यानें वाचला आहे त्याची खात्री होऊन चुकते, कीं 'ट्रॉट्स्की' हें नांव जें आपणाला इतिहासांत जिकडेतिकडे आढळतें, ती काहींतरी एक भयंकर भूल आहे, ट्रॉट्स्की या नांवाचा माणूस किंवा कांहीं वस्तु रशियांत कधीं झालीच



प्रसिद्ध रशियन कादंबरीकार शोलोकॉव्ह यांच्या " And Quiet Flows The Don " या कादंबरीच्या कथानकावरून तयार केलेल्या संगीत नाटकांतील एक देखावा.

पृ. १३१

नाहीं ! स्टालिन मात्र प्रत्येक महत्वाच्या प्रसंगीं लेनिनच्या पाठीशीं उभा असे. रशियांत क्रांतीचा स्फोट झाल्याबरोबर सील केलेल्या जर्मन आग-गाडींतून लेनिन रशियांत परत आला, हा महत्वाचा प्रसंग दाखविणारें एक भव्य तैलचित्र या संग्रहालयांत आहे. त्या चित्रांतसुद्धां लेनिन डब्यां-तून स्टेशनांत उतरतो आहे आणि त्याच्या मागोमाग स्टॅलिन उतरतो आहे असेंच दाखविलें आहे.

ऑख्लॉप्कॉव्हच्या 'रिआलिस्टिक' थिएटरांत संध्याकाळीं आठ वाजतां नुकताच दोनचार दिवसांपूर्वी उत्तर–ध्रुवावर ज्यांनीं लाल बावटा फडकवला, त्या सोव्हिएट वैमानिकांपैकीं व्हॉडॉप्यानॉव्ह या वैमानिकानें लिहिलेल्या 'The Dream' या नाटकाचा प्रयोग पाहायला मला जायचें आहे. याच थिएटरांत काल 'अथेल्लो' पहायला मी गेलों होतों. बस चुकल्यामुळें थिएटरमध्यें पोंचावयाला मला उशीर झाला. नाटक आठ वाजतां सुरू झालें होतें. मी आठ वाजून दहा मिनिटांनीं पोंचलों. माझ्या खुर्चीचा नंबर माझ्याकडे होता आणि माझी जागाहि 'रिझर्व्हड्' होती. पण रशियन थिएटरांत उशीरां येणाऱ्या बाजीराव प्रेक्षकांचे लाड चालत नाहींत. उशीरां येणाराला पाय न वाजवतां जपून वरच्या गॅलरींत जावें लागतें आणि अंक संपून उजेड होईपर्यंत तिथें उभें राहून नाटक पाहावें लागतें. अंक संपला कीं मधल्या वेळाखंडांत आपण आपल्या जागेवर जाऊन बसायचें.

आजच्या प्रयोगाला तरुण रशियन स्त्री-पुरुषांची गर्दी तुफान आहे. त्यांचा उत्साहहि अवर्णनीय आहे. आजच्या व्हॉडॉप्यानॉव्हच्या 'The Dream' च्या प्रयोगाला खरोखरच सर्व जगाच्या रंगभूमीच्या इतिहासांत एक प्रकारचें अद्वितीय महत्व आहे.पहिली गोष्ट म्हणजे व्हॉडॉप्यानॉव्ह हा वैमानिक असून नाटककारहि आहे. नाटक इथें चालू आहे; या क्षणाला तो आपल्या इतर वैमानिक सोबत्यांसह उत्तर-ध्रुवावर छावणी टाकून बसला आहे. इतकेंच नव्हे, तर हें स्वतःचें नाटक उत्तर ध्रुवावर बसून तो रेडिओवर ऐकतो आहे ! सोव्हिएट सरकारच्या खास हुकुमानें आजचा प्रयोग उत्तर-ध्रुवावर मुद्दाम या थिएटरांतून 'ब्रॉडकास्ट' करण्यांत येतो आहे. सोव्हिएटच्या वैमानिक वीरांनीं उत्तर ध्रुवावर लाल बावटा रोवण्याचा सर्व जगाला थक्क करून

टाकणारा जो अपूर्व विजय मिळविला आहे, त्याच्या इत्थंभूत आणि रसभरित वर्णनाशिवाय गेल्या दोनचार दिवसांच्या रशियन वृत्तपत्रांत दुसरें कांहीं नाहीं ! साऱ्या राष्ट्राला अभिमान वाटावा असेंच हें अचाट कृत्य आहे याबद्दल मुळींच शंका नाहीं. हें अचाट कृत्य करणाऱ्या एका वीरानें लिहिलेलें नाटक आज आम्ही पाहातों आहोंत.

या नाटकांतलें प्रत्येक दृश्य पाहून रशियन प्रेक्षकाचें अंतःकरण कां थरारून येऊं नये ? खरोखर सर्वच कांहीं ' स्वप्न ' आहे ! या नाटकाचा नायक एक वैमानिकच आहे. त्याच्या जीवनाचें स्वप्न उत्तर ध्रुवावर लाल बावटा लावावा असें आहे. व्हॉडॉप्यानॉव्हनें प्रत्यक्ष उत्तर ध्रुवावर जाण्यापूर्वी कितीतरी दिवस आधीं हें नाटक लिहिलें आहे. आणि कमालीचा योगायोग असा, कीं त्या नायकाच्या स्वप्नसृष्टीची या क्षणाला खरोखरच सत्यसृष्टि झाली आहे. शेवटच्या अंकांत नाटकाचा नायक उत्तर ध्रुवावर बर्फाच्या राशींत लाल बावटा रोवतो; आणि खरोखरच कालपरवांपासून उत्तर ध्रुवावरल्या शुभ्र हिमराशीवर सोव्हिएट रशियाचा लाल बावटा फडकतो आहे ! नाटक आणि जीवन यांच्यांतले प्रसंग जगाच्या इतिहासांत इतक्या समांतर रेषेंत क्वचितच घडले असतील. कोण म्हणेल व्हॉडॉप्यानॉव्हच्या 'The Dream' चा हा प्रयोग अद्वितीय नाहीं म्हणून !

काल इथेंच अथेल्लोचा प्रयोग झाला, तेव्हां स्टेजवर जिकडेतिकडे काळे पडदे दिसत होते. आज जिकडेतिकडे आकाशी रंगाचे निळे पडदे दिसत आहेत. बरोबरच आहे, कारण आकाशांत संचार करणाऱ्या वैमानिकाच्या जीवनासंबंधींच आजचें नाटक आहे. नाटकाच्या एकंदर वातावरणाला उठाव देण्याकरितांच कीं काय, रंगभूमीची जी दर्शनी चौकट असते, तिच्या वरच्या बाजूला बरोबर मध्यभागीं एका विमानाचा पुढचा भाग, त्यांतून हळुहळु फिरणारा पंखा, आणि विमानाचे दोन बाजूंचे दोन पंख कायमचे बसवून टाकले आहेत. नटांच्या भाषणांना अडथळा न होईल इतक्या बेतानें विमानाच्या एंजिनाचा ' घर्रर्रर्र ' आवाज नाटक चालू असतां थिएटरांत सारखा ऐकूं येत होता. नाट्यविषयाशीं प्रेक्षकांचें तादात्म्य करण्याकरितां ऑख्लॉप्कॉव्ह ज्या एक एक युक्त्या योजतो, त्या खरोखरच और आहेत !

जोराची हिमवृष्टि होत आहे आणि गुडघ्याइतकें खोल बर्फ तुडवीत नायक आणि त्याचे सोबती हातांत लाल बावटा घेऊन मोठ्या कष्टानें एकएक पाऊल पुढें टाकीत आहेत, असा देखावा शेवटच्या अंकांत आहे. या वेळीं रंगभूमीवर जोराची हिमवृष्टि होत होतीच, पण थिएटरमधल्या अंधारांत बसलेल्या आम्हां प्रेक्षकांवरहि अविरत हिम पडत होतें! आजूबाजूच्या प्रेक्षकांच्या अंगावर सफेत कांहींतरी पडतें आहें म्हणून मीं माझ्या कोटाकडे पाहिलें, तों माझ्याहि कोटावर पांढरेंपांढरें कांहींतरी सारखें पडत होतें! मात्र तें झाडून टाकण्याची कांहींच आवश्यकता नव्हती. तें मायावी हिम होतें! अदृश्य सिनेमायंत्राच्या सहाय्यानें साऱ्या थिएटरभर हें निरुपद्रवी हिम पाडण्यांत येत होतें!

नाटक साडेदहा वाजतां संपलें. वाटेंत हॉटेल मेट्रोपोलमध्यें जेवण घेऊन मी माझ्या हॉटेलांत परत आलों.

* * *

## ता. ९ जून—

*कामगारांनो, हा कारखाना तुमचा आहे!—आइस्क्रीम पॉवडर!—*‘Intervention’ *नाटक*

सकाळीं साडेदहा वाजतां ‘Fresser’ नांवाचा कारखाना पाहावयाला निघालों. फ्रेस्सर म्हणजे अत्यंत कठीण धातु कापण्याकरितां जीं हत्यारें लागतात तीं तयार करण्याचा कारखाना. हा कारखाना शहरापासून बराच दूर आहे. आम्ही ११–१५ च्या सुमारास कारखान्यापाशीं पोचलों. हा कारखाना १९३२ सालीं बांधण्यांत आला. कारखान्यांत एकंदर पांच हजार कामगार असून त्यांपैकीं निम्म्याहून अधिक स्त्रिया आहेत. स्त्रियांचा पगार पुरुषांइतकाच आहे.

कारखाना पाहावयाला आंत शिरण्यापूर्वीं आम्ही एका प्रशस्त बागेंतून जात होतों. पलीकडे लाल विटांचीं सुंदर टुमदार घरें दिसत होतीं. हीं या कारखान्यांतल्या कामगारांचीं राहण्याचीं घरें होत. हीं घरें पाहातांना आमच्या मुंबईच्या कामगारांकरितां बांधलेल्या सिमिटाच्या चाळींची

मला आठवण झाली ! कामगारांच्या मुलांकरितां 'किंडर गार्टन' शाळा वगैरे सर्व कांहीं व्यवस्था चोख आहे.

कामगारांना दोनशेपासून पंधराशे रूबल्सपर्यंत पगार आहेत. अर्थात् पंधराशे रूबल्सइतका लठ्ठ पगार फक्त 'स्टाखानोव्हाइट' कामगारांना मिळतो. 'स्टाखानोव्हाइट' म्हणजे जो उत्पादन वाढवण्याची एखादी नवीन पद्धत शोधून काढतो किंवा उत्पादनाचें प्रमाण तेवढ्याच वेळांत कितीतरी पटीनें वाढवून दाखवतो तो कामगार. 'स्टाखानॉव्ह' नांवाच्या एका कामगारानें ही चळवळ सुरू केली, म्हणून अशा कामगारांना 'स्टाखानोव्हाइट' म्हणतात. लेनिनग्राडमधल्या छापखान्यांत सर्वसाधारण कामगार सहा तासांत ६०,००० अक्षरें लिनोटाईप मशिनवर कंपोज करूं शकतो; पण त्याच मशीनवर 'स्टाखानोव्हाइट' कामगार सहा तासांत १३०,००० अक्षरें कंपोज करतात. रशियांत प्रत्येक कामगार 'स्टाखानोव्हाइट' होण्याकरितां धडपडत असतो. 'फ्रेस्सर' मधल्या कामगारांना सहा दिवसांतून एक दिवस भरपगारी रजा मिळते. त्याचप्रमाणें वर्षांतून एक महिना अशीच रजा मिळते. त्या रजेंत कामगार व्होल्गा नदीवर किंवा काळ्या समुद्राच्या काठीं कामगारांसाठीं सोव्हिएट सरकारनें खास बांधलेल्या 'सॅनेटोरियम'मध्यें विश्रांतीकरितां जातात. कारखान्यांत एक 'प्रपोजल कमिशन' आहे. एखाद्या कामगाराला उत्पादन वाढवण्याची कांहीं नवी युक्ति सुचली तर त्यानें ती या कमिशनपुढें मांडावयाची.

आम्ही पहिल्यांदा भट्टीखान्यांत शिरलों. तिथें एका रांगेनें कितीतरी अजस्र भट्ट्या धगधगत होत्या आणि त्यांतून लालपिवळ्या अग्निज्वाला भडकत होत्या. या खात्यांतसुद्धां कितीतरी बायका काम करीत होत्या. आंत उष्णता इतकी होती, कीं मला दोन मिनिटेंसुद्धां उभें राहावेना ! या खात्यांत काम करणाऱ्या कामगारांना दिवसांतून फक्त सहाच तास काम असतें. कारखान्यांतल्या भिंतीवर कांहीं ठिकाणीं हातीं लिहिलेलीं वर्तमानपत्रें लावलेलीं होतीं. यांना 'वॉल न्यूजपेपर्स' म्हणतात. 'कामगारांनो ! हा कारखाना तुमचा आहे. सोशालिस्ट उद्योगधंद्यांची काळजी घेणें आणि त्यांचें संरक्षण करणें हें तुमच्या हातीं आहे—' इत्यादि ध्येयवाक्यें लिहिलेलें लाल फडकें जिकडे तिकडे टांगलेलें दिसत होतें.

दुपारीं दीड वाजतां कारखाना पाहून आम्ही परत आलों. जेव-ल्यानंतर सहज आजचा 'मॉस्को डेली न्यूज' मी चाळीत बसलों होतों. सोशालिस्ट राष्ट्रांतलीं वृत्तपत्रें इतर राष्ट्रांतल्या वृत्तपत्रांपेक्षां किती वेगळीं असतात! जाहिरात एकहि दिसत नाहीं. आमच्या वर्तमानपत्रांत कुणीं कुणाचा खून केला आणि कुणीं कुणाची बायको पळवली या मह-त्वाच्या बातम्या! तेंच आजच्या 'मॉस्को डेली न्यूज'कडे पहा. आजचा नुसता 'मॉस्को डेली न्यूज' पाहिला तरी रशियन राष्ट्राच्या नसानसांतून नवचैतन्य कसें उसळतें आहे याचें प्रत्यंतर येतें. काल-आजच्या रशियन पत्रांतली मुख्य बातमी म्हणजे रशियन वैमानिकांनीं उत्तर ध्रुवावर मिळविलेला अपूर्व विजय आणि त्यांनीं तिथें केलेले परा-क्रम. इतर बातम्याहि मासलेवाईक आहेत. एका सोव्हिएट गणितज्ञाला रशियन सरकारनें दहा हजार रूबल्स बक्षीस दिले. गेलीं कित्येक शतकें जगांतल्या प्रख्यात गणितशास्त्रज्ञांना भंडावून सोडणारा एक प्रश्न त्यानें सोडवला म्हणे.

एका रशियन शास्त्रज्ञानें आइस्क्रीमची पॉवडर तयार केली आहे. खिशांतून पॉवडर घ्यावी आणि आइस्क्रीम खावेंसें वाटलें कीं अर्धा कप पाण्यांत थोडी पॉवडर टाकावी कीं झालें आइस्क्रीम तयार! ओडेसा येथील डॉ. फिलॉटॉव्ह यांनीं नुक्त्याच मेलेल्या माणसाच्या डोळ्याचे नस ( tissues ) आंधळ्या माणसाच्या डोळ्यांत बसवून त्याला दृष्टि आणण्याचें ऑपरेशन यशस्वी केलें! या आणि अशा आजच्या 'मॉस्को न्यूज' मधल्या कितीतरी बातम्या राष्ट्राच्या सर्वांगीण प्रगतीवर प्रकाश पाडतात. 'प्रवदा'च्या आजच्या अंकांत कामगारांना इषारा देण्यांत आला आहे, कीं 'काम-गारांनो, स्वतःच्या राष्ट्राची बढाई सांगण्याकरितां म्हणून शस्त्रास्त्रांच्या किंवा इतर कारखान्यांतलीं महत्वाचीं रहस्यें तुम्ही वाटेल त्याच्याजवळ बोलून जातां, पण परराष्ट्रांतील हेरांचें जाळें सोव्हिएट रशियांत पसरलें आहे हें लक्षांत ठेवा. मोठ्या सद्बुद्धीनें आत्मप्रौढी मिरवायला जाल, पण आपल्या राष्ट्राचा घात कराल!'

संध्याकाळीं सात वाजतां वाख्तांगॉव्ह थिएटरमध्यें सुप्रसिद्ध 'रोजिस्यूर' सिमॉनॉव्ह यानें बसवलेलें स्लाव्हिनचें 'Intervention' हें नाटक पाहा-

वयाला गेलों. क्रान्तीनंतर रशियांत यादवी चालू असतां स्वतःला 'राष्ट्रीय' समजणाऱ्या रशियांतल्या बोल्शेव्हिकविरोधी भांडवलदार वर्गानें परराष्ट्रांना आपल्या राष्ट्राचे लचके तोडावयाला कसें बोलावलें तें या नाटकांत दाखविलें आहे. साम्राज्यवादी फ्रेंच किंवा इंग्रज लोकांचें दास्यत्व पत्करलें, पण रशियन बोल्शेव्हिकांचें राज्य नको असें या 'राष्ट्रियांचें'मत होतें !

पहिल्याच देखाव्यांत ओडेसा बंदर फ्रेंच सैन्यानें घेतलें आहे आणि बंदरांत जिकडेतिकडे लाल, पांढऱ्या, निळ्या रंगांचे फ्रेंच झेंडे फडकत आहेत, असें दाखविलें होतें. बंदराचा देखावा कमालीचा हुबेहूब होता. दूर काळोखांत लाल, हिरवे–बोटींच्या डोलकाठ्यांवरचे दिवे लुकलुकत आहेत. बंदरांत नांगर टाकून उभ्या असलेल्या दोन आगबोटींचे भाग दिसत आहेत. धक्क्यावर पेट्या, दोरखंड वगैरे सामान पडलें आहे. फ्रेंच सोजिरांशीं रशियन अमीर–उमरावांच्या पोरी प्रणयचेष्टा करताहेत. फार काय, सर्वसंन्यास घेतलेल्या रशियन भिक्षुणी( Nuns )सुद्धा धर्मलंड बोल्शेव्हिकांच्या तावडींतून सोडवण्याकरितां हे फ्रेंच उद्धारकर्ते आले, म्हणून फ्रेंच सोजिरांच्या गळ्यांत गळा घालताहेत !

फ्रेंच सैनिकांत अली नांवाचा एक काळा सेनेगालीज सोजीर दाखवला होता. तो शेवटीं बोल्शेव्हिकाना मिळतो; पण नाटकांतले बोल्शेव्हिक शिपाई त्याला 'Chorni' 'Chorni' ( म्हणजे रशियन भाषेंत 'काळा अदमी ) म्हणून चिडवीत होते तें मला आवडलें नाहीं. त्याचप्रमाणें एके ठिकाणीं 'To them even Negro soldiers are preferable to Bolsheviks' हें एका बोल्शेव्हिकाच्या तोंडचें वाक्यहि मला कसेंसेंच वाटलें. कदाचित् मी 'काळा आदमी' आहें म्हणून मला तसें वाटलें असेल. पण बोल्शेव्हिक नाटककारानें अप्रत्यक्ष रीतीनें का होईना, पण काळ्या लोकांविषयीं अशी अनुदार वृत्ति प्रदर्शित करूं नये असें मला वाटतें.

नाटक संपल्यावर रात्रीं अकरा वाजतां मी हॉटेलांत परत आलों.

* * *

## ता. १० जून—

*—झाड एकच पण फळें दोन प्रकारचीं !—कम्युनिस्टांनीं हा विनोद जाणून केला आहे कीं चुकून ?*

मॉस्कोमधलें सुप्रसिद्ध 'पॉलिटेक्निक' पाहावयाला सकाळीं साडेदहा वाजतां निघालों.

सोव्हिएट सत्ता स्थापन झाल्यापासून आतांपर्यंत रशियाचा औद्योगिक क्षेत्रांत जो अपूर्व उत्कर्ष झाला आहे, त्याचें 'पॉलिटेक्निक' हें एक प्रचंड प्रदर्शन आहे म्हणा ना. या भव्य इमारतीच्या निरनिराळ्या दालनांत सोव्हिएट राष्ट्राची प्रगति दाखविणारीं चित्रें आणि 'मॉडेल्स' व्यवस्थित रीतीनें मांडून ठेवण्यांत आलीं आहेत. स्कँडिनेव्हियाच्या सरहद्दीपाशीं रशियाचा जो प्रांत आहे, तेथील जमिनींत विपुल फॉस्फरस आहे. तो काढण्याकरितां तिथें एक प्रचंड कारखाना काढण्यांत आला आहे. पूर्वीं जेमतेम चाळीस घरें असलेलें एक खेडें तिथें होतें. त्याच ठिकाणीं आतां चाळीस हजार वस्तीचें एक गजबजलेलें गांव झालें आहे. कांहीं वर्षांपूर्वीं ज्याचा खून झाला त्या किरॉव्ह या सुप्रसिद्ध बोल्शेव्हिकाचें नांव या गांवाला देण्यांत आलें आहे. त्याला किरॉव्हस्क म्हणतात.

रशियाच्या खेड्यापाड्यांतून विजेचा प्रसार करायचा हा लेनिनचा हट्ट होता. पंधरा वर्षांत रशियांत निदान तीस तरी विद्युदुत्पादक यंत्रें (Plants) झालीं पाहिजेत अशी लेनिनची योजना होती. कांहींतरीं अशक्य गोष्टी लेनिन बोलतो म्हणून स्वतःला शहाणे समजणारे बरेच लोक लेनिनला त्या वेळेला हंसले. पण तेव्हांपासून बारा वर्षांत अशीं बावन यंत्रें उभारण्यांत आलीं ! पंधरा वर्षें पुरीं झालीं तेव्हां पंचाण्णव यंत्रें काम करीत होतीं आणि यंदां असलीं दीडशें यंत्रें सबंध रशियाभर आहेत ! झारच्या वेळीं साऱ्या रशियांत तीस हजार टन तांब्याची पैदास होत असे; आतां अनेक तांब्याच्या खाणींपैकीं फक्त एका प्रसिद्ध तांब्याच्या खाणींतूनच एक लाख टन तांबें निघतें ! अमेरिकेंतला लूथर बरबँक हा जसा फळांच्या सृष्टींतला जादूगार

समजला जातो, तसाच रशियाचा प्रख्यात वनस्पतिशास्त्रज्ञ मिचुरिन् हा फळांचा प्रतिपरमेश्वर आहे. बरबँकनें बिनबियांचे पेरू निर्माण केले आहेत. मिचुरिन् तर त्याच्याहि पुढें गेला आहे ! एकाच झाडाला 'अॅशबेरी' आणि 'पेअर' हीं फळें आणण्याचे प्रयोग त्यानें शंभर टक्के यशस्वी केले आहेत. अशा एका झाडाचा नमुना 'पॉलिटेक्निक'मध्यें मीं प्रत्यक्ष पाहिला. एका फांदीला 'अॅशबेरी'चीं फळें लटकत होतीं, तर दुसऱ्या फांदीवर एक-दोन 'पेअर' होतीं !

दीड वाजतां 'पॉलिटेक्निक' पाहून मी परत आलों. परत येतांना कमालीच्या विषण्णतेनें माझें अंतःकरण भरून आलें. रशियाच्या डोळे दिपवून टाकणाऱ्या उत्कर्षाचें तें भव्य प्रदर्शन पाहून मला हेवा वाटला असें नव्हे; पण माझ्या गरीब हिंदुस्थानची मला अतिशय तीव्रतेनें आठवण झाली. माझा देशहि असाच अफाट आणि विस्तीर्ण आहे. आमची भूमीहि इतकीच किंवा याहूनहि सुपीक आहे. आणि तिची खनिज संपत्तीहि इतकीच विपुल आहे. मग या रशियन गाइडप्रमाणें आमच्या उत्कर्षाचीं अशीं रसभरित वर्णनें करण्याची संधि आम्हाला मिळणार तरी केव्हां ? ती केव्हांतरी मिळेलच अशी मला खात्री वाटते. पण रशियाचें हें वैभव पाहून तो विलंब मात्र मला आतां असह्य होतो.

दुपारीं अडीच वाजतां मॉस्कोमधलें परमेश्वर–विरोधी वस्तुसंग्रहालय ( Anti-God Museum ) पाहावला गेलों. पुष्किन स्क्वेअरमधल्या एका जुनाट वाड्यांत हें 'म्यूझियम्' आहे. पूर्वी हा वाडा रशियन 'नन्स'चें निवासस्थान होतें. डार्विनच्या उत्क्रान्तितत्त्वाप्रमाणें माकडापासून माणसा-पर्यंत मानवजातीची उत्क्रान्ति कशी झाली तें चित्ररूपानें एका दालनांत दाखविलें आहे. दुसऱ्या दालनांत मनुष्यप्राणी रानटी अवस्थेंत जनावरांची पूजा करीत असे त्याचीं कांहीं चित्रें आणि नमुने ठेवलेले आहेत. तिसऱ्या एका दालनांत प्राचीन इजिप्शियन लोकांची मृतपूजा दाखविण्याकरितां कांहीं 'ममी' ठेवल्या आहेत. वरच्या मजल्यावर मंगोल देवतांच्या अक्राळविक्राळ मूर्ति मांडून ठेवलेल्या आहेत. मात्र या मजल्यावर एक विनोदी घटना मला पाहावयाला मिळाली. मंगोल देवतेची एक पांढरी

मूर्ति एका बाजूला आहे आणि तिच्या शेजारच्याच कोपऱ्यांत सुंदर काळ्या दगडांत कोरलेला स्टालीनचा एक भव्य अर्धपुतळा आहे ! ' या मंगोल देवतांच्या घोळक्यांत हा देव कोण ? ' मी मनांत म्हणालों. या परमेश्वरविरोधी ' म्यूझियम 'मध्यें हा विनोद रशियन कम्युनिस्टांनीं जाणून-बुजून केला आहे कीं कम्युनिस्ट बहुधा गंभीर, विनोदशून्य प्रकृतीचे लोक असल्यामुळें त्यांच्या हातून हा विनोद चुकून झाला आहे ? कुणाला ठाऊक ?

संध्याकाळीं साडेसहा वाजतां मी आणि आमचा कॅनेडियन म्हातारा ' यूनिअन सिनेमा 'त ' Return of Maxim ' ही फिल्म पाहावयाला गेलों. तिकिटाला २ रुबल्स आणि ६० कोपेक म्हणजे जवळजवळ सव्वा रुपाया पडला. सध्यां ही फिल्म मॉस्कोंत अतिशय लोकप्रिय झाली आहे. मॉस्कोमधल्या दहाबारा सिनेमागृहांत हीच फिल्म चालू आहे. दुसऱ्या चारपांच थिएटरांत ' Arcen ' नांवाची एक फिल्म चालू आहे. एखादी फिल्म लोकप्रिय झाली कीं तीच बऱ्याचशा थिएटरांत दाखविण्यांत येते. जगांत सर्वश्रेष्ठ समजले जाणारे सुप्रसिद्ध रशियन दिग्दर्शक आयझेन्स्टाइन किंवा पुदॉव्हकिन् यांची एखादी फिल्म पाहावयाची मला अतिशय इच्छा होती; पण त्यांच्या फिल्म्स् सध्यां कुठेंच चालू नाहींत.

' Return of Maxim ' हीं अगदींच दुय्यम किंवा तिय्यम दर्जाची फिल्म मला वाटली. कुठल्याही सामान्य अमेरिकन किंवा इंग्लिश चित्र-पटापेक्षां ही कांही चांगली नव्हती. आयझेन्स्टाइन किंवा पुदॉव्हकिन यांच्या-मुळें रशियन चित्रपटकलेला जी कीर्ति मिळाली आहे त्या मानानें या फिल्म-मध्यें कांहींच तथ्य नव्हतें. आयझेन्स्टाइन आणि पुदॉव्हकिन यांना बाजूला सारून असल्या सामान्य कलाकृतींना सोव्हिएट सरकारनें उत्तेजन द्यावें ही आश्चर्याची गोष्ट आहे ! यूनियन थिएटरहि अगदींच सामान्य आहे. आपल्याकडे एखाद्या वाय. एम्. सी. ए.च्या हॉलमध्यें केव्हांकेव्हां फिल्म दाखवतात, तसाच थोडासा प्रकार इथें मला वाटला. ८–२० ला फिल्म संपली. मात्र दोन गोष्टी मला आवडल्या. जाहिराती दाखवल्या जात नाहींत आणि मध्येंच ' इंटर्व्हल ' देऊन विनाकारण रसभंग केला जात नाहीं.

आज मी खोलींत एकटाच आहें. मॅक्लॉव्ड आज रात्रींच्या गाडीनें लेनिनग्राडला गेला. आल्या मार्गानें पुन्हां लेनिनग्राडहून तो बोटीनें लंडनला जाणार. मी उद्यां रात्रीं मॉस्को सोडणार आणि रेल्वेने पोलंड-मधून जर्मनी आणि जर्मनींतून पॅरिसला जाणार.

* * *

ता. ११ जून –

–Mother and Children's Room.–*मुलांचें गांव* !

ब्रेकफास्टनंतर साडेदहा वाजतां मॉस्को रेल्वे स्टेशनवरील 'Mother and Children's Room' पाहावयाला आम्ही निघालों. वाटेंत लाल दगड आणि कांचा मिळून अत्यंत आधुनिक पद्धतीनें बांधलेल्या दोन मोठ्या थोरल्या सुंदर इमारती दिसल्या. त्यांपैकीं एक उद्योगधंद्याच्या मंत्र्याचें ऑफिस ( Commissariat of Light Industries ) आणि दुसरें शेतकी–खात्याचें ऑफिस ( Commissariat of Agriculture ) होतें असें गाइडकडून मला कळलें.

स्टेशनावर एक 'Mother and Children's Room' ठेवणें हें रशि-याचें एक वैशिष्ट्य आहे. दूरदूरच्या गांवाहून कामगारांच्या बायका मॉस्को शहर पहावयाला येतात, तेव्हां लहानलहान मुलांना बरोबर घेऊन फिरणें त्यांना शक्य नसतें. त्यांनीं आपलीं मुलें या 'रूम'मध्यें ठेवावीं आणि संध्याकाळीं परत जातांना घेऊन जावीं. इथें डॉक्टर–नर्सेसची वगैरे सुरेख व्यवस्था आहे. रूममध्यें शिरण्यापूर्वी आमच्यापैकीं प्रत्येकाला डॉक्टरलोक ऑपरेशन थिएटरमध्यें घालतात तसले पांढरे झगे घालावयाला देण्यांत आले. एका खोलींत एका गुटगुटीत पोराला एक नर्स आंघोळ घालीत होती. दुसऱ्या एका खोलींतल्या भिंतीवर पुष्किनच्या पुस्तकांतल्या परीकथांचीं चित्रें काढ-लेलीं होतीं आणि मुलांसाठीं नाना तऱ्हेचीं खेळणीं, चिमुकल्या खुर्च्या, चिमुकलीं टेबलें वगैरे वस्तु ठेवलेल्या होत्या. या खोलींत दहापंधरा मुलें खेळत होतीं. याच खोलींतल्या एका भिंतीवर स्टालिनचें एक मोठें थोरलें रंगीत चित्र होतें आणि त्याच्या अंगाखांद्यांवर मुलें खेळत आहेत असें दाखविलें होतें.

स्टेशनवरील ही 'रूम' पाहून झाल्यानंतर गांवांतला पाव तयार करण्याचा एक मोठा कारखाना ( Bread factory ) पाहावयाला आम्ही गेलों. कारखान्याच्या बाहेरल्या बाजूला 'डायरेक्टर'ची खोली होती. कारखाना पहावयाला आंत जाण्यापूर्वी तिथें त्यानें आम्हाला कारखान्याची एकंदर माहिती सांगितली. दिवसाला जवळजवळ अडीचशें टन पाव या कारखान्यांत तयार होतात. कामगाराला सरासरी महिना २२५ रूबल्स पगार मिळतो. 'स्टाखानोव्हाइट' कामगाराला बाराशे रूबल्सपर्यंत पगार मिळतो. एकंदर ७५० माणसें कारखान्यांत काम करीत आहेत. त्यांपैकीं साठ टक्के स्त्रिया आहेत. बायकांना बाळंतपणापूर्वी दोन महिने आणि नंतर आणखी दोन महिने अशी चार महिने भरपगारी रजा मिळते. एखाद्या कामगाराला एका खात्यांत काम करण्याचा कंटाळा आला तर त्याला दुसऱ्या खात्यांत बदली करून घेतां येते.

कारखाना पाहावयाला आंत शिरण्यापूर्वी आम्हांला 'बेकर'च्या पांढऱ्या टोप्या आणि पांढरे झगे देण्यांत आले. स्वच्छतेच्या दृष्टीनें ही काळजी घेण्यांत येते. सगळीं कामें यंत्रांनीं होतात. कणीक तिंबण्याकरितां एक प्रचंड पोलादी यंत्र आहे. एका मोठ्या थोरल्या 'Conveying machine' च्या पट्ट्यावरून एकएक पाव भट्टीकडे पुढें सरकतो आणि खरपूस भाजून घेण्याकरितां मिनिटभर भट्टीवर थांबून पुढें जातो !

दुपारीं अडीच वाजतां मॉस्कोंतलें एक कामगारांचें विश्रांतिस्थान ( Park of Rest and Culture ) पाहायला गेलों. 'Mother and Children's Room' प्रमाणेंच अशा 'पार्क्स' हेंहि एक रशियाचें वैशिष्ट्य आहे. एकट्या मॉस्को शहरांतच अशा तेवीस 'पार्क्स' आहेत. या पार्कमध्यें प्रवेश मिळण्याकरितां नांवाला थोडे पैसे देऊन तिकीट विकत घ्यावें लागतें.

या बागा मात्र खरोखरच भव्य आणि विस्तीर्ण आहेत. आंतमध्यें व्यायामाचीं साधनें, पोहण्यासाठीं तळीं, खाण्यापिण्याचीं आणि आइस्क्रीमचीं दुकानें सर्व कांहीं आहे. ठिकठिकाणीं सुंदर फुलझाडांचे ताटवे आणि मध्येमध्ये भव्य पुतळे आहेत.या प्रत्येक 'पार्क'मध्यें 'Children's Townlet' किंवा 'मुलांचें गांव' नांवाचा एक भाग असतो. मीं आज

' टाउनलेट 'च पहावयाचें ठरविलें आहे. या ' टाउनलेट 'च्या प्रवेश-द्वारावर स्टालिनचें भव्य चित्र आहे. स्टालिनच्या आवतीभोवतीं स्वच्छंद बागडणारीं मुलें काढलीं आहेत. दहा वर्षांच्या वरच्या मुलांना या ' टाउनलेट 'मध्यें यायचें असेल तर दहा कोपेकचें – किंवा एक आण्याचें म्हणा – तिकीट घ्यावें लागतें. दहा वर्षांखालच्या मुलांना प्रवेश फुकट आहे.

एका विभागांत कांहीं मुलें शिवणकाम शिकत होतीं. दुसऱ्या एका विभागांत प्लास्टरचे पुतळे करीत असलेलीं कांहीं मुलें बसलीं होतीं. एका छोट्या मुलानें खरोखर दोनतीन सुंदर लहान पुतळे तयार केले होते. इथें येऊन आपणांला आवडेल तें काम मुलांनीं शिकावें किंवा करावें. मुलांसाठीं एक लहानसें थिएटरसुद्धां इथें आहे. मुलेंच नाटकें बसवतात आणि या थिएटरमध्यें तीं करून दाखवतात. अर्थात् मोठीं माणसें त्यांना मदत करतात. पण मुलांना शक्य तितकें स्वातंत्र्य दिलें जातें. एके ठिकाणीं विमानें कशीं करतात तें विमानाचे सुटे भाग घेऊन तिथला एक मास्तर मुलांना समजावून देत होता. बागेंत ठिकठिकाणीं मोठमोठे फळे आहेत आणि त्यांवर तरतऱ्हेचीं रंगीत चित्रें लावलेलीं आहेत. या चित्रांत मुलांच्या बालिश जिज्ञासेला कांहींतरी विचित्र प्रश्न सुचतात त्यांचीं उत्तरें दिलेलीं असतात. एक प्रश्न असा दाखवला आहे, कीं अमेरिकेला बोटीनें किंवा विमानानें जायची काय जरूर आहे ?—पृथ्वी गरगर फिरते ना, मग विमानांतून खूप उंच आकाशांत जावें आणि पृथ्वी फिरतांफिरतां अमेरिकेचा भाग आपल्याखालीं आला कीं वरून सरळ खालीं उडी मारावी !

एक लहानसें तळें इथें आहे. त्यांत कितीतरी मुलें डुंबत होतीं, तर कुणी होड्या चालवीत होतीं. एक लहानशी वाफेची बोटसुद्धां या तळ्यांत आहे. तिचें एंजिन चालू करणें आणि ती चालवणें वगैरे कामें मुलेंच करतात. इथल्या कांहीं मुलांचे मीं फोटो घेतले.

एक उंच ' टॉवर ' आहे. त्याच्या वरच्या टोकावरून ' पॅराशूट ' घेऊन खालीं उडी मारण्याचें मुलांना शिक्षण देतात. ' पॅराशूट 'ला बांधून मुलांना खालीं ढकलून देतात. मात्र या ' पॅराशूट 'ला वरच्या बाजूला एक पोलादी तार असते. जर चुकून ' पॅराशूट ' उघडली गेली नाही, तर खालीं

आदळून मुलांचा कपाळमोक्ष होऊं नये म्हणून ही तार लावलेली असते. ती ताबडतोब मागें खेचून पडणाराला सावरतां येतें. पॅराशूट घेऊन उडी मारणाऱ्या एका मुलाचाहि मीं फोटो घेतला.

परत फिरतांना वाटेंत एके ठिकाणीं पांच-सहा चिमुकलीं मुलें ‘ कॉकेशियन ’ नाच करतांना दिसलीं. मध्यें एक मोठी मुलगी गात बसली होती आणि तिच्या भोवतीं फेर धरून हीं मुलें नाचत होतीं.

हें ‘ मुलांचें गांव ’ पाहून साडेसहा वाजतां मी हॉटेलांत परत आलों.

रात्रीं ११–५ च्या गाडीनें मी मॉस्को सोडणार. रात्रीं १०–१५ वाजतां ‘इंटूरिस्ट’चा एक मनुष्य मला मॉस्को स्टेशनवर घेऊन गेला आणि माझ्या जागेची आणि सामानसुमानाची त्यानें सर्व व्यवस्था केली. गाडी बरोबर ११–५ ला सुटली. जड अंतःकरणानें मॉस्कोचा आणि रशियाचा मीं निरोप घेतला. आतां पुन्हां केव्हां मी रशियाला येईन कुणाला ठाऊक !

* * *

# घराकडे –

## ता. १२ जून–

*‘जगांतील कामगारांनो, एक व्हा !’–गोष्टीवेल्हाळ आल्फ्रेड बानामन.*

झोंपून उठलों तेव्हां आठ वाजले होते. मॉस्कोहून निघतांना बरोबर घेतलेले सँडविचेस आणि संत्रीं खाल्लीं. दोन्ही बाजूला हिंदुस्थान-सारखीच दूरवर पसरलेली सपाट शेती जमीन आणि बर्चवुडचीं जंगलें दिसत आहेत. हिंदुस्थानसारखेंच प्रखर ऊन पडलें आहे आणि उष्माही तसाच होतो आहे. ११–३० वाजतां मिन्स्क स्टेशन आलें. बरोबर १२–४५ ला नेगोरेलोये स्टेशनांत गाडी शिरली. नेगोरेलोये येथें सोव्हिएट रशियाची सरहद्द संपते, आणि थोड्या अंतरावर पोलंडची हद्द सुरू होते. आतां सर्व सामान खालीं काढावें लागणार, आणि कसून कस्टमची तपा-सणी झाल्यानंतर पुन्हां सामान गाडींत चढवावयाचें. स्टेशनांतल्या स्टेश-नांत सामान खालीं स्टेशनच्या हॉलमध्यें नेऊन पुन्हां तें गाडींत ठेवावयाला रशियन हमाल अडीच रूबल्स म्हणजे सव्वा रुपया मागतो आहे. माझ्याकडचीं रशियन नाणीं मी केव्हांच संपवून टाकलीं आहेत. आणि सव्वा रुपया याला देण्याकरितां पौंडाची सबंध नोट मोडावयाची मला मुळींच इच्छा नाहीं; कारण उरलेले रशियन पैसे रशियन हद्द सोडल्या-बरोबर निरुपयोगी होणार आहेत. स्वावलंबी होण्याचा निश्चय करून माझ्या तीनही मोठ्या थोरल्या बॅगा मोठ्या प्रयासानें मी खालीं उतरल्या आणि कस्टम–हॉलमध्यें नेल्या. स्टेशनचा हॉल ऐसपैस आणि भव्य आहे. स्वच्छ पांढऱ्या चारी बाजूंच्या भिंतीवर इंग्लिश, फ्रेंच, जर्मन आणि रशियन भाषांत ‘जगांतील कामगारांनो, एक व्हा’ हीं अक्षरें ठळकपणें

चितारलीं आहेत. एका कोंपऱ्यांत लेनिनचा अर्धपुतळा आहे आणि दुसऱ्या कोंपऱ्यांत स्टालिनचा आहे. खुष्कीच्या मार्गानें रशियांत शिरणाऱ्या प्रवाशानें सरहद्दीवरल्या या स्टेशनांत पाऊल टाकल्याबरोबर आपण कामगारांच्या राज्यांत आलों आहोंत याची हा हॉल पाहिल्याबरोबर त्याला खात्री पटेल.

२ वाजतां आमच्या गाडीनें नेगोरेलोये सोडलें. गाडी पांच दहा फूट गेली नसेल तों एक उंच खांब दृष्टीला पडला. त्यावर विळाकोयत्याचें चिन्ह होतें. या खांबापासून पांच दहा फुटांच्या अंतरावर दुसरा खांब होता. त्यावर गरुडाचें चिन्ह होतें. या खांबापासून पोलंडची हद्द सुरु झाली. २–३० वाजतां स्टॉल्पची या पोलंडच्या सरहद्द–स्टेशनांत गाडी उभी राहिली. अर्धा तास झाला नाहीं तों आतां पुन्हां सामान उतरावयाचें आणि पोलिश कस्टम अधिकाऱ्याकडून पुन्हां बॅगांतल्या सर्व वस्तूंची उलथापालथ! आतां मात्र सामान त्याच गाडींत पुन्हां चढवावयाचें नाहीं. बर्लीन–पॅरीसला जाणाऱ्या इंटरनॅशनल एक्सप्रेसमध्यें आतां बसावयाचें.

स्टॉल्पची स्टेशनांतलें भव्य उपाहारगृह पाहून माझ्या पोटांत कोकलत असलेले कावळे अधिकच ओरडूं लागले. एका जेवणाकरतां सबंध पौंड मोडून पोलिश पैसे घ्यावयाचें माझ्या जिवावर आलें. पण सुदैवानें माझ्याकडे कांहीं अमेरिकन डॉलरच्या नोटा आहेत. स्टेशनांतल्या 'मनी–एक्सचेंज' ऑफिसांतून एका डॉलरचे पोलिश पैसे मी घेतले. स्लॉटे आणि ग्रॉशे अशीं पोलिश नाणीं आहेत. शंभर ग्रॉशेंचा एक स्लॉटे. एका डॉलरचे ५ स्लॉटे आणि २० ग्रॉशे माझ्या हातांत आले. दोन कप कॉफी आणि कांहीं सँडविचेस् मी उपाहारगृहांत घेतले. त्याची किंमत मला २ स्लॉटे द्यावी लागली. तोंड धुण्याकरतां स्नानगृहांत गेलों. तिथें एका पोलिश छोकऱ्यानें मोठ्या अदबीनें साबू आणि स्वच्छ टॉवेल दिला. पण तेवढ्याकरतां मला २० ग्रॉशे मोजून द्यावे लागले!

मॉस्कोहून माझ्याच गाडींतून आलेल्या त्या दोन मध्यमवयस्क अमेरिकन स्त्रिया माझ्याच टेबलावर कॉफी घेत आहेत. त्यांच्यापैकीं एक डॉक्टरीण आहे. आपला नवराही डॉक्टर असून आयुर्वेदाच्या अभ्यासा-

करतां कांहीं वर्षांपूर्वी तो हिंदुस्थानांत येऊन गेला म्हणून तिनें मला सांगितलें. रवींद्रनाथ टागोरांचा शास्त्री नांवाचा कुणी नातेवाईक आपल्या नवऱ्याचा मित्र असल्याचें ती सांगत होती. अगदीं गबाळ कपडे केलेला एक म्हातारा झेक् गृहस्थही स्टॉल्पचीपर्यंत माझ्या डब्यांत होता. तो वॉर्सावरून प्रागला जात आहे. माझ्याबरोबर थोडें थोडें इंग्लिश तो बोलत होता तें ऐकून मी चीत झालों. इंग्लिश भाषेची इतकी कत्तल उडवतां येते याची मला कल्पनाही नव्हती !

इंटरनॅशनल एक्सप्रेस पलीकडल्या प्लॅटफॉर्मवर उभी आहे. चार चार माणसांचे दोन बांक असलेला तिसऱ्या वर्गाचा एक सबंध कंपार्टमेंट मोकळा आहे. आपल्याकडल्या दुसऱ्या वर्गाच्या डब्यापेक्षांही स्वच्छ आणि सोयीस्कर या गाडीचे डबे आहेत. उद्यां सकाळीं बर्लीनला पोहोंचेपर्यंत एक रात्र मला या डब्यांत काढावयाची आहे. गर्दी न होतां हे बाक असेच रिकामे राहिले तर रात्रीं झोंपायची चांगलीच चैन होईल. थोड्या वेळानें किडकिडित खप्पड चेहेऱ्याचा असा एक पंचवीस सव्वीस वर्षांचा तरुण एक फाटकी तुटकी बॅग घेऊन माझ्या डब्यांत येऊन समोरच्याच बांकावर बसला. सुदैवानें त्याला संभाषण चालू ठेवण्याइतकें मोडकेतोडकें इंग्लिश येतें आहे. तो जर्मन आहे. त्याचें नांव आल्फ्रेड् बानामन्. थोड्या वेळानें गाडी सुटली. त्यापूर्वी एक गंमत झाली. गाडी स्टॉल्पची स्टेशनांत शिरली तेव्हां माझ्या घड्याळांत २–३० वाजले होते; पण स्टेशनाच्या घड्याळांत पहातों तों १२–३० च ! आतां घड्याळें पुन्हां २ तास मागें करावयाचीं. रशियाहून पुन्हां युरोपला आम्ही मागें चाललों आहोंत !

आल्फ्रेड बानामन् चांगलाच गोष्टीवेल्हाळ पोरगा आहे. रशियांत सहा वर्षे बांधकाम खात्यांतला कामगार म्हणून काम करून तो जर्मनीला परत जातो आहे हें ऐकून त्याच्या गोष्टी ऐकण्याची मला फारच उत्सुकता आहे. रशियांत सहा वर्षे राहूनही रशियाबद्दल त्याचें चांगलेंसें मत दिसत नाहीं. रशिया जर इतका तुला आवडत नाहीं तर रशियांत राह्यलास कशाला, म्हणून मी त्याला विचारलें, तेव्हां एका रशियन मुलीशीं लग्न केल्याचें त्यानें मला सांगितलें. त्याचा सासरा एक जमीन-मालक



युरिट्स्की चौंक आणि विंटर पॅलेस, लेनिनग्रॅड.

पृ. १३१



जगांतील अत्युच्च इमारत, पॅलेस ऑफ सोव्हिएट्स्, मॉस्को.

पृ. १३६

(Kulak) आहे, आणि सध्यां तो सैबेरियांत खडी फोडतो आहे! आपणांशीं लग्न केल्यामुळें त्याची मुलगी बचावली, बानामन् म्हणतो. त्याच्या बायकोला त्याच्याबरोबर जर्मनींत यावयाची परवानगी मिळाली नाहीं. घरीं पोहोंचल्यावर तिला जर्मनीचा पासपोर्ट मिळवण्याची आपण खटपट करणार आहोंत, तो म्हणतो. एक वर्षाचें एक लहान मूलही त्याला आहे. उपरोधिक स्वरांत तो मला विचारतो, "मॉस्कोमधील मोठमोठे कारखाने आणि नव्या इमारती तुम्हाला दाखवल्या असतील. होय ना? कामगारांच्या चाळी पाहिलात का? एका एका खोलींत चारचार माणसं कोंबलेलीं असतात. आमच्या जर्मनींतल्या कामगारांची स्थिती वाईटच आहे, पण मी म्हणतों त्यापेक्षांही रशियांतल्या कामगारांची स्थिती वाईट आहे." त्याच्या स्वरांत भलताच कडवटपणा होता.

"तुला किती पगार मिळत होता?" मी विचारलें.

"चांगला ३०० रूबल्स पगार मला मिळत होता, पण करायचाय काय?" तो म्हणाला.

"म्हणजे?"

"म्हणजे काय!" तो बोलूं लागला, "माझ्या छोट्या मुलीकरतां दिवसाला एक लिटर दूध लागे त्याला दीड रूबल द्यावा लागे. म्हणजे महिन्याचे ५० रूबल्स गेले त्यांतच. महिन्याला साधारणपणें १००० रूबल्स ज्यांना पगार मिळतो त्यांनाच जेमतेम सुखानें रशियांत रहातां येतें. रशियांत पदार्थांच्या किंमती भरमसाट आहेत. ही झाली शहरांची स्थिती, आंतमध्यें खेड्यापाड्यांत तर बघायलाच नको!"

राजकारणावर त्याला बोलायला लावायचा मी प्रयत्न केला, पण तो धूर्त पोरगा उत्तरें द्यायचें मोठ्या शिताफीनें टाळूं लागला. गाडींत अतिशय उकडत होतें.

"काय, भयंकर उकाडा हा!" बानामन् म्हणाला.

"हें कांहींच नाहीं," मी म्हणालों, "आमच्या हिंदुस्थानांत नेहमींच उकडतं."

"का हो, तुम्हांला इंग्लिश लोक आवडतात का?" त्यानें मला विचारलें.

" चांगलेच आवडतात. " मी म्हणालों, " त्यांचं राज्य मात्र आवडत नाहीं ! "

राजकारणासंबंधीं बोलायचें तो टाळीत होता; पण रशियापाशीं केवढा तरी अवाढव्य प्रदेश आणि भरपूर कच्चा माल आहे; आणि जर्मनीजवळ मात्र कांहीं नाहीं, एवढें सांगावयाला तो चुकला नाहीं.

" युद्ध नक्की होणार. " तो म्हणाला.

" तसं झालं तर फार वाईट होईल. " मी मुद्दाम म्हणालों.

त्यावर त्यानें उत्तरच दिलें नाहीं.

रात्रीं ९ च्या सुमाराला वॉर्सा–ईस्ट स्टेशनांत गाडी उभी राहिली. पोलंडची राजधानी वॉर्सा (–पोलिश भाषेंत वारझावा–) शहरांत दोन स्टेशनें आहेत. वॉर्सा शहर विस्तुला नदीच्या दोन कांठावर वसलें आहे. दुसऱ्या कांठावर मुख्य वॉर्सा स्टेशन आहे. आणखी एक तासानें म्हणजे १० वाजतां या स्टेशनांत गाडी आली. हें स्टेशन अतिशय भव्य आणि सुंदर आहे. स्टेशनांतल्या दिव्यांच्या खांबाभोंवतीं रंगीबेरंगी फुलांच्या वेली लावलेल्या आहेत. वॉर्सा स्टेशनांत उतरून इकडेतिकडे पाहिल्याबरोबर माझ्या डोळ्यांना खूपच बरें वाटलें. मॉस्कोमधले गबाळे कपडे घातलेले स्त्री-पुरुष पाहून कंटाळलेल्या मनाला सुटसुटीत कपडे घालून इकडून तिकडे फिरणाऱ्या या सुंदर पोलिश स्त्रिया पाहून एकदम उल्हास वाटतो.

रात्रीं हातपाय पसरून गाडींत झोंपण्याच्या माझ्या आशा मात्र वॉर्सा स्टेशनांत धुळीला मिळाल्या. दोन तीन गलेलठ्ठ पोल आमच्या डब्यांत शिरले आणि समोरच्या बांकावर बसले. त्यापैकीं एक ठेंगणासा पोल सुंदर इंग्लिश बोलूं शकतो. त्याचा अमेरिकेशीं व्यापार असून तो अनेक वेळां अमेरिकेला जाऊन आला आहे. बोलतां बोलतां तो मला म्हणाला, " तुमचं वय काय ? "

मी म्हटलें, " आहे तीस एकतीस वर्षें. "

" माझी थट्टा करतां काय ? " तो मोठ्यांदा हंसून म्हणाला, " वीस वर्षांपेक्षां एक दिवसही तुमचं वय अधिक असेल यावर माझा विश्वास बसत नाहीं ! "

हा अनुभव मात्र मला नवीन नाहीं. युरोपांत फिरतांना दोनतीनदां असाच प्रकार झाला आहे. मॉस्कोमध्यें आमच्या हॉटेलांतली एक म्हातारी अमेरिकन बाई अठरा वर्षांपेक्षां माझें वय अधिक असल्यास वाटेल तें हरावयाला तयार झाली होती!

रात्रीं १२ वाजतां त्या तीन पोलिश गृहस्थांपैकीं दोघेजण एका स्टेशनांत उतरून गेले. मी माझें गरम पांघरूण बाहेर काढलें आणि झोंपावयाचा प्रयत्न करूं लागलों. ३ च्या सुमारास पोझान स्टेशन आलें. हें पोलिश–जर्मन सरहद्दीवरलें स्टेशन आहे. आतां जर्मन सरहद्द सुरू होणार. सामानाची तपासणी, पैशांची तपासणी वगैरे सर्व तपासण्या इथें झाल्या. ४·३० वाजतां जर्मन सरहद्दींतलें न्यू ब्यूथेन स्टेशन आलें. जर्मनींत खर्चाला लागतील म्हणून एक पौंडाची नोट मोडून मी १२ जर्मन मार्क्स घेतले. जर्मन कस्टम अधिकाऱ्यांकडून मी रशियांतून आलेला असल्यामुळें माझी कसून झडती होणार, अशी क्षणाक्षणाला मी अपेक्षा करीत होतों. पण कांहींच झालें नाहीं. त्यानें पासपोर्ट पाहिला, माझें पॅरीसचें तिकीट पाहिलें आणि तो निघून गेला. बानामनचा पासपोर्ट पाहून मात्र त्याला सामानासह त्यानें खालीं उतरावयाला लावलें. कां? तो जर्मन म्हणून? एवढंसं तोंड करून बानामन्‌नें मला 'गुड्‌बाय्' केला, आणि त्या अधिकाऱ्याबरोबर तो निघून गेला. गाडी ५–१५ ला सुटली. बिचारा बानामन्! आपली आई आणि भाऊ बर्लीनमधल्या शार्लोटन्‌बर्ग–स्टेशनांत आपणाला भेटावयाला आले असतील हें केवढ्या आशेनें आणि आतुरतेनें तो सांगत होता!

* * *

## ता. १३ जून १९३७–

*किती सुंदर आहे बर्लिन!–बर्लिनचें माथेरान!–आणि मी म्हणे रशियाचा माहितगार!*

बानामन् निघून गेला; आणि गाडी चालूं झाली. जर्मन सरहद्दीवर माझ्या सामानांची तपासणी झाली नाहीं हें पाहून मी आश्चर्यचकित झालों. मॉस्कोहून मी सरळ बर्लीनला येत असल्यामुळें तर रशियाहून

येणाऱ्या माणसाची जर्मन कस्टम अधिकाऱ्यांकडून कशी आणि काय भयंकर तपासणी होईल, याचीं भयंकर चित्रें मी मनांत रंगवून ठेवलीं होतीं. पण जर्मनीनें माझी चांगलीच फजिती करावयाचें ठरविलें होतें असें दिसतें ! तिकीट तपासणाऱ्यानें माझें तिकीट पाहिलें, आणि मला एक शब्दही न विचारतां तो पुढें निघून गेला. माझें तिकिट पॅरिस-पर्यंतचें होतें; आणि तें दोन महिनेपर्यंत चालणारें असल्यामुळें मी मध्येंच उतरून बर्लिनमध्यें कांहीं दिवस रहावयाचें ठरविलें होतें. मी जर्मनींत उतरणार नाहीं या समजुतीनें तर मला सोडून देण्यांत आलें नसावें ना ? पण मग पोलंडच्या हद्दीवर एवढी कसून तपासणी कां झाली ? रशियाहून निघतांना आपणाला जर्मनींतून जावयाचें आहे म्हणून मारे बॅगमध्यें हें पुस्तक नको, ते कागद नकोत असा कडेकोट बंदोबस्त मी केला होता. पण मारामारी करण्याच्या उद्देशानें एखाद्याच्या घरीं आपण तावातावानें जावें आणि त्यानें हंसत हंसत आपलें स्वागत करून चहाचा कप पुढें करावा तसें माझें झालें ! जर्मन फॅसिस्टानीं माझी भलतीच निराशा केली.

७ वाजतां फ्रँकफुर्ट ( ओडर ) स्टेशन आलें. ७-४०ला बर्लिन-मधलेंच श्लायशर-बार्नॉफ् स्टेशन. मॉस्कोहून निघण्यापूर्वीं बर्लिनमध्यें मुंबईचे प्रख्यात नेत्रवैद्य डॉ. सरदेसाई यांचे चिरंजीव श्री. शरत्कुमार सरदेसाई आहेत त्यांना मी पत्र लिहून फ्रेडरिक्स्ट्रास स्टेशनवर उतरतों असें लिहिलें आहे. आणखी २० मिनिटांनीं फ्रेडरिक्स्ट्रास स्टेशन येणार. भाषा येत नसल्यामुळें युरोपमधल्या कुठल्याही नवीन स्टेशनांत उतरावयाचें असलें, कीं एक प्रकारच्या बालिश भीतीनें माझ्या काळजांत धडकी भरते. कस्टम अधिकाऱ्याशीं काय बोलावयाचें ?–आणि हमालाला काय सांगायचें ! फ्रेडरिक् स्ट्रास जवळ येऊं लागलें तशी माझी भीती वाढत चालली ! सरदेसाई स्टेशनवर आले असतील कीं नाहीं ? बरोबर ८ ला गाडी फ्रेडरिक् स्ट्रास स्टेशनांत शिरली. हिरवीं कुडतीं घातलेले जर्मन हमाल डब्यांत शिरून सामान उतरूं लागले. प्लॅटफॉर्मवर सरदेसाई आलेले पाहून माझा जीव खालीं पडला.

सरहद्दीवर नाहीं झाली तरी आतां बर्लीन स्टेशनांतून बाहेर पडतांना माझी कसून कस्टम-तपासणी होणार म्हणून छाती घट्ट करून मी पुढें

चालूं लागलों. पण कांहीं नाहीं. हमाल सामान घेऊन बाहेर पडला, आणि त्याच्यामागून मी बाहेर पडलों! माझ्या बॅगवरच्या मॉस्को-लेनिनग्राड या लाल काळ्या लेबलाकडे कुणी ढुंकूनसुद्धां पाहिलें नाहीं. बाहेर सरदेसाई यांची मोटर उभी होती. तिच्यांत हमालानें सामान ठेवलें. हमालाला १ मार्क ४० फेनिंग्ज, म्हणजे जवळ जवळ दीड रुपया द्यावा लागला.

बर्लीनच्या मैलच्या मैल लांब, स्वच्छ सुंदर रस्त्यांवरून आमची मोटर चालली आहे. दोन्ही बाजूंना हिरवीगार, दाट झाडी आणि भव्य, सुंदर इमारती दिसत आहेत. पलीकडे दाट जंगलासारखें कांहीं तरी दिसतें आहे. कैसरची शिकार करण्याची ही बाग. पहिल्याच दृष्टिभेटीला बर्लिन शहरावर मी मोहित झालों. मिलान, लंडन किंवा पॅरीसप्रमाणें धुरकट, मळकट बर्लिन शहर दिसत नाहीं. रस्त्यांतून फिरणाऱ्या जर्मन लोकांचे कपडेही प्रेक्षणीय आहेत. आजूबाजूला बहरलेल्या वसंतऋतूला शोभतील अशाच रंगाचे कपडे बहुतेक लोकांच्या अंगावर दिसत आहेत. फिकट हिरव्या किंवा फिकट निळ्या रंगाच्या छटा असलेल्या गरम कापडांच्या सुटांचाच अधिक सुळसुळाट दिसतो. स्त्रियांच्या फ्रॉक्सवर रंगीबेरंगी फुलांच्या आकृती दिसतात. जणूं काय हिरव्या छटांचे सूट घातलेले पुरुष हे पालवलेले वृक्षराज आणि त्यांना बिलगून चालणाऱ्या स्त्रिया या मोहरलेल्या फुलवेली!. हॅट, शर्ट, टाय इत्यादिकांची मनोहर रंगसंगती बहुतेकांनीं आपल्या कपड्यांत साधली आहे. जर्मन पुरुष किंचित् ठेंगू आणि स्थूल वाटतात; पण जर्मन स्त्रिया मात्र मला उंच आणि बांधेसूद वाटल्या. जर्मन स्त्रियांचें सौंदर्य तकलादी नाजूकपणाचें सौंदर्य वाटत नाहीं, तर निरोगी भरदारपणाचें वाटतें. बर्लीनमधल्या इमारतींविषयींही मी हेंच म्हणेन. त्यांत बारीक बारीक कलाकुसरीचें काम दिसत नाहीं; पण एक प्रकारच्या भरदार भव्यतेमुळें त्या सुंदर दिसतात. बहुतेक इमारतींच्या सज्जांत हिरवीगार रोपटीं आणि फुलझाडें दिसलीं. लंडनमध्यें असतांना पांढऱ्या शुभ्र मोहरानें आच्छादलेलीं चिमुकलीं 'चेरी'चीं झाडें पाहून युरोपमध्यें वसंतऋतू चालू आहे याची मला आठवण होत होती. हिंदुस्थानसारख्याच उष्ण, धुळकट मॉस्को शहरांत ही गोष्ट मी पार

विसरून गेलों होतों. बर्लीनमध्यें प्रवेश केल्यावर आजूबाजूचें सृष्टि-सौंदर्यच नव्हे, तर स्त्रीपुरुषांचे रंगदार कपडेलत्ते पाहून वसंतऋतूची मला पुन्हा तीव्र जाणीव झाली. एक मजेदार योगायोग असा कीं मीहि आज बर्लिनमध्यें प्रवेश करतांना हिरव्या रंगाचा शर्ट आणि हिरवाच टाय घातला आहे ! पण कलात्मक रंगसंगतीचें श्रेय मात्र मी मुळींच घेऊं इच्छित नाहीं. कारण सकाळीं गाडींत कपडे बदलतांना हा शर्ट माझ्या हातीं आला इतकेंच !

कुर्फ्यूर्स्टन्डाम् या बर्लिनमधल्या एका मोठ्या थोरल्या रस्त्या-वरल्या हॉटेल झो–एक् नांवाच्या हॉटेलमध्यें श्री.सरदेसाई यांनीं माझ्यासाठीं एक खोली ठरवून ठेवली आहे. टेलीफोन, थंड व गरम पाणी, इत्यादि सोयी असलेली एक स्वतंत्र खोली आणि सकाळचा ब्रेकफास्ट मिळून दिवशीं जवळ जवळ साडेचार मार्क म्हणजे साडेचार रुपयेच म्हणा, मला द्याव-याचे आहेत. हॉटेलचा तरुण जर्मन मॅनेजर आणि इतर नोकरचाकर यांची वागणूक मला अत्यंत मित्रभावाची आणि सौजन्यपूर्ण वाटली. आज बर्लीन-मध्यें अतिशय उकडतं आहे. इतकं कीं, श्री.सरदेसाई यांनीं हिंदुस्थानांत आम्ही वापरतों तसला पातळ चायना सिल्कचा सूट घातला आहे. असला रेशमी सूट यूरोपमध्यें कधींच कुणी वापरीत नाहीं म्हटलं तरी चालेल. मात्र मॉस्को-पेक्षां बर्लीनमध्यें मला थंड वाटतें. ‘सुवर्णमंदिर’ या चित्रपटांत नायकाचें काम केलेले माझे मित्र श्री. बाबूराव मणेरीकर हे बर्लीनमध्यें आहेत, आणि ते स्टेशनवर मला भेटण्याकरतां येणार होते म्हणून श्री. सरदेसाई यांनीं मला सांगितलं. श्री. सरदेसाई यांनीं माझ्याच हॉटेलमध्यें माझ्याबरोबर ब्रेकफास्ट घेतला; आणि उल्हांड्स्ट्रासवरील सरदेसाई यांच्या खोलीवर जायला आम्ही बाहेर पडलों. श्री. सरदेसाई एका जर्मन कुटुंबांत एक खोली घेऊन रहातात. त्यांच्याकडे ‘डेली टेलिग्राफ’ वगैरे बरीचशीं इंग्रजी पत्रें मला वाचावयाला मिळालीं. गेले कित्येक दिवस इंग्लिश वृत्तपत्र हातांत न पडल्यामुळें अधाशासारखीं मी तीं वाचून काढलीं. नंतर सरदेसायां-बरोबर बर्लीनमधल्या इंडियन स्टूडन्टस् ॲसोसिएशनमध्यें मी गेलों. तिथें कांहीं हिंदी वृत्तपत्रें वाचलीं, आणि थोडा वेळ पिंगपॉंग खेळून ११·३०च्या सुमारास मी माझ्या हॉटेलमध्यें परत आलों. दुपारीं ४ वाजतां सरदेसाई आपली ‘ओपेल्’ गाडी घेऊन आले. बर्लिनच्या जवळच कांहीं

मैलांवर असलेल्या शिल्ड्हॉर्न् झी नांवाच्या रम्य स्थलाकडे जाण्याचें आम्ही ठरविलें. बर्लीन-हॅम्बुर्ग रस्त्यानें आम्ही जात आहोंत. मैलच्या मैल सरळ, सपाट, तुळतुळीत असलेल्या या रस्त्याकडे पहात रहावेंसें वाटतें. किती स्वच्छ आणि आंखीव हे रस्ते आहेत! मोटरच्या चाकावरचे हात सोडून देऊन कांहीं वेळ स्वस्थ बसलें तरी हरकत नाहीं. इतका सरळ मैलच्या मैल हा रस्ता आहे. हिटलरनें बांधलेले हे ऑटोबान्स् किंवा मोटारींचे खास रस्ते. जागतिक ऑलिम्पिक् खेळ बर्लिनमध्यें झालें तेव्हां त्या प्रसंगा-करतां खास बांधलेला ऑलिंपिक् स्टेडियम् वाटेंत दिसला. तो पहाण्या-करतां आम्ही खालीं उतरलों. या स्टेडियमचें भव्य पण साधें असें जाती-वंत जर्मन शिल्पकाम पहाण्यासारखें आहे. आतां मोठा रस्ता सोडून दोन्ही बाजूंना टेकड्या आणि दाट झाडी असलेल्या रस्त्यांवरून आम्ही जात आहोंत. शिल्डहॉर्नला पोहोंचलों तेव्हां गर्द झाडी आणि डोंगरदऱ्या असलेल्या खंडाळा किंवा लोणावळ्यासारख्या जागीं आल्यासारखें मला वाटलें. आणि ही रम्य जागा बर्लीनपासून सारी सहा मैलावर असून बर्लीन शहराचाच एक भाग आहे म्हणा ना. शेंकडो मोटारी, मोटारसायकली आणि बाय-सिकल्स बाहेर रस्त्यावर उभ्या आहेत. आज रविवार असल्यामुळें हजारो जर्मन लोक बायकामुलांसह वनविहार करण्याकरतां इथें आले आहेत. समोर पसरलेल्या अफाट तळ्यांत रंगीबेरंगी पोहण्याचे कपडे घातलेले स्त्री-पुरुष पोहत आहेत; कुणी वॉटर-पोलो खेळत आहेत, तर कुणी चिमुकलीं शुभ्र—सफेत शिडें लावलेल्या लहान लहान होड्या घेऊन फिरत आहेत. लहान लहान मोटरबोट्स्सुद्धां पाण्यावर फिरत आहेत. तळ्याच्या कांठाशींच एक चिमुकलें हॉटेल आहे. उंच, हिरव्यागार वृक्षांच्या छायेंत आजूबाजूच्या वनश्रीला शोभतील अशाच अकृत्रिम रंगाचीं टेबलें आणि खुर्च्या ठेवलेल्या आहेत. पोहण्याच्याच कपड्यांत बसून कुणी बीर घेत आहेत, तर कुणी कॉफी घेत आहेत. एवढे लोक इथें जमले आहेत, पण कागदाचा एक कपटासुद्धां खालीं पडूं देऊन केरकचरा किंवा घाण होऊं देत नाहींत; घराहून येतांना कित्येक लोकांनीं खाण्याचे पदार्थ कागदांत बांधून आणले आहेत, आणि इथें बसून मजेंत खातपीत आहेत. पण खाऊन झाल्याबरोबर कागद कचरा गुंडाळून घेऊन जवळच झाडांना लावलेल्या तारेच्या पिंजऱ्यांत तो टाकण्याची प्रत्येक जण

बिनचूक काळजी घेतो आहे. जर्मन लोकांची जगप्रसिद्ध स्वच्छता, टापटीप आणि शिस्त ती हीच.

कॉफी आणि केक्स् आम्ही मागवले. जर्मन वेटर लोकांची सौजन्यपूर्ण वागणूक आणि चट्पट् काम करण्याची पद्धत पाहून मला खूपच बरें वाटलें. नुकताच मी मॉस्कोहून आलों होतों. आणि रशियन वेटरांचा बावळटपणा आणि घसमुसळेपणा माझ्या डोक्यांतून अजून गेला नव्हता. राहून राहून एक कल्पना माझ्या डोक्यांत येते आणि मला कसेंसेंच वाटतें. कम्यूनिस्ट रशियाचा मी मित्र आणि फॅसिस्ट जर्मनीचा मी शत्रू ! पण हे जर्मन लोक मला रशियनांपेक्षां किती आवडतात! राजकीय आवडीनिवडीवरून आम्ही एखाद्या देशासंबंधीं किंवा तिथल्या लोकांसंबंधीं कांहीं तरी कल्पना मनांत बांधून ठेवतों. पण प्रत्यक्ष हाडामांसाचीं माणसें पाहिलीं म्हणजे स्वतःच्या मूर्खपणाचें हंसूं येतें. पुस्तकें आणि वर्तमानपत्रें वाचून जर्मन म्हणजे लष्करी बाण्याचे, क्रूर, हडेलहप्पी लोक अशी कल्पना मी केली होती. पण हे बिचारे गरीब, सुस्वभावी, हंसतखेळत फिरणारे जर्मन स्त्रीपुरुष पाहून मला कसेंसेंच वाटलें. ६–३० च्या सुमारास आम्ही परत फिरलों. रस्त्यावरल्या जर्मन पोलिसाचे कपडे आणि टोपी मला मोठी मजेदार वाटली. हिरव्या रंगाचे गरम कपडे आणि आपल्या इकडल्या बंबवाल्यासारखें उंच शिरस्त्राण आणि त्यावर सोनेरी रंगाचा तारा !

'डेली टेलिग्राफ'चे कांहीं अंक मी सरदेसायांकडून माझ्या हॉटेलमध्यें घेऊन आलों होतों. झोंपण्यापूर्वी ते चाळीत असतां एक मजेदार बातमी मी वाचली. स्टालीनची आई वारल्याची आणि रशियांतल्या सुप्रसिद्ध डॉक्टर पिएतेव्हच्या खटल्याची ती बातमी होती. या महत्वाच्या घडामोडी मी मॉस्कोंत असतांना घडल्या होत्या. पण मला त्यांची दादही नव्हती. त्या मला आज पांच सहा दिवसांनीं इंग्लिश वृत्तपत्र वाचल्यानंतर कळता-हेत ! त्या वेळेला मी मॉस्कोंत असूनही माझ्या पुण्या मुंबईकडल्या मित्रांना मुंबई टाईम्समधल्या रॉयटरच्या तारा वाचून त्या खालीनें माझ्या आधीं कित्येक दिवस, म्हणजे घडल्यानंतर दुसऱ्याच दिवशीं कळल्या असल्या पाहिजेत ! आणि मी रशियाहून जाऊन आल्यामुळें रशियन, घडामोडी-संबंधीं लोक मला मोठा अधिकारी माहीतगार समजणार ! एखाद्या देशाची

भाषा न येतां आपण त्या देशांतून घाईघाईनें फिरतों तेव्हां खरोखरच त्या देशासंबंधीं आपणाला कांहीं समजतें का ?

* * *

## ता. १४ जून १९३७

Gebt mier fier yahr zeit !

आज ब्रेकफास्टनंतर सहज फिरत होतों. बर्लीनच्या लांब, रुंद सुंदर रस्त्यावर नुसतेंच भटकत फिरावयालासुद्धां मजा वाटते. रस्त्यावरचीं निरनिराळीं कॅफे मोठीं छानदार दिसतात. अशा तऱ्हेचीं कॅफे इंग्लंडमध्यें दिसत नाहींत. हिरव्या, पिवळ्या, निळ्या, लाल रंगाच्या कापडाचीं त्यांचीं छपरें रस्त्यांवर आलेलीं आहेत. आणि त्या खालीं तसल्याच चित्रविचित्र रंगाच्या खुर्च्याटेबलांवर बसून लोक खातपीत आहेत. फुटपाथवरच्या खुर्च्याटेबलांवर बसून रस्त्यावरची मजा पहात खाण्यापिण्याची पद्धत इंग्लंडमध्यें नाहीं.

दुपारीं १ वाजतां बाबूराव मणेरीकर मला भेटावयाला आले. त्यांच्याबरोबर ‘ हिंदुस्थान हाऊस ’ नांवाच्या बर्लीनमध्यें एका बंगाली गृहस्थानें चालवलेल्या हॉटेलमध्यें जेवायला गेलों. मटन्, पुरी आणि भात खावयाला मिळाला. नंतर बसमध्यें बसून बर्लीनमधल्या प्रख्यात उंटर डन लिंडन या रस्त्यावरल्या ‘ थॉमस् कुक् ’ कंपनीच्या ऑफिसांत गेलों. प्रवाशांना स्वस्त दरानें मिळणारे रजिस्टर्ड मार्क्स मला घ्यावयाचे होते. जर्मनींत येणाऱ्या प्रवाशानें जर्मनीबाहेर हे खरेदी करावयाचे असतात. जर्मनींतच हे मिळत नाहींत. पण मी रशियांतून इथें आलों. आणि रशियांत कुक् कंपनीचें ऑफिस नसल्यामुळें मला ते विकत घेतां आले नाहींत. जर्मनींत पौंडाला १२ मार्क मिळतात. तेच प्रवाशानें बाहेर घेतले तर २४ किंवा २५ मिळतात. म्हणजे निम्मे खर्चांत प्रवाशाला जर्मनींत रहातां येतें. जर्मनींतल्या जर्मनींत तुम्हाला आतां रजिस्टर्ड मार्क मिळणार नाहींत म्हणून कुक्च्या ऑफिसांत मला सांगण्यांत आलें. पण कसेंही करून रजिस्टर्ड मार्क मिळवण्याची मी धडपड करणार आहे. कुकच्या ऑफिसमधून ‘ डॉयश् बँक’मध्यें चवकशी करावयाला आम्ही गेलों. माझा पासपोर्ट दाखवून

मी खराखुरा प्रवासी आहे हें मी त्यांना सांगितलें. त्यांनीं उद्यां बोलावलें आहे. पाहूं या काय होतें तें. बसमधून परत येतांना कांहीं खेडवळ जर्मन स्त्रीपुरुष बर्लीन पहावयाला आलेले रस्त्यांत दिसले. शेंपन्नास गुंड्या असलेले त्यांचे रंगीबेरंगी शर्ट आणि तुमानी मजेदार होत्या.

हिटलर हात पुढें करून बोलतो आहे अशा तऱ्हेचें सुंदर चित्र असलेले पोस्टर्स रस्त्यावर जिकडे तिकडे भिंतींना लावलेले दिसत आहेत. या पोस्टरखालीं 'Gebt mier fier yahr zeit' अशीं अक्षरें आहेत. Give me four years' time' या नांवाचें प्रदर्शन बर्लीनमध्यें भरलें आहे, त्यांच्या या भित्तिपत्रिका आहेत. चार वर्षांत आपण जर्मनीची केवढी सुधारणा केली, आणि पुढच्या चार वर्षांत काय करणार आहोंत हें दाखवण्याकरतां हिटलरनें हें प्रदर्शन उघडलें आहे.

* * *

## ता. १५ जून १९३७–

*एरसाट्स् सूट*—Let us go for honeymoon !!

बर्लीनच्या रस्त्यावरून फिरतांना लाल, पिवळे, हिरवे बारीक बारीक ठिपके असलेल्या निळ्या रंगाच्या गरम कपड्यांचा एक सुंदर सूट मी पाहिला होता. मी आणि बाबूराव मणेरीकर तो विकत घेण्यासाठीं आंत गेलों. 'एरसाट्झ्' लोंकरीचा तो होता. 'एरसाट्झ्' (Ersatz) म्हणजे कृत्रिम लोंकरीचा. ही लोंकर मेंढ्यांच्या अंगावरची नसून झाडाच्या सालीचे धागे काढून बनवण्यांत येते. जर्मनींत या 'एरझाट्झ्' वस्तूंचें अलिकडे फारच बंड माजलें आहे. 'एरझाट्झ्' लोंकर. 'एरझाट्झ्' पेट्रोल. बाहेरचें कांहीं घ्यायचें नाहीं; शक्य त्या सर्व वस्तू देशांतल्या देशांत तयार करावयाच्या या नादानें या 'एरझाट्झ्' चिजा तयार करण्यांत येत आहेत. 'एरसाट्झ' हा एक थट्टेचा विषय झाला आहे. या सूटची किंमत ९० मार्क्स, म्हणजे ९० रुपयांपेक्षां थोडी ज्यास्तच. खऱ्या लोंकरीचा सूटही इंग्लंडमध्यें कमी किंमतींत मिळाला असता. पण मला तो फारच आवडला होता. आणि जर्मनीची एक आठवण म्हणूनही हा 'एरझाट्स' सूट विकत घ्यायचें मी ठरवलें.

दुपारीं १ वाजतां आम्ही डॉयश बँकेंत गेलों. साडेतीन मार्क तारेकरतां मी खर्च केले तर जर्मन सरहद्दीच्या जवळच असलेल्या काटोविच या पोलिश शहरांतल्या डॉयश बँकेच्या शाखेला तुझ्यासाठीं रजिस्टर्ड मार्क विकत घ्यायला लावूं. आणि चारपांच तासांत तारेचें उत्तर आल्याबरोबर तुला ते इथें देऊं, असें डॉयश बँकेच्या मॅनेजरनें मला सांगितलें. मी साडेतीन मार्क ताबडतोब देऊन टाकले. रजिस्टर्ड मार्क हातीं आले, कीं नव्वद मार्क्स किंमतीचा सूट मला पन्नाससाठ मार्क्समध्यें विकत घेतां येईल. डॉयश बँकेच्या अधिकाऱ्यांचे मी मनापासून आभार मानले.

बँकेंतून बाहेर पडल्यावर बर्लीनमधल्या एका शाकाहारी (Vegetarian) हॉटेलांत दुपारच्या जेवणाकरतां गेलों. अशीं किती तरी शाकाहारी दुकानें बर्लीनमध्यें आहेत. भाजीपाल्याचे स्वच्छ, चवदार पदार्थ इथें खायला मिळतात. या दुकानांत शेंकडो जर्मन लोक जेवण घ्यायला आलेले दिसले. जेवण झाल्यावर इंडियन स्टूडंट्स् ॲसोसिएशनमध्यें पिंगपाँग खेळण्याकरतां आम्ही गेलों. वाटेंत बाबूरावांची एक जर्मन–ज्यू मैत्रिण फ्रोलाईन् स्टेन् हिला बरोबर घेतली. साडेपांच वाजेपर्यंत ॲसोसिएशनच्या हॉलमध्येंच आम्ही होतों. खेळल्यानंतर आम्ही चहा घेत बसलों असतां मिसेस पॉमरे नांवाच्या एका अमेरिकन बाईची आणि मिसेस गांगुली नांवाच्या एका बंगाली बाईची ओळख झाली. मिसेस गांगुलीबरोबर तिथें बसलेली एक जर्मन मुलगी अस्खलित बंगाली भाषेत बोलतांना पाहून मला आश्चर्य वाटलें. नंतर मला कळलें, कीं ती मुलगी कलकत्ता विश्वविद्यालयांत कांहीं वर्षें शिकत होती.

ता. १२ आणि १४ जूनचे ' लंडन टाईम्स'चे अंक मला वाचावयास मिळाले. त्यांत सुप्रसिद्ध रशियन सेनापती मार्शल तुखाचेव्हस्की आणि आठ इतर लष्करी अधिकारी यांना जर्मनी आणि जपानच्या हेरखात्याशीं संधान बांधल्यांच्या आरोपावरून गोळ्या घालून ठार करण्यांत आल्याची बातमी वाचली. हा प्रकार ता. १० किंवा ११ रोजीं, म्हणजे मी मॉस्कोंत असतांनाच झाला असावा आणि मला त्याची दादही नव्हती !

रात्रीं ८ वाजतां हिंदुस्थान हाऊसमध्यें जेवायला गेलों असतां तिथें रहात असलेल्या मि. रेड्डी नांवाच्या एका हिंदी विद्यार्थ्यांचा एक अमे-

रिकन् मित्र बॉबी आणि त्याची जर्मन मैत्रीण मिस क्रॅकनबुर्गर यांची ओळख झाली. बॉबीला हिंदुस्थान हाऊसमधलें जेवण फार आवडतें. 'I like mangoes, chutneys and kabobs !', तो म्हणतो !

रात्रीं १० वाजतां मी, बाबूराव, फ्रोलाईन स्टेन्, मि. रेड्डी आणि कुतुब नांवाचा आणखी एक मित्र मिळून बर्लीनमधल्या प्रख्यात 'फेमिना' नांवाच्या डान्स हॉलमध्यें गेलों. दुसऱ्या टेबलावर बसलेल्या मुलीला 'माझ्याबरोबर नाचतेस का?' म्हणून विचारण्याकरतां चिठ्ठी पाठवावयाची असेल, तर आपल्या टेबलाला तिच्या टेबलाशीं जोडणाऱ्या नळींतून हवेच्या दाबानें बसल्या टेबलावरून चिठ्ठी पाठवण्याची व्यवस्था या हॉलमध्यें आहे ! सर्व टेबलें परस्परांना अशा नळ्यांनीं जोडलेलीं आहेत. आम्ही गप्पा करीत असतां फॅसिस्ट पद्धतीचा खाकी शर्ट घातलेला एक पोऱ्या तिथं आला, आणि कसल्या तरी लॉटरीचीं तिकिटें विकत घ्या म्हणून आग्रह करूं लागला. आम्ही मजेनें एक तिकिट विकत घेणार होतों, पण पायाचा आंगठा दाबून 'घेऊं नका' म्हणून स्टेननें आम्हाला दटावलें. आम्हीं तिकीट घेतलें नाहीं. फॅसिस्ट पक्षाच्या मदतीसाठीं अशा नानातऱ्हेच्या सोडती हिटलरनें काढल्या आहेत, ती म्हणाली. आमच्या हातून चुकून फॅसिस्टांना मदत होत होती हें ज्यू रक्त अंगांत सळसळणाऱ्या फ्रोलाईन स्टेनला कसें सहन होईल ? फ्रोलाईनला इंग्लिश चांगलें येतें, पण केव्हां केव्हां ती भयंकर चुका करते. 'Let us go for a picnic !' असें म्हणण्याऐवजीं एकदां 'Let us go for honeymoon !' ती म्हणाली.

* * *

## ता. १६ जून १९३७—

आज दुपारीं शाकाहारी हॉटेलांत जेवण घेत असतां अचानकपणें माझे मुंबईचे एक मित्र मि. नीतिसेन लोटवाला यांची गांठ पडली. तिथेंच मिसेस आर्ते यांची ओळख झाली. श्री. झवेरी नांवाचे एक वृद्ध, गुजराथी गृहस्थ लोटवाला यांच्या ओळखीचे आहेत. त्यांना लोटवाला यांच्या मोटरमध्यें घेऊन आज रात्रीं बर्लिनमध्यें आम्ही खूप फिरलों.

* * *

## ता. १७ जून १९३७–

माझ्या हॉटेलमध्यें मी दिवशीं साडेचार मार्क देतों आहे. पण आमच्या हिंदी विद्यार्थ्यांच्या ॲसोसिएशनमध्यें दिवशीं दीड मार्कनें पाहुण्यांना खोली देतात. तेव्हां हॉटेलमधून चंबुगवाळें गुंडाळून आज मी ॲसोसिएशनमध्यें रहावयाला गेलों.

* * *

## ता. १८ जून १९३७–

ॲसोसिएशनमध्यें कांहीं कांहीं मजेदार गोष्टी आहेत. भिंतीवर '१० मे १८५७, हिंदी स्वातंत्र्ययुद्ध' या नांवाचा एक मोठा थोरला नकाशा मोठ्या अभिमानानें लावण्यांत आला आहे. इथें येणारे विद्यार्थी ख्रिश्चन असोत, हिंदु असोत, कीं मुसलमान असोत, आपली जात धर्म सर्व कांहीं विसरून आपण हिंदुस्थानी आहोंत या एकाच भावनेनें प्रेरित झालेले मला दिसले. संस्थेचे सेक्रेटरी मि. मेनेझीस् मोठे उद्योगी आणि मनमिळाऊ आहेत.

* * *

## ता. १९ जून १९३७–

रात्रींच्या गाडीनें मी पॅरीसला जावयाला निघणार. दुपारीं बाबूरावांच्या बरोबर फिरत असतां श्री. केणी हे इंजीनियरींगचा अभ्यास करण्याकरतां आलेले गोव्याकडले गृहस्थ रस्त्यांत भेटले. संध्याकाळीं ५–३० वाजतां मी, बाबूराव, श्री. सरदेसाई आणि मिस् स्टेन् माझ्या आवडत्या शिल्डहॉर्न्‌ला गेलों. ही जागा मला फारच आवडली आहे. शिल्डहॉर्न्‌जवळच्या एका टेकडीवरून फिरत असतां खाकी शर्ट आणि दंडाला लाल स्वस्तिक चिन्हाचा फडका बांधलेले 'हिटलर यूथ' ( Hitler Youth ) पथकांतले कांहीं तरुण वाटेंत भेटले. मोठे मजबूत आणि आनंदी दिसले. बर्लीनमध्यें रोज संध्याकाळीं बहुधा कॅफे कॉश्‌विट्झ् या दुकानांत मी जेवण घेत असें. कॉशविट्झचा मॅनेजर हर रिचर्ड डिएट्रिच् याची आणि माझी बरीच दोस्ती जमली होती. दुकानांत कितीही गर्दी

असली तरी मी आणि सरदेसाई आलों, कीं डिएट्रिच् आमच्याकडे येऊन गप्पा करीत बसत असे, आणि आम्हांला काय हवें नको तें विचारीत असे. गुटगुटीत, चर्चिलसारख्या चेहऱ्याचा रिचर्ड डिएट्रिच् मोठा सुस्वभावी जर्मन आहे. मी आज जाणार हें कळल्यावर पॅरिसला पोहोंचल्यावर आपणाला पत्र धाडावयाला विसरूं नकोस, म्हणून त्यानें मला बजावून सांगितलें. पोस्टाचीं तिकिटें जमविण्याचा आपणाला नाद आहे आणि तूं पॅरीसहून पत्र धाडलेंस म्हणजे एका फ्रेंच स्टॅंपाची माझ्या संग्रहांत भर पडेल, तो म्हणाला !

रात्रीं ११–१५ ला मी स्टेशनांत गेलों. ११–४७ ला गाडी सुटली. गाडींत अतोनात गर्दी आहे. डब्याच्या बाजूच्या जाण्यायेण्याच्या रस्त्यांतच मला उभें रहावें लागलें. सबंध रात्र असें उभें राहूनच काढावी लागणार कीं काय ? माझ्याबरोबरच युनिफॉर्ममध्यें असलेले कांहीं तरुण जर्मन लष्करी अधिकारी आणि वैमानिक अधिकारीही उभे आहेत. पाहूं या पुढल्या स्टेशनावर जागा होते का ! स्टेशनावर बाबूराव, मिस् स्टेन् आणि सरदेसाई मला पोहोंचवावयाला आले होते.

* * *

## ता. २० जून १९३७–

*फेल्टहॅटची चापटपोळी !–आमचें जर्मन–इंग्रजींतील भांडण !*

बर्लीन–पॅरीस गाडींत अतिशय गर्दी असल्यामुळें डब्यांतल्या जाण्यायेण्याच्या रस्त्यांत ११–४७ला गाडी सुटल्यापासून ते १ वाजेपर्यंत मला उभें रहावें लागलें. माझ्याबरोबर बरेचसे जर्मन उतारूही उभे होते. त्यांपैकीं कांहीं लष्करी आणि वैमानिक अधिकारी आहेत. निळसर रंगाच्या युनिफॉर्ममध्यें ते मोठे रुबाबदार दिसत आहेत. १ वाजतां माझ्या समोरच्या आठ जणांच्या कंपार्टमेंटमधला एक उतारू खालीं उतरला आणि मला जागा मिळाली. माझी बॅग वरच्या सामान ठेवावयाच्या रॅकवर ठेवतांना तिथें अगोदरच एका जर्मन उतारूनें ठेवलेल्या त्याच्या फेल्टहॅटवर मी ती ठेवली. फेल्टहॅटची अगदीं चापटपोळी झाली ! घाबऱ्या घुबऱ्या उठून त्यानें जेव्हां ती बाहेर काढली तेव्हां तो भयंकर रागावणार असें

मला वाटलें. पण त्या हॅटची दशा पाहून कंपार्टमेंटमधेल सर्व उतारू हंसूं लागले. त्यांच्याबरोबर तोही हंसला. मी इंग्रजींत 'सॉरी' 'सॉरी' म्हणत होतों. तें त्याला कळलें कीं नाहीं कुणाला ठाऊक, पण माझ्याकडे बघून तो हंसला, आणि चुरगळलेली हॅट नीट करून तो खालीं बसला. हे जर्मन लोक मला मोठे सुस्वभावी वाटले.

रात्रीचे ३ वाजले आहेत. आमच्यापैकीं प्रत्येकजण अंगाभोंवतीं ओव्हरकोट गुंडाळून घेऊन जागच्या जागीं बसल्या बसल्या डुलक्या घेतो आहे. बरोबर ३ वाजतां हॅनोव्हर स्टेशन आलें. ६ वाजतां डार्टमंड स्टेशन. ६–३०ला एसन्. जगप्रसिद्ध क्रप्चा लोखंडाचा कारखाना याच गांवीं आहे. एसन् नांव पाहिल्याबरोबर मला क्रपच्या कारखान्याची आठवण झाली. स्टेशनांतूनच क्रपच्या कारखान्याची प्रचंड धुराडीं दृष्टीला पडतात. ९–३०ला आखन् स्टेशन आलें. येथें जर्मन सरहद्द संपून पुढें बेल्जियन सरहद्द सुरू होते. येथें गाडी बदलून पॅरीसला जाणाऱ्या १०–३० वाजतां सुटणाऱ्या गाडींत मला बसावयाचें आहे. आतां फ्रान्समध्यें जायचें म्हणून सर्व जर्मन नाणीं संपवून टाकून थोडीशीं फ्रेंच नाणीं मी खिशांत घेऊन ठेवलीं आहेत. पण मला कॉफी प्यायची अतिशय इच्छा झाली आहे. आणि आखन स्टेशनांत कॉफी प्यायची म्हणजे जर्मन पैसे दिले पाहिजेत. शेवटीं स्टेशनावरल्या एक्सचेंज् ऑफिसमध्यें ८ फ्रॅंक देऊन त्याचे ७२ जर्मन फेनिग्ज मी घेतले. एक कप कॉफीला ३० फेनिग्ज मला द्यावे लागले. उरलेले ४२ फेनिग्ज म्हणजे अदमासें सातआठ आणे माझ्या दोन बॅग्ज एका प्लॅटफॉर्मवरून दुसऱ्या प्लॅटफॉर्मवर उभ्या असलेल्या गाडींत नेऊन ठेवणाऱ्या जर्मन हमालाला द्यावे असा मी पोक्त विचार केला होता. मुंबईत बॅग उचलणाऱ्या हमालाला दोन आणे दिले कीं अगदीं डोक्यावरून पाणी गेलें असें समजणाऱ्या माझ्यासारख्याला येथल्या हमालाला सात आठ आणे देणें म्हणजे अगदीं खैरात वाटत होती. पण गाडींत माझ्या दोन बॅग्ज उचलून ठेवणारा जर्मन हमाल 'आयने मार्क झेन् फेनिग्ज'पेक्षां एक छदामही कमी घेईना! 'आयने मार्क झेन् फेनिग्ज' म्हणजे एक मार्क दहा फेनिग्ज—म्हणजे जवळ जवळ सव्वा रुपया! हमालासाठीं पौंडाची नोट मोडून जर्मन पैसे घेणें म्हणजे उरलेले दहा अकरा रुपये फुकट घालवण्यासारखें होतें. कारण जर्मन सरहद्द ओलांडली कीं जर्मन

मार्क फ्रेंच नाण्यांत बदलून मिळत नाहींत. बेचाळीस फेनिग्जपेक्षां कांहीं एक अधिक मिळणार नाहीं म्हणून मी त्याच्याशीं हुज्जत घालूं लागलों. मी मोठमोठ्यानें इंग्रजींत बोलत होतों आणि तो जर्मन भाषेंत ओरडत होता. अर्थात् तोंडानें मी उगाच बोलत होतों. जें काय म्हणायचें तें मी सांगत होतों खुणांनींच. तो जोरानें अंगविक्षेप करून धमक्या देत होता कीं शिव्या देत होता कुणाला ठाऊक, पण त्यानें आवाज चढवला कीं त्याच्यापेक्षां मोठा आवाज करून मी इंग्रजींत बोलत होतों! हें चमत्कारिक भांडण पाहून तिथून जाणारी एक उंच, हाडकुळी अशी मुलगी पुढें आली, आणि मोडक्या तोडक्या इंग्रजींत काय भानगड आहे, म्हणून मला विचारूं लागली. फाटकेतुटके कां होईनात पण इंग्रजी शब्द ऐकून मला किती तरी बरें वाटलें. मी माझी अडचण तिला सांगितली. तिनें ताबडतोब आपली मनीबॅग उघडली आणि सत्तर फेनिग्ज काढून त्या हमालाच्या हातावर ठेवले. मी म्हटलें, तुमचे पैसे मी परत फेडूं कसे? माझ्याकडे जर्मन नाणीं कांहीं नाहींत. माझ्या खिशांत असलेलीं कांहीं इंग्लिश नाणीं मी तिला देऊं लागलों. ती नको नको म्हणत होती. मीहीं पॅरीसलाच जातें आहे, तिथें फ्रेंच नाणीं तुम्ही मला द्या म्हणजे झालें, असें ती मला सांगत होती. मी कॉफी पीत असतां पलीकडच्या टेबलावर बसून ती कॉफी पीत होती. आमचें बोलणें चाललें आहे तोंच कॉफीगृहांतून बाहेर आलेला एक वीसपंचवीस वर्षांचा तरुण तिथून जात होता तो आमच्याजवळ थांबला, आणि माझ्याकडे बघून थट्टेखोर आवाजांत स्वच्छ इंग्रजींत म्हणाला, "जाऊं द्या हो. कशाला देता पैसे? तरुणतरुणी एके ठिकाणीं कॉफी प्यालीं तर नेहेमीं पुरुषानेंच पैसे दिले पाहिजेत असें थोडेंच आहे? एखादे वेळीं बाईनें दिले तर काय झालं?" त्याला वाटलं, आम्ही एके ठिकाणीं कॉफी प्यालों, आणि तिनें बिल चुकतें केलें म्हणून पैसे परत घेण्याचा मी तिला आग्रह करतों आहे! मी कसले पैसे तिला परत देतों आहे हें त्याला सांगितलें. तेव्हां तो हंसला आणि म्हणाला, "असं काय?" त्यानें स्वतः होऊन आपली ओळख करून दिली. बर्लीनमधल्या स्विस् टूरीस्ट ऑफिसमध्यें तो नोकरीला होता. तो स्वतः स्विट्झर्लंडचाच रहिवासी. तीन दिवसांची रजा घेऊन पॅरिसमध्यें असलेल्या आपल्या प्रेयसीला भेटायला तो जात होता. मोठा चुणचुणीत

आणि बोलका पोरगा होता तो! आपले मिस्कील डोळे माझ्यावर रोखून तो म्हणाला, "बर्लिनमध्यें किंवा पॅरीसमध्यें तुमची एखादी पोरगी—एखादं लफडं आहे कीं नाहीं?"

"छे बुवा, मला कुठं आहे लफडीं करायला वेळ!" मी म्हणालों, "मी हा असा रशियांतून जर्मनी आणि जर्मनीहून फ्रान्स असा फिरतों आहे!" माझ्यासारख्या अजिबात वेगळ्या रंगाच्या आणि वेगळ्या तोंडवळ्याच्या माणसाची कांहीं तरी निमित्त काढून ओळख करून घेण्याची या निरनिराळ्या देशांतल्या युरोपियन प्रवाशांची धडपड पहाण्याचा हा कांहीं माझा पहिलाच प्रसंग नव्हता. त्या जर्मन हमालाच्या तडाक्यांतून मला सोडवणारी ती भली उंच, हाडकुळी मुलगी लॅटव्हियन् होती. लॅटव्हियाची राजधानी रिगा येथील एका सुताच्या गिरणींत ती कामाला होती. काम करून साठवलेल्या पैशानें एक महिन्याची रजा घेऊन जर्मनी, फ्रान्स वगैरे देश पहावयाला ती बाहेर पडली होती. लॅटव्हियाचा इंग्लंडशीं लोणी, चीज इत्यादि पदार्थांचा फार मोठा व्यापार चालतो, आणि लॅटव्हियामधील सर्व शाळांतून दुसरी भाषा म्हणून इंग्रजीचें शिक्षण सक्तीचें आहे. म्हणूनच तिला थोडें बहुत इंग्रजी येत होतें. आमची तिघांचीही चांगली गट्टी जमली आणि एकाच कंपार्टमेंटमध्यें आम्ही तिघें बसलों. आतां पॅरिसपर्यंत प्रवास मजेचा होणार. गाडी बरोबर १०-३०ला सुटली.

त्या स्विस् तरुणाच्या गप्पा फारच मनोरंजक होत्या. स्पॅनिश सरकार आणि बंडखोर फ्रँको यांच्यामध्यें तो स्पॅनिश लोकसत्ताक सरकारच्या बाजूचा होता. "आपला देवावर वगैरे कांहीं विश्वास नाहीं, आपण चर्चमध्यें कधींच जात नाहीं." तो म्हणाला. "बर्लीनमध्यें तुम्ही बरेच दिवस आहां—जर्मनीचा तुमचा अनुभव काय?" मी विचारलें.

"खरं सांगूं? या जर्मन लोकांना दररोज कांहीं तरी नवीन खळबळ उडवून देणारी गोष्ट (New sensation) पाहिजे!" तो म्हणाला, "आणि हिटलर त्यांना कांहींना कांहीं तरी नवीन गोष्ट नेहेमीं देतोच आहे. 'मला आणखी चार वर्षें द्या!' म्हणून सध्यां बर्लीनमध्यें चालू असलेलें प्रदर्शन तुम्हीं पाह्यलंच असेल? कांहीं ना कांहीं तरी काढून लोकांना

झुलवीत ठेवलें पाहिजे ना हिटलरला ! तुम्हाला रशिया कसा काय वाटला हो ? मला रशियाला जायची फार इच्छा आहे."

त्यांच्या गप्पा चालूच होत्या. हिंदुस्थानांत माझा वर्तमानपत्राशीं संबंध आहे हें कळल्याबरोबर तो मोठ्यांदा हंसला आणि म्हणाला, "अरे बापरे, हें मला तुम्ही अगोदरच सांगायला पाहिजे होतं ! मात्र आतां मेहेरबानी करून तुमच्या वर्तमानपत्रांत एवढं मात्र लिहूं नका, कीं बर्लीन–पॅरिसच्या माझ्या प्रवासांत मला एक छानदार लेटिश पोरगी आणि एक बेअकली स्विस् पोरगा भेटला म्हणून !" स्वतःला बेअकली (Fool) म्हणून तो स्वतःच मोठ्यानें हंसला. "नाहीं तर असं लिहा," तो म्हणाला, "लॅटव्हिया, स्वित्झर्लंड आणि हिंदुस्थान यांची एक त्रिराष्ट्र परिषद्, बर्लीन–पॅरीस एक्सप्रेसमध्यें भरली होती !"

मी हिंदुस्थानी आहे, हें कळण्यापूर्वीं त्या लेटिश् मुलीनें मात्र माझ्यासंबंधीं भलत्याच कल्पना करून घेतल्या होत्या. "तुम्ही कुठल्या देशांतले ?" तिनें मला विचारलें.

"तुमची काय कल्पना आहे ?" मी उलट विचारलें.

"मला वाटतं–मला वाटतं," ती चांचरत चांचरत म्हणाली, "तुम्ही स्पॅनिश असाल, पण नाहींच. हो, सांगूं ? तुम्ही नक्की तुर्क आहांत !"

"कशावरून मी नक्की तुर्क आहे ?" मी हंसत म्हणालों.

"तुमच्या हाताचीं बोटं पहाना किती लांब लांब आहेत !" ती म्हणाली.

"वा ! म्हणजे तुर्कांना लांब बोटं असतात वाटतं ?" मी म्हणालों.

मी हिंदुस्थानी आहे, हें कळल्याबरोबर ती आश्चर्यचकित झाली. "हिंदुस्थानी (Indian) लोक असे असतात ?" ती कमालीच्या आश्चर्यानें उद्गारली. तिनें हिंदुस्थानविषयीं भूगोलांत बरेंचसें वाचलें होतें, असें दिसलें. "तुमचा हिमालय पर्वत अगदीं खूप उंच–जगांत उंच आहे, नाहीं !" ती म्हणाली, "तुमच्या मुंबईतून तो तुम्हांला दिसतो कां हो ?"

"तुमच्या लॅटव्हियांतून आल्प्स् दिसण्याचा जितका संभव आहे तितकाच हिमालय आम्हांला मुंबईतून दिसेल !" मी म्हणालों.

"म्हणजे ?" ती म्हणाली, "तुमची मुंबई हिंदुस्थानांतच आहे ना ?"

"आमचा हिंदुस्थान म्हणजे तुमचा लॅटव्हिया किंवा यांचा स्वित्झर्लंड समजतां कीं काय तुम्ही? तुमचे पन्नास लॅटव्हिया आणि शंभर स्वित्झर्लंड माझ्या हिंदुस्थानच्या एका कोंपऱ्यांत मावतील!" मी जरा छाती पुढें काढून अभिमानानें म्हणालों.

दुपारीं १२ वाजतां लीज् हें बेल्जियन् स्टेशन आलें. गेल्या महायुद्धांत हें लीज् जर्मन सैन्यानें उध्वस्त करून टाकलें होतें. महायुद्धानंतर बांधलेलें एक भव्य, सुंदर चर्च स्टेशनांतून दिसत होतें. आतां आमची गाडी बेल्जियम्‌मधून चालली आहे. दोन्ही बाजूंना दिसणारी बेल्जियन् वनश्री नमुनेदार आहे. डोंगर टेंकड्यांवर लहानशीं, टुमदार बेल्जियन घरें दिसत आहेत. बऱ्याचशा बेल्जियन घरांचा विशेष म्हणजे आपल्या इकडे जुन्या पेशवाई वाड्यांना जशा नक्षीदार खिडक्या असतात तशा खिडक्या इथें मला दिसतात; आणि खिडक्यांच्या चौकटींना लाल रंग दिलेला आढळतो. कित्येक खिडक्यांतून बेल्जियम्‌चा काळ्या, पिवळ्या, लाल रंगाचा राष्ट्रीय झेंडा फडकतांना दिसतो आहे.

१–३० वाजतां ज्यूमॉं या फ्रेंच सरहद्दीवरल्या स्टेशनांत आमची गाडी शिरली. आतां बेल्जियन् सरहद्द संपून फ्रान्स देश सुरू होणार. आमच्या गाडीच्या पहिल्या आणि दुसऱ्या वर्गाच्या डब्यांना एक वेगळें इंजिन लावण्यांत आलें, आणि तें ताबडतोब पॅरीसच्या दिशेनें चालू झालें. आम्हां तिसऱ्या वर्गाच्या उतारूंना मात्र विनाकारण इथें तास दीड तास रखडावें लागणार. तिसऱ्या वर्गाच्या उतारूंना मुद्दाम असें रखडवण्यांत फ्रेंच रेल्वे कंपनीचा काय हेतू आहे कळत नाहीं. फ्रान्सच्या 'स्वातंत्र्य, समता आणि बंधुता'–वाल्या लोकशाहीचा फ्रान्सच्या सरहद्दीवर पाऊल ठेवतों न ठेवतों तों हा चांगलाच अनुभव आला म्हणायचा!

काल रात्रीं बर्लीन सोडल्यापासून एक कप कॉफीशिवाय माझ्या पोटांत कांहीं एक गेलेलें नाहीं. मधल्या कुठल्याही स्टेशनावर चांगलासा खाण्याचा पदार्थ कांहींसुद्धां विकावयाला आला नाहीं. एखाद्या स्टेशनांत उतरून कांहीं खाण्याइतका वेळही मिळाला नाहीं. भुकेनें आणि प्रवासाच्या श्रमानें मी अगदीं गळून गेलों आहे. एका स्टेशनांत त्या स्विस् मुलानें दोन तीन ॲपल्स विकत घेतलीं. पण एक ॲपल खाऊन पोटांत कोकलणारे कावळे

थोडेच शांत होणार ? माझी कल्पना होती पॅरीस दुपारीं एकदोन वाजतां येणार. पण ४–३० वाजले तरी अजून पॅरीसचा पत्ता नाहीं. मोठमोठीं शेतें आणि जंगलें दोन्ही बाजूंना दिसत आहेत. पण पॅरीस कुठें आहे ?

शेवटीं एकदां ५–३५ ला पॅरीसच्या गार दु नॉर्द स्टेशनांत आमची गाडी उभी राहिली. अनोळखी युरोपियन स्टेशनांत उत-रलें कीं भाषा येत नसल्यामुळें अगदीं रडूं कोसळतें, या जुन्या अनुभवानें बर्लीनहून निघण्यापूर्वीच पॅरिसमधले माझे मित्र श्री. हर्षे यांना पत्र लिहून मी मुद्दाम स्टेशनवर बोलावलें होतें. स्टेशनवरल्या गर्दींत खूप डोळे ताणून ताणून मी पाहिलें. पण सर्व अनोळखी फ्रेंच चेहरे दिसत होते. हर्षे आले नव्हते. त्यांना पत्र मिळालें नाहीं कीं काय ?

पोर्टरला मी सामान बाहेर घ्यावयास सांगितलें. पौंडाच्या नोटा स्टेशनमधल्या एक्सचेंजवर मोडून फ्रेंच पैसे घेतले. त्या लेटिश् मुलीला आखन् येथें तिचे उसने घेतलेले पैसे परत दिले, आणि तिचा निरोप घेतला. आमच्या स्विस् मित्राची प्रेयसी स्टेशनवर आलीच होती. तिच्या आलिंगनांच्या आणि चुंबनांच्या माऱ्यांतून तो मोकळा झाल्यानंतर त्याचा निरोप घेतला आणि मी पुढचा विचार करूं लागलों. हर्षे यांचा २७, रू ला सेपिद् हा पत्ता माझ्या जवळ होता. तो एका कागदावर लिहून एका फ्रेंच टॅक्सीवाल्याला दाखवला आणि या जागीं मला ने म्हणून त्याला खुणेनें सांगि-तलें. एकंदर त्रासानें मी अगदीं वैतागून गेलों आहे. आकाशांत ढग आले आहेत, आणि थोडा थोडा पाऊस पडत असल्यामुळें पॅरीसचे रस्तेही भिजून गेले आहेत. पॅरीसचे रस्ते आणि इमारती मला लंडनमधल्यासारख्याच दमट, धुरकट अशा वाटल्या. टॅक्सीवाल्यानें बरोबर २७, रू ला सेपिद समोर टॅक्सी नेऊन उभी केली. २७ नंबरच्या इमारतींत एकहि हॉटेल दिसेना. तिथें तळमजल्यावरच्या व्हरांड्यांत दोन जख्ख म्हाताऱ्या फ्रेंच बाया गोष्टी करीत बसल्या होत्या. त्यांना 'मंस्यूर हर्षे ?' 'मंस्यूर हर्षे ?' म्हणून मी मोठमोठ्यानें विचारलें. त्या माझ्या तोंडाकडे पहातच राहिल्या. एक दोन मिनिटांनीं 'आहा !' म्हणून त्यांच्यापैकीं एकजण उठली, आणि तिनें दुडूदुडू आंत जाऊन एक कार्ड आणून माझ्या हातांत दिलें.

इर्ष्यांना बर्लीनहून मीच पाठवलेलें तें कार्ड होतें ! एकदोन दिवसां-पूर्वी तें कार्ड तिथें येऊन पडलें असावें, आणि आपल्या दारावर उभ्या असलेल्या या नवख्या इसमाचा या कार्डाशीं कांहीं तरी संबंध असावा, हें ताडून त्या म्हातारीनें तें माझ्या हातांत आणून दिलें. इर्षे तिथें रहात नव्हते हें खास. माझा अगदीं धीरच खचला. आतां या शहरांत करूं तरी काय ? फ्रेंच भाषेचा गंध नाहीं. कुणाला विचारा-यचें तरी काय ? टॅक्सीवाला माझ्याकडे पहात उभा होता. मला काय पाहिजे तें त्याला समजत नव्हतें. मी हॉटेलची चवकशी करतों आहे असा त्याचा समज झाला. शेजारींच २५ नंबरच्या इमारतींत होतेल दे ॲरनी नांवाचें एक हॉटेल होतें. त्याकडे बोट दाखवून तें चांगलें आहे म्हणून तो मला खुणेनें सांगूं लागला. आधीं त्या हॉटेलांत जाऊन एक खोली घ्यावी आणि मग इर्ष्यांचा शोध कसा करावयाचा आणि काय करावयाचें तें ठरवावें असा विचार करून मी त्या हॉटेलमध्यें शिरलों. हॉटेलचा म्हातारा मालक आणि त्याचा एक तरुण नोकर तिथें होता. त्यांना इंग्रजीचें एक अक्षरही कळत नव्हतें. खोलीचें दिवसाचें भाडें काय वगैरे वगैरे गोष्टी ठरवायच्या कशा ? ते दोघेही फ्रेंच माणूस मात्र अतिशय सुस्वभावी होते. मध्येंच हंसून, मध्येंच वेड्यावांकड्या खुणा करून, मध्येंच आपल्या हॉटेलचें रजिस्टर दाखवून मला हवें तें समजा-वून सांगण्याचा ते घामाघुम होईपर्यंत प्रयत्न करीत होते. त्यांचें रजिस्टर चाळून पहातांना एकदम 'खान' असें एक नांव दिसलें. खात्रीनें कुणातरी हिंदुस्थानी गृहस्थाचें हें नांव असावें. त्यावर बोट ठेवून मी खुणेनें हे गृहस्थ इथें आहेत का म्हणून विचारलें. तो फ्रेंच म्हातारा उमगला. आपला देशबांधव बरोबर ओळखून काढलास, असा चेहेरा करून तो हंसला आणि मला थोडावेळ थांबावयाला त्यानें सांगितलें. तोंपर्यंत सातव्या मजल्यावरल्या एका खोलींत त्याच्या नोकरानें माझें सामान ठेवलें होतें तिथें जाऊन मी विचार करीत बसलों. अर्ध्या तासानें तो नोकर आला, आणि मला खालीं बोलावतात म्हणून सांगून गेला. मी खालीं गेलों तो एक पंचवीस तीस वर्षांचा मुसलमान तरुण तिथें उभा होता. एक हिंदी माणूस पाहून आतां माझे सर्व प्रश्न सुटणार म्हणून मला इतका आनंद झाला कीं त्याचें वर्णन करतां येणार नाहीं. मि. खान पॅरीसमध्यें शिकत होते. या हॉटेलांत

ते बरेच दिवस रहात होते. त्यांना माझ्या सर्व अडचणी मी सांगितल्या. त्यांनीं फ्रेंचमध्ये त्या म्हाताऱ्याला मला काय पाहिजे नको तें सर्व समजावून सांगितलें, आणि माझ्या खोलीचें मी दिवसाचें १५ फ्रँक भाडें द्यावें असें ठरलें. आतां माझा जीव खूपच खालीं पडला.

श्री. हर्षे यांना माझें पत्र कसें मिळालें नाहीं, त्यांनीं जागा बदलली, कीं माझा पत्ता चुकला असा विचार करीत मी माझी बॅग उघडली आणि श्री. हर्षे यांचीं जुनीं पत्रें बाहेर काढलीं. पत्रांवर १७, रू ला सेपिद् असा पत्ता होता, आणि मी १७ ऐवजीं २७ आंकडा मनांत धरून पॅरीस धुंडाळीत होतों! याच रस्त्यावर १७ नंबर जवळच कुठें तरी असणार! मी कपडे घातले आणि तडक बाहेर पडलों. १७ नंबरच्या घरांतल्या होतेल द लक्समध्यें आपल्या खोलींत वाचीत बसलेले हर्षे मला सांपडले. मला अतिशय आनंद झाला. हर्षे यांची सध्यां परीक्षा चालू आहे. मात्र उद्यां ते परीक्षेंतून मोकळे होणार. त्यांच्या पत्त्यावर पॅरीसमध्यें मागवलेलीं माझीं हिंदुस्थानाहून आलेलीं सर्व पत्रेंही मला एकदम मिळालीं. आतां पॅरीस मला बरें वाटूं लागलें. पॅरीसमधील माझे पहिले दोन तास म्हणजे सुखदुःखाचे प्रसंग खच्चून भरलेलें, क्षणोक्षणीं प्रेक्षकांची उत्कंठा वाढवणारें एक नाटकच झालें म्हणायचें !

* * *

## ता. २१ जून–

*सुंदर बर्लीन आणि घाणेरडें पॅरिस !—चित्रकार भट्टा !—स्वावलंबनी हॉटेल !—*

सकाळीं ८ वाजतां हर्षे यांना भेटायला गेलों. त्यांना आज परीक्षेला जायचें आहे. तेव्हां त्यांच्याच हॉटेलमध्यें राहणाऱ्या श्री. कालेलकर नांवाच्या एका हिंदी विद्यार्थ्याशीं त्यांनीं माझी ओळख करून दिली, आणि मला पॅरीस दाखवावयाची जबाबदारी त्यांच्यावर टाकली.

एका लहानशा कॅफेमध्यें मी आणि कालेलकर कॉफी घ्यावयाला गेलों. हें कॅफे अगदींच अस्वच्छ आणि मुंबईतल्या एखाद्या मद्राशाच्या

कॉफीच्या दुकानासारखें वाटलें. समोर पडलेलें एक फ्रेंच वृत्तपत्र कालेलकरांना वाचून दाखवावयाला मी सांगितलें. मॉं. ब्लूम् यांच्या सोशालिस्ट सरकारनें कालच राजीनामा दिल्याची बातमी होती. फ्रान्सचें पॉप्युलर फ्रंट सरकार खलास झालें म्हणायचें.

बर्लीनहून आल्यावर पॅरीस फारच अस्वच्छ वाटतें. मी रहातों हा भाग वाङ्मयांत आणि कलेच्या इतिहासांत अजरामर झालेला असा पॅरीसचा भाग आहे. पॅरीसमधल्या चित्रकार, कवी वगैरे कलावंतांचें जिथें वास्तव्य असतें तो हा लॅटिन् क्वॉर्टर्स. याच भागांत पॅरिसची सुप्रसिद्ध सॉर्बॉ युनिव्हर्सिटी आहे. त्यामुळें बहुतेक विद्यार्थीही याच भागांत रहातात. नाना देशांतले आणि नाना रंगाचे विद्यार्थी इथें रस्त्यांत दृष्टीला पडतात. एखादा काळा कुळकुळीत, धिप्पाड निग्रो तरुण एखाद्या सुंदर नाजुक फ्रेंच मुलीच्या हातांत हात घालून जातो आहे, हें दृश्य पॅरीसमध्यें असाधारण नाहीं. फ्रान्सच्या थोर पुरुषांना जेथें पुरतात ती पॅंथिऑन् इमारत इथेंच आहे. पॅंथिऑनवरून आम्ही लक्झेंबुर्ग गार्डन्समध्यें गेलों. पॅरिसमधली ही एक अवाढव्य बाग आहे. मात्र बर्लीनमधले सुंदर स्वच्छ रस्ते आणि बागा पाहिल्यानंतर पॅरीसमधल्या बागांविषयीं आणि रस्त्यांविषयीं कांहींच वाटत नाहीं. मी रहातों त्या रू ला सेपीदच्या बाजूच्या एका लहानशा रस्त्यावर भाजीचीं दुकानें आहेत. त्या रस्त्यावरील हातगाड्यांवरून भाज्या विकणारांची ओरड आणि रस्त्यांत पडलेला केरकचरा पाहून मला मुंबईच्या मुगभाट भागाची आठवण झाली!

दुपारीं १२ वाजतां आमच्या शेजारच्या रस्त्यावर असलेल्या होतेल द पे मध्यें भट्टाचार्य नांवाच्या एका बंगाली विद्यार्थ्याकडे मला कालेलकर घेऊन गेले. भट्टाचार्य ही एक विलक्षण व्यक्ती आहे. तो शिल्पकार आहे. चित्रकलेच्या अभ्यासाकरतां तो पॅरिसमध्यें आला आहे. आम्ही खोलींत शिरलों तेव्हां तो धोतर नेसला होता आणि त्याच्या अंगांत एक फाटका गंजीफ्रॉक होता. चुलीवर कांहीं तरी शिजवण्यांत तो गुंग होता! त्याच्याकडे बरेच हिंदी विद्यार्थी जेवायला येतात. त्यांना हिंदी पद्धतीचें जेवण करून तो घालतो आणि त्या उत्पन्नावर स्वतःचा चरितार्थ चालवून चित्रकलेचा अभ्यास करतो. सर्व विद्यार्थी त्याला 'भट्टा' म्हणतात. स्वभावानें भट्टा अगदीं

गरीब आहे. एखाद्या सुगृहिणीप्रमाणें समोरच्या टेबलावर त्यानें आमच्या-साठीं बशा मांडल्या, आणि कॉलीफ्लॉवर, बटाट्यांची भाजी, भात, रसगुल्ला वगैरे पदार्थ आम्हांला वाढले. भट्टा जेवण छानच करतो. रेडिऑलॉजीच्या अभ्यासाकरतां पॅरीसमध्यें आलेले डॉ. आठले नांवाचे एक विद्यार्थी आणि फ्रेंच इंडियांतून कायद्याच्या अभ्यासाकरतां आलेले मि. कुंडू नांवाचे एक गृहस्थ मला इथेंच भेटले. भट्टाजवळ सारी एक खोली आहे. खोलीला लागून मोरीचा भाग आहे. तिथेंच स्टोव्हवर जेवण वगैरे सर्व कांहीं तो करतो. खोलींतल्या बिछान्यावर, खुर्च्यांवर, स्टुलावर जागा मिळेल तिथें जेवायला येणारे विद्यार्थी बसतात. खोलीच्या एका कोपऱ्यांत लाकडी घोडे, अर्धवट काढलेलीं चित्रें वगैरे अडगळ पडली आहे. भट्टाची 'लॅंडलेडी' खालच्या मजल्यावर रहाते. तिच्या दोन मुली भट्टाच्या मॉडेल्स ! युरोपियन कादंबऱ्यांतून चित्र-कारांच्या सहाव्या किंवा सातव्या मजल्यावरल्या 'घरट्यां' (Garret)-चीं वर्णनें आपण वाचतों तसें हें भट्टाचें 'घरटें' आहे. पॅरीसमधलें विश्वविख्यात चित्रसंग्रहालय 'लूव्हूर' मला दाखवण्याचें आणि तेथल्या प्रख्यात कलाकृतींचें मर्म समजावून देण्याचें भट्टानें मला कबूल केलें.

दुपारीं मी, कालेलकर आणि डॉ. आठले टॉमस कुक कंपनीच्या प्लास द ला मादलीनमधल्या ऑफिसकडे चाललों होतों. रस्त्यांत पांढऱ्या लेसची उंच विचित्र टोपी डोक्याला घातलेली एक खेडवळ फ्रेंच मुलगी आमच्या दृष्टीला पडली. माझ्या गळ्यांत कॅमेरा होता. मी सहज म्हटलें, हिचा फोटो घेऊं या. डॉ. आठले एकदम पुढें गेले आणि फ्रेंचमध्यें त्या मुलीला त्यांनीं विचारलें. ती मोठ्या आनंदानें कबूल झाली. ट्यूब स्टेशनांत भरपूर विजेचा उजेड असतो म्हणून जवळच्याच एका ट्यूब स्टेशनांत आम्ही उतरलों. प्लॅटफॉर्मवर एका मोठ्या दिव्याखालीं तिला उभी करून आम्ही तिचा फोटो घेतला.

३ जुलै रोजीं व्हेनिसहून निघणाऱ्या कॉंटे व्हेर्डे बोटीनें हिंदु-स्थानला परत जावयाचें मी ठरविलें होतें. कुकच्या ऑफिसांत कळलें, कीं स्पॅनिश युद्धामुळें बऱ्याच इटालियन बोटींचे कार्यक्रम रद्द झाले आहेत आणि २३ जुलैपर्यंत दुसरी इटालियन बोट नाहीं. माझें इटालियन कंप-

नीचें रिटर्न तिकीट असल्यामुळें आतां २० दिवस करायचें काय हा प्रश्न माझ्यासमोर उभा राहिला. उगाच गांवोगांव भटकावयाचा मला आतां कंटाळा आला आहे. इटालियन बोटीचें तिकिट असलें तरी दुसऱ्या कुठल्याही बोटीवर आम्ही 'ट्रॅन्सफर' देऊं शकूं असें, कुक कंपनीनें सांगितलें तेव्हां माझ्या जिवांत जीव आला.

परत येतांना पॅरिसमधल्या प्रख्यात लाफाये स्टोअर्समध्यें मी कांहीं वस्तू खरेदी केल्या, आणि आम्ही सर्व डॉ. आठले यांच्या खोलीवर गेलों. तिथें गणित विषयांत डॉक्टरेट घेण्याकरितां पॅरिसला आलेले पंडितजी नांवाचे एक गृहस्थ आणि एक पंजाबी विद्यार्थी भेटला. पंडितजी पन्ना संस्थानांतले आहेत. ज्या पंजाबी विद्यार्थ्याबरोबर विद्यार्थ्यांसाठीं जीं खास भोजनालयें (Foyer et etudents) आहेत त्यांपैकीं एकांत संध्याकाळचें जेवण घेण्याकरतां मी गेलों. या हॉटेलांत मोठी मजा असते. दर माफक असतात, आणि टिप्स वगैरे द्याव्या लागत नाहींत. कारण इथें स्वतःचे पदार्थ स्वतःच घ्यावे लागतात. एका बाजूला सर्व पदार्थ मांडून ठेवलेले असतात आणि तिथें तीन चार मुली उभ्या असतात. जवळच्याच कोंपऱ्यांत ट्रे, कांटे, चमचे, बशा वगैरे असतात. आपण तिथें, जायचें, एक ट्रे आणि हव्या तितक्या बशा व कांटेचमचे घ्यायचे. नंतर त्या मुलींकडे जाऊन पहिल्या मुलीकडून आपणाला हवी ती 'सूप' बोट दाखवून घ्यायची. दुसरीकडून इतर वाटेल ती 'साइड डिश' घ्यायची, तिच्या पुढें उभ्या असलेल्या तिसरीकडे जायचें आणि हवें तें 'पुडिंग' तिच्याकडून घ्यायचें. ही तिसरी मुलगी ट्रेमधले सर्व पदार्थ पहाते आणि त्यांचें बिल करून तें ट्रेमध्यें ठेवते आणि त्याबरोबरच आपणाला हव्या असलेल्या पांढऱ्या किंवा तांबड्या दारूची एक लहानशी बाटली देते. हा ट्रे घेऊन आपण रिकाम्या असलेल्या टेबलावर जाऊन बसायचें. खाऊन झाल्यावर बिल खिशांत काढून घ्यायचें आणि सर्व बशांसह तो ट्रे एका कोंपऱ्यांत उभ्या असलेल्या कपबशा धुणाऱ्या नोकराजवळ नेऊन द्यायचा. बाहेर पडतांना आपलें बिल कॅशरजवळ चुकतें करावयाचें. या 'स्वावलंबनी' दुकानांत पदार्थही बरे असतात आणि दरही स्वस्त असतात. माझ्यासारख्या फ्रेंच न येणाऱ्या माणसांची तर चांगलीच सोय होते. स्वतःच्या डोळ्यांनीं बघून आपणाला चांगला दिसेल

तो पदार्थ बोटानें दाखवून मागून घ्यायचा; तोंड उघडायचें कारण नाहीं ! साडेदहा फ्रँक, म्हणजे १३ आण्यांत माझें पोटभर जेवण झालें.

९ वाजतां शां एलिसी या पॅरिसमधल्या प्रख्यात रस्त्यावर असलेल्या एका सिनेमांत इंग्लिश चित्रपट पहावयाला आम्ही गेलों. चित्रपट अगदींच सामान्य होता. तिकिटाला मात्र २१ फ्रँक्स म्हणजे जवळ जवळ पावणेतीन रुपये द्यावे लागले. वर आणखी ओव्हरकोट काढून घेणाऱ्या आणि जागा दाखवणाऱ्या मुलीला ४ फ्रँक्स दक्षिणा द्यावी लागली ती वेगळीच !

* * *

## ता. २२ जून–

आज ' ॲक्रोपोल ' नांवाच्या एका ग्रीक हॉटेलांत दुपारचें जेवण घेतलें. ग्रीक जेवण जरा मसालेदार असतें. त्यामुळें हिंदी विद्यार्थ्यांना तें बरेंच आवडतें. अगदीं साधें दुकान आहे हें. लांबच लांब टेबलावर नुसता कागद अंथरला आहे आणि रांगेनें बसलेले जपानी, नीग्रो, फ्रेंच, हिंदी विद्यार्थीविद्यार्थिनी मोठमोठ्यानें हंसत खिदळत खात आहेत. आम्हांला पदार्थ आणून देणारी हंसतमुख ग्रीक मुलगी भली धिप्पाड आणि उंच आहे.

लोदिआँ थिएटरांत आज रात्रीं अलेक्झांडर ड्यूमाचें प्रख्यात ' कॅमिल ' नाटक आहे. याच नांवाचा नॉर्मा टॅल्माजचा अविस्मरणीय चित्रपट मी मुंबईत पाहिला होता. पूर्वी या नाटकांत फ्रान्सची सुप्रसिद्ध नटी सारा बर्न्हार्ट् कॅमिलचें काम करी. आज कुणीतरी नवीन नटी कॅमिलचें काम करीत आहे. १५ फ्रँकचें तिकीट काढून मी आणि कालेलकर आंत गेलों. जुन्या तऱ्हेचें पण भव्य असें हें तीन मजली थिएटर आहे. बसायला लाल मखमलीच्या मऊ खुर्च्या होत्या. नाटक ९ ला सुरू झालें आणि १२ ला आटपलें. नाटक छान झालें. पण शेवटचा पडदा पडल्यावर प्रेक्षकांनीं टाळ्यांचा गजर केला आणि मरून पडलेली कॅमिल प्रेक्षकांच्या टाळ्यांचा स्वीकार करण्याकरतां हंसत हंसत पुढें आली हें मला आवडलें नाहीं. या सुंदर, शोकपर्यवसायी नाटकाचा अशानें विरस होतो, असें मला वाटतें.

* * *

## ता. २३ जून—

*न्यूमॅटिक पत्र !—मुसलमानसुद्धां आर्यंदूच !*

मी पेन क्लबचा सभासद आहें आणि जागतिक पेन कॉंग्रेस सध्यां पॅरीसमध्यें चालू आहे. कॉंग्रेसच्या चिटणीसांना पॅरीसमध्यें आल्याचें मी कळविलें होतें. चिटणीस मॉ. बेंजामिन् क्रेमो यांचें पत्र मला आलें आहे. हिंदुस्थानचे प्रतिनिधी ऑक्सफर्डचे डॉ. अमिया चक्रवर्ती आहेत. मला नुसता एक प्रेक्षक म्हणून हजर रहातां येईल. बहुतेक कारभार फ्रेंचमध्यें चालणार. मी जाऊन काय करायचें तें मला समजत नाहीं. दुसरें एक न्यूमॅटिक ( Pneumatic ) पत्र आहे. तें प्रख्यात क्रांतिकारक फ्रेंच कवी लुई अॅरेगॉं यांचें आहे. आमच्या हिंदुस्थानी पुरोगामी लेखकसंघाचे बॅ. सज्जद झहीर यांनीं अॅरेगॉंना माझ्यासंबंधीं लिहिलें होतें. म्हणून अॅरेगॉंनीं मला भेटायला बोलावलें आहे. ‘सेस्वा’ या पॅरीसमधल्या पत्राचे ते संपादक आहेत. पत्राच्या ऑफिसमध्येंच त्यांनीं मला बोलावलें आहे. पत्रांतलें अॅरेगॉंचें इंग्लिश पाहून मला हंसू कोसळलें. त्यांना इंग्लिश येत नाहीं, आणि मला फ्रेंच येत नाहीं. आम्ही बोलायचें काय हा प्रश्नच आहे !

न्यूमॅटिक लेटर ही एक पॅरीसमधली मजेदार चीज आहे. पॅरीसमध्येंच आपणाला कुणाला ताबडतोब पत्र मिळावें अशी इच्छा असेल, तर या पद्धतीनें पत्र धाडावें. तारेच्या फॉर्मसारखा एक फॉर्म असतो. त्यावर मजकूर लिहून द्यायचा. पॅरिसच्या ज्या भागांत आपला मित्र असेल त्या भागांतल्या पोष्ट ऑफिसांत तो घडी केलेला फॉर्म ताबडतोब जाऊं शकतो. पोष्टाच्या सर्व शाखा रस्त्याखालून जाणाऱ्या पोकळ नळ्यांनीं जोडलेल्या आहेत म्हणतात. त्या नळींतून हवेच्या दाबानें तें पत्र धाडलें जातें आणि पत्र दिल्यापासून एक तासांत तें दुसऱ्या इसमाला मिळतें.

दुपारीं पॅरिसमध्यें सध्यां चालू असलेलें सुप्रसिद्ध प्रदर्शन पहावयाला गेलों. वाटेंत फ्रेंच फॅसिस्ट पक्षानें लावलेले मोठमोठे चित्रफलक दिसले. रशियांत मार्शल तुखाचेव्हस्की यांना गोळी घालून ठार करण्यांत आल्याची बातमी या फलकांवर असून फ्रेंच लोकांना कम्युनिस्टांच्या राक्षसी लीलांविरुद्ध

सावधगिरीची सूचना देण्यांत आली आहे. स्पॅनिश युद्धांत स्पॅनिश सरकारला सहाय्य गोळा करण्याकरतां म्हणून कम्युनिस्टांनीं घेतलेल्या सभांचेही चित्रफलक रस्त्यांत जिथें तिथें दिसत आहेत. प्रदर्शनांतले रशियन आणि जर्मन पॅव्हिलियन्स अतिशय प्रेक्षणीय आहेत. दोन हाड-वैऱ्यांच्या पॅव्हिलियन्सना समोरासमोर जागा देण्यांत फ्रेंच सरकारनें मोठाच विनोद केला आहे, यांत शंका नाहीं.

पॅरीसमध्यें कुठेंही पहा, रस्त्यांत दिसणारी टॅक्सी सित्रोन किंवा रेनो या फ्रेंच मेकचीच असते. फ्रेंचांची ही स्वदेशीची आवड कौतुकास्पद आहे.

कुणाही हिंदुस्थानी माणसाला मग तो मुसलमान असो, कीं हिंदू असो, फ्रेंच लोक 'आयंदू' म्हणजे हिंदू म्हणतात. मुसलमानालाही आपण 'आयंदू' आहोंत म्हणून सांगावें लागतें. मुंजे–सावरकरांना हें ऐकून आनंदाचें भरतें येईल !

* * *

### ता. २४ जून–

*तुम्हांला बहुपत्नित्व मान्य आहे काय ?–फ्रान्स हिंदु-स्थानच्या बराच जवळ दिसतो !*

कुक्समध्यें मला कळलें, कीं तिकीट बदलून मला फ्रेंच बोटीवरून हिंदुस्थानला जातां येईल. व्हेनिस ते मुंबई इटालियन बोटीच्या तिकीटाइतकेंच मार्सेय् ते कोलंबो फ्रेंच बोटीचें तिकीट आहे. जातां जातां सिलोनही पाहतां येईल असा विचार करून मी मोठ्या आनंदानें फ्रेंच बोट केव्हां निघते म्हणून विचारलें. मेसाजरी मारि-टाईम कंपनीची 'झां लॅबोर्ड' बोट उद्यांच मार्सेयहून सुटणार, असें कुक्सच्या माणसानें सांगितलें. तावडतोब मी माझी जागा रिझर्व्ह करा-वयाला सांगितली. मी आतां यूरोप सोडून हिंदुस्थानला जायला अगदीं अधीर झालों आहे. कुक्सच्या माणसाबरोबर मी बोलत उभा असतां माझ्या बाजूला अमेरिकेला जाऊं इच्छिणारा एक युरोपियन गृहस्थ उभा होता. अमेरिकेचा व्हिसा देण्यापूर्वी अमेरिकन वकीलातींत किती

मूर्खपणाचे प्रश्न विचारतात तें तो सांगत होता. तुम्हाला बहुपत्नीत्व मान्य आहे काय? अमेरिकन् सरकार उलथून पाडण्याचा तुमचा विचार आहे काय? वगैरे वगैरे. छापील फॉर्मावर हे प्रश्न असतात आणि त्यांचीं उत्तरें भरून द्यायचीं असतात!

दुपारीं भट्टाबरोबर जगविख्यात 'लूव्हर्' चित्रसंग्रहालय पहावयाला गेलों. साऱ्या स्त्रीसौंदर्याचें प्रतीक समजला जाणारा 'व्हिनस् द मिलो'चा प्राचीन पुतळा, लिओनार्डो दा विंचीचें 'मोना लिसा' हें चित्र, वगैरे वगैरे लहानपणापासून वाचीत आणि ऐकत आलेल्या अमर कलाकृती पाहिल्या.

शिल्पकला विभागांत इजिप्शियन सेखमेतचा पुतळा आमच्या नारसिंहावतारासारखा वाटला!

रात्रीं श्री. हर्षे यांजकडे जेवावयाचें आणि ९-३५ ला मार्सेयसाठीं सुटणारी गाडी गार दु लिआँ स्टेशनावर पकडावयाची.

हर्षे यांजकडे त्यांनीं स्वतः हातानीं केलेली खिचडी, चपाती, केळ्यांची शिखरण वगैरे पदार्थ पोटभर खाल्ले. ९ वाजतां मी आणि हर्षे टॅक्सी करून स्टेशनकडे जावयास निघालों. दरवाजावर तिकीट तपासणारा फ्रेंच रेल्वे अधिकारी वजन केल्याशिवाय माझें सामान आंत जाऊं देईना. साऱ्या युरोपांत माझ्या दोन बॅगांचें कुठेंच वजन करावें लागलें नाहीं, म्हणून त्याला आम्ही परोपरीनें सांगितलें. पण तो ऐकेना. त्याच्या बाजूला दुसरा एक फ्रेंच तिकीटकलेक्टर उभा होता. त्यानें माझ्याकडे बघून डोळा मिचकावला आणि हातानें खूण केली. खिशांतून २ फ्रँक्स काढून मी त्या अधिकाऱ्याच्या हातावर ठेवले. त्यानें सलाम करून आम्हाला आंत जाऊं दिलें! युरोपांत हा प्रथमच अनुभव आला. फ्रान्स हिंदुस्थानच्या बराच जवळ दिसतो. २ फ्रँक्स किंवा ४ आण्यांत आमच्या हिंदुस्थानांतला फाटका तिकिट कलेक्टरही खूष झाला नसता. म्हणजे या बाबतींत फ्रान्स मागासलेला दिसतो.

आठ माणसांचा एक सबंध कंपार्टमेंट मला मिळाला. फक्त एक तरुण फ्रेंचमन त्या कंपार्टमेंटमध्यें होता. रात्र बसून काढायला नको.

बरोबर ९-३५ ला गाडी सुटली.

* * *

## ता. २५ जून–

*झां लॅबोर्डवर ' ऑल इंडिया फेडरेशन ! '*

पहांटे ३ ला जागा झालों आणि मग झोंपच येईना. ५ वाजतां लिऑं हें फ्रान्समधलें सुप्रसिद्ध शहर आलें. तिथें मी कॉफी घेतली. हे फ्रेंच लोक मला हिंदी लोकांसारखेच वाटतात. बोलायला अघळपघळ आणि कपड्यालत्त्यांत जरा गबाळ आणि बावळटच. इतर युरोपियन या लोकांना अगदींच गांवठी समजत असतील! गाडीच्या बाहेर मी पाहिलें. दोन्ही बाजूंना पांढरा रंग दिलेल्या लाल कौलांच्या फ्रेंच खेड्यांतल्या मासले-वाईक घरांचे पुंजके दिसत आहेत.

आतां सकाळचे ९ वाजले आहेत. आम्ही मार्सेयच्या जवळ येत आहोंत. दूरवर समुद्र दिसतो आहे. आजूबाजूला उंच उघड्या बोडक्या खडकांच्या रांगा उन्हांत तळपत आहेत. बरोबर १० वाजतां मार्सेय स्टेशनांत गाडी शिरली. 'झां लॅब्रोर्ड' दुपारीं ४ वाजतां सुटावयाची आहे. कुठें तरी हॉटेलांत पैसे घालवण्यापेक्षां सरळ बोटीवर नेऊन सामान ठेवावें, आणि ४ वाजेपर्यंत वाट पहावी असें मी ठरविलें. एक टॅक्सी करून मी धक्क्याकडे गेलों. बोटीवर इतर नोकरचाकर होते, पण मुख्य अंमलदार कुणीच नसल्यामुळें सामान डेकवर एका बाजूला ठेवून केबिनसाठीं २ वाजतां बोटीचा पर्सर येईपर्यंत वाट पहावी लागणार.

या फ्रेंच बोटीवर कुणी इंग्लिश बोलणारा किंवा एखादा हिंदी माणूस जर भेटला नाहीं, तर बोटीवरचे १७ दिवस म्हणजे एकांत कोठडीचीच मला शिक्षा होणार या भीतीनें मी गांगरून गेलों होतों. इतक्यांत एक तरुण हिंदी विद्यार्थी समोरून येतांना माझ्या दृष्टीला पडला. मला हायसें वाटलें. नंतर मद्रास, त्रिवेंद्रम्, कोलंबो येथें जाणारे आणखीही हिंदी विद्यार्थी भेटले.

आम्ही तिघेचौघे मार्सेयमधल्या एखाद्या हॉटेलांत दुपारचें जेवण घ्यावें म्हणून बाहेर पडलों. रखरखीत ऊन पडलें आहे. यूरोपांत आतां-पर्यंत कुठेंही न दिसणाऱ्या गोष्टी मार्सेय बंदरांत दिसल्या. त्या म्हणजे धूळ आणि घवघवणाऱ्या माशांचे थवे ! बंदराच्या आजूबाजूचे रस्ते आणि घरें मला अगदींच घाणेरडीं आणि धुळकट वाटलीं.

चांगलेंसें दुकान कुठें दिसेना. एका लहानशा दुकानांत आम्ही शिरलों. मुंबईंत भेंडी बाजार किंवा गोदीजवळ दुकानें आहेत तशापैकीं हें दुकान आहे. इंग्लिश चित्रपटांत खलाशी, लफंगे वगैरे लोक ज्या प्रकारच्या भिकार दुकानांत खायला प्यायला येतात, अगदीं तस्सें हें दुकान आहे. समोर गल्ल्यावर एक फ्रेंच म्हातारी बसली आहे. तिच्या ओंठावर रुपेरी मिसरूड आहे, आणि तिच्या हनुवटीवरही तुरळक रुपेरी केंस दिसत आहेत! आपल्या मळकट झग्याच्या बाह्या दंडावर चढवून त्या म्हातारीची दहा बारा वर्षांची गलेलठ्ठ मुलगी जाड्याभरड्या घाणेरड्या बशांतून आम्हाला खायचे पदार्थ आणून देते आहे. लाकडी फळ्या कशा तरी ठोकून तयार केलेल्या एका टेबलावर आम्ही जेवतों आहोंत. भूक सपाटून लागली आहे, आणि आजूबाजूच्या वातावरणाची आम्हाला मुळींच पर्वा नाहीं!

१ वाजतां आम्ही बोटीवर परत आलों. ३–३० वाजले तरी बोटीच्या अंमलदारांचा पत्ता नाहीं. ३–४५ ला पर्सरसाहेब डुलत डुलत आले. माझें तिकीट तिसऱ्या वर्गाचें आहे. कंपनीनें मला तिकीट दिलें; पण तिसऱ्या वर्गाच्या सर्व केबिन भरून गेल्या आहेत. माझ्या तें पथ्यावरच पडलें. सेकंड क्लासमधल्या केबिनमध्यें मला जागा देण्यांत आली. ४ वाजून गेले तरी बोट हालण्याचीं चिन्हें दिसत नाहींत.

माझ्या केबिनमध्यें पोर्टसय्यदला उतरून पॅलेस्टाईनला जाण्याकरतां अमेरिकेहून आलेला एक सुस्वभावी तरुण ज्यू आहे. चार जणांच्या केबिनमध्यें आम्ही दोघेच म्हणून मी खुषींत होतो, इतक्यांत लांब काळे झगे घातलेले दोन जख्ख म्हातारे ज्यू रब्बी (धर्मोपाध्याय) आमच्या केबिनमध्यें आले.

ही फ्रेंच बोट कोलंबोवरून फ्रेंच इंडो चायनाची राजधानी सायगांव येथें जाणार, आणि नंतर पुढें कोबे, जपानपर्यंत जाणार. बोटीवर बरेचसे फ्रेंच लष्करी अधिकारी, त्यांच्या बायका आणि मुलें आहेत. ते बहुतेक सायगांव येथें जात आहेत. फ्रान्समध्यें शिकण्याकरतां आलेले इंडोचायना, सायगांव, वगैरे फ्रेंच वसाहतींतले बरेचसे इंडोचायनीज विद्यार्थीही बोटीवर आहेत. बोटीवर काम करणारे बहुतेक सर्व वेटर बारीक डोळ्याचे, लांब सफेत सदरे घातलेले इंडोचायनीज् आहेत.

६–३० ला जेवणाची घंटा झाली. आमच्या टेबलावरल्या इंडोचायनीज वेटरला थोडें इंग्रजी येतें. आम्ही सहासात हिंदी उतारू एका लांबलचक टेबलावर बसलों आहोंत. हें टेबल म्हणजे ऑल इंडिया फेडरेशनच म्हटलें पाहिजे. मी मुंबईचा आहे. माथुर आणि श्रीवास्तव हे दोघे यू. पी. मधले आहेत. डॉ. मेनन त्रिवेंद्रमचे, सैनुद्दिन हे मलबार-मधले आहेत. बो टिन् हा रंगून,—ब्रह्मदेशांतला, आणि डॉ. लेनोरा सिलोनमधले ! आम्ही जेवीत असतां ७ वाजतां बोटीनें मार्सेय्यचा धक्का सोडला.

* * *

## ता. २६ जून—

*आमचे युरोपियन आणि एशियाटिक गट,-"मर्सी मांस्यूर !" —उगाच नाहीं हिटलर ज्यूद्वेष्टा झाला !*

आमच्या बोटीवर एक इंडो—चायनीज डॉक्टर, त्याची बायको, आणि त्यांची तीन चार वर्षांची सुंदर गुटगुटीत मुलगी आहे. डेकवर माझ्या शेजारीं बसलें असतां डॉक्टरांना माझ्याशीं काय काय पुष्कळ बोलायचें आहे. पण त्यांना इंग्लिश येत नाहीं, आणि मला फ्रेंच येत नाहीं ! डॉक्टर मारे छातीवर दोन्ही हात ठेवीत आहेत, पुढें हात नाचवीत आहेत आणि दम लागेपर्यंत खुणा करीत आहेत. पण मला कांहीं कळत नाहीं. शेवटीं एक दोन फ्रेंच शब्द त्यांच्या तोंडांतून फुटतात. तेही मला कळत नाहींत. मला हंसूं कोंसळतें, आणि ते इंडो चायनीज डॉक्टरही हंसूं लागतात.

हे इंडो—चायनीज लोक चिनी लोकांसारखे धिप्पाड आणि पिवळ्या रंगाचे नाहींत. ते चांगलेच गोरे आहेत. पण ठेंगणे आणि कमरेंत अगदीं बारीक. डोळे बारीक आणि नाक बसकें असलें तरी इंडो-चायनीज स्त्रिया मात्र तांबूस गोऱ्या रंगामुळें आणि नाजूक बांध्यामुळें सुंदर दिसतात. डॉक्टरांची बायको नखशिखान्त युरोपियन बायकांसारखा पेहेराव करते.पण आपल्या काळ्या कुळकुळीत भरदार केसांची जपानी स्त्रियां-प्रमाणें ती अत्यंत आकर्षक रचना करते. बोटीवरील सर्व इंडोचायनीज

मंडळी आम्हा हिंदी लोकांशीं अत्यंत आपलेपणानें वागण्याचा प्रयत्न करतात. फ्रेंच उतारू आणि त्यांचीं बायकामुलें असा एक गट, आणि आम्ही हिंदी उतारू, हे इंडोचायनीज आणि एक व्हॅलेरा नांवाचा स्पॅनिश मुलगा असा दुसरा गट आहे. अर्थात् फ्रेंच उतारू आमच्याशीं फार चांगल्या तऱ्हेनें वागतात. पण आपोआपच युरोपियन आणि एशियाटिक असे हे गट पडले आहेत.

व्हॅलेरा १८–१९ वर्षांचा तरुण आहे. आपल्या आईला आणि धाकट्या भावंडांना घेऊन तो फिलिपाईन्सला चालला आहे. त्याचा बाप फिलिपाईन्समध्यें मॅनिला येथें नोकरीला आहे. व्हॅलेराचें मूळ गांव बार्सिलोना. व्हॅलेराला थोडें थोडें इंग्लिश येतें. आपण जनरल फ्रॅंकोच्या विरुद्ध आहोंत, तो म्हणाला. लोकसत्ताक स्पॅनिश सरकारचा जर फ्रॅंकोनें पराभव केला, तर बार्सिलोना येथें आपण मुळींच परत येणार नाहीं, असें त्यानें सांगितलें. स्पॅनिश लोक फारसे गोरे नसतात. भुऱ्या केसाच्या एखाद्या गोरटेल्या हिंदी मुलासारखा व्हॅलेरा दिसतो. म्हणूनच तो आमच्यांत मिसळतो कीं काय कोण जाणे. फार सुस्वभावी पोरगा आहे.

या इंडो–चायनीज लोकांच्या चालचलणुकींतलें सौजन्य वाखाणण्यासारखें आहे. संध्याकाळीं जेवणाची घंटा झाल्यावर डिनर हॉलकडे जाण्याकरतां जिन्यावरून उतरत असतां त्या इंडो–चायनीज डॉक्टरांच्य छोट्या मुलीला मी उचलून घेऊन खालीं उतरलों. तिची आई पुढें गेली होती. तिनें मागें वळून पाहिलें तेव्हां मी मुलीला खालीं उतरून ठेवीत होतों. ती मुलगी एकदम धांवत आईकडे गेली. डॉक्टरांच्या बायकोनें हात धरून तिला पुन्हां माझ्याकडे आणलें, आणि 'मर्सी मॅस्यूर!' (थॅंक यू, सर) करावयाला लावलें. आपल्या ३ वर्षांच्या मुलीनें दुसऱ्या गृहस्थाचे आभार मानावयाचा शिष्टाचार दाखविला नाहीं, हें त्या बाईला सहन झालें नाहीं!

रात्रीं १०–३० ला मी केबिनमध्यें झोंपावयाला गेलों तों ते दोघे म्हातारे ज्यू धर्मोपाध्याय आपलें बायबल कीं टॅल्मड् काय तें हातांत घेऊन जोरजोरांत पुटपुटत होते. आतां झोंप कशी येणार? माझ्या केबिनमधल्या या दोन म्हाताऱ्यांनीं कालपासून माझें डोकें उठवलें आहे. पहावें तेव्हां हे

म्हातारे तीं धर्मपुस्तकें हातांत घेऊन जोरजोरानें पुटपुटत खुर्चीवर बसून झुलत असतात. काल रात्रीं ११–३० वाजेपर्यंत असे पुटपुटत होते. आज पहांटे ५ ला मी जागा झालों, तों दिवा लावून या जोडीचा जप चाललाच होता. आपल्या टकल पडलेल्या डोक्याला आणि दोन्ही दंडाना लाकडाचे कसलेसे चौकोनी तुकडे बांधून सकाळीं हे थेरडे मंत्र पुटपुटत होते. हा काय विधी आहे कुणाला ठाऊक ! केबिनच्या बाहेर जेवायलासुद्धां हे बाहेर पडत नाहींत. यहुदी लोक एका विशिष्ट पद्धतीनें मांस शिजवतात. तसें मांस बोटीवर मिळत नाहीं, म्हणून पाव, लोणी आणि कांहीं फळें वेटरकडून हे केबिनमध्येंच मागवतात आणि तेवढेंच खाऊन रहातात. यांच्या धर्मवेडापुढें मी हात जोडतों. पण केबिनमधून या पीडा केव्हां जातील असें मला झालें आहे. दोन दिवसांनीं पोर्टसय्यदला उतरून हे जाणार, या आशेवर मी दिवस काढतों आहे. यांच्या या वेळीं अवेळीं चाललेल्या पुटपुटण्यानें शांत झोंप मला मिळतच नाहीं. असेच कुणीतरी ज्यू कुठल्या तरी प्रवासांत हिटलरला भेटले असावे; आणि तेव्हां-पासून तो ज्यूद्वेष्टा झाला असावा !

* * *

## ता. २७ जून–

आज सकाळीं १० वाजतां मुसोलिनी आपल्या विरोधकांना जिथें खडी फोडायला पाठवतो त्या लिपारी बेटाजवळून आमची बोट गेली. १२ वाजतां माऊंट एटना दृष्टीला पडला. दुपारीं २–४५ला एका बाजूला इटलीचा किनारा, दुसऱ्या बाजूला सिसीली बेट दिसत आहे. या दोहों-मधल्या मसीना सामुद्रधुनींतून बोट जात आहे. ही सामुद्रधुनी अत्यंत चिंचोळी असल्यामुळें किनाऱ्यावरच्या एखाद्या माणसाला हांक मारतां येईल इतका किनारा जवळ वाटतो.

टुंग नांवाच्या एका इंडो–चायनीज् विद्यार्थ्यांशीं माझी बरीच गट्टी जमली आहे. तो पॅरीस येथें दंतवैद्यकीचा अभ्यास करतो. तीन महिन्यांच्या सुट्टींत सायगांव येथें तो आपल्या घरीं जात आहे. त्याचा बाप सायगांव व सिंगापूर येथें रेशमाचा व्यापार करतो. त्याची आई मलाया जातीची आहे. मागल्या सुट्टींत तो अमेरिका पाहून आला.

मद्रासलाही आपण एकदां आलों होतों, तो म्हणाला. मुंबई पहायची त्याची फार इच्छा आहे. त्याला इंग्लिश चांगलें येतें. बोटीवरल्या फ्रेंच नोटीसा वाचून घेण्याकरतां आम्हाला त्याचा फार उपयोग होतो.

* * *

## ता. २८ जून ते ३ जुलै—

ता. २८ जून रोजीं संध्याकाळीं ६–३० च्या सुमाराला क्रीट बेटाजवळून आमची बोट गेली.

ता. २९ रोजीं आमची बोट पोर्ट सय्यदला पोहोंचावयाची होती, पण ती एक दिवस उशीरां पोहोंचणार असें कळतें. आम्ही सुवेझजवळ येत आहोंत आणि बोटीवर विलक्षण उकडतें आहे. जातांना सुवेझ कालव्यांतून बोट गेली तेव्हां मी बोटीवर नव्हतों. मी सुवेझ बंदरांत उतरलों, आणि कैरो व पिरॅमिड्स् पाहून मोटरनें पोर्ट सैय्यद येथें बोट गांठली. आतां सुवेझ कालवा पहावयाची मला फार इच्छा आहे.

ता. ३० जून रोजीं पहांटे ६ वाजतां आमची बोट पोर्ट सय्यद येथें आली. ७ वाजतां मी, डॉ. लेनोरा आणि रावत नांवाचे एक गृहस्थ असे तिघेजण पोर्ट सय्यद पहावयाला बाहेर पडलों. बोट उभी आहे त्याच्यासमोर पोर्ट सय्यदचा एक हमरस्ता दिसतो आहे. गाडीघोडे जात आहेत. दुकानांच्या दारांत दुकानदार उभे आहेत. आमच्या बोटीपासून धक्क्यापर्यंत एक फळ्यांचा तरंगता रस्ता तयार केलेला आहे. त्यावरून बोटींतून आम्ही सरळ धक्क्याकडे चालत गेलों. आम्ही रस्त्यावर आल्याबरोबर नाना तऱ्हेच्या वस्तू विकणाऱ्या इजिप्शियन भामट्यांनीं आम्हाला घेरलें. अगोदर २० फ्रँक किंमत सांगून एखादी वस्तू शेवटीं २ फ्रँकना द्यायला ते तयार होतात! 'लव्‌लव्' (म्हणजे अश्लील चित्रें) विकणारे हळूच खिशांतून तीं चित्रें काढून दाखवीत आहेत, आणि आम्हाला भुरळ घालण्याचा प्रयत्न करीत आहेत. आम्ही एका रस्त्यावरून जात असतां एका इजिप्शियन हॉटेलवाल्यानें आम्हाला पाहिलें आणि आम्ही हिंदी आहोंत हें ओळखून 'राम राम! डू यू वॉंट चपाती, सर?' म्हणून हंसत हंसत विचारलें!

आम्ही १० वाजतां बोटीवर परत आलों. बोट २ ला हालणार आहे. ११ वाजतां जेवण झाल्यानंतर आम्ही बंदराची मजा पहात डेकवर उभे होतों. बोटीला मोठमोठे पडाव लागले आहेत, आणि त्यावर गालिचे अंथरून निरनिराळ्या वस्तूंचीं व्यापाऱ्यांनीं दुकानें मांडलीं आहेत. डेकवर उभ्या राहून फ्रेंच बाया पडावांतल्या व्यापाऱ्यांशीं मोठमोठ्यानें ओरडून घासाघीस करीत आहेत. डेकवर एक मजेदार दृश्य माझ्या दृष्टीला पडलें. एका फ्रेंच लष्करी हपीसराची गलेलठ्ठ बायको डेकवर बसून सर्वांसमोर आपल्या मुलाला पाजीत आहे. आमच्या हिंदी बायका उघड्यावर मुलांना पाजतात म्हणून हे युरोपियन आम्हाला हंसतात; आणि हा काय प्रकार ! आमच्या बाया पदरानें मुलाला झांकून तरी घेतात. ही बाई फ्रॉक् बाजूला करून अगदीं सूर्यनारायणाला साक्षी ठेवून मुलाला पाजीत आहे ! बोटीच्या आजूबाजूला अरबांचीं मुलें पाण्यांत पोहत आहेत, आणि पाण्यांत कुणी नाणें टाकलें, कीं बुडी मारून तें अचूक बाहेर काढून दाखवीत आहेत. २–१० ला आमची बोट पोर्ट सैय्यद सोडून सुवेझच्या कालव्यांत शिरली. बोट अगदीं हळू चालत आहे. कालव्याच्या तोंडाशींच ‘Starry Bolshevik’ नांवाची एक रशियन मालाची बोट माझ्या दृष्टीला पडली. दोन्ही बाजूला ओसाड वाळवंट आणि मधून मधून कांहीं खुरटीं झुडुपें दिसत आहेत.

६–३० वाजले आहेत. आम्ही अजूनही कालव्यांतच आहोंत. उजव्या बाजूच्या किनाऱ्यावर मधून मधून छोटीं छोटीं इजिप्शियन घरें दिसत आहेत. कांहीं घरांच्या ओट्यावर बायका बसल्या आहेत, आणि आजूबाजूला मुलें खेळत आहेत. बोट इतक्या जवळून जात आहे, कीं समुद्रकिनाऱ्यावर वाळूंत खेळणाऱ्या छोट्या अरब मुलांची ओरडाओरड आम्हाला सहज ऐकूं येते. ७–३० ला कालव्यांतून एका मोठ्या सरोवरांत आम्ही आलों आहोंत. हें ‘ क्रॉकोडाईल सरोवर ’. या तळ्याच्या काठांशीं इस्मालिया शहर आहे. बोटींतून दूरवर लुकलुकणारे शहराचे दिवे दिसत आहेत.

८–३० ला दुसरें सरोवर आलें. हें ‘बिटर लेक’. सुवेझ बंदर रात्रीं १० नंतर येणार आहे. पण मी तें युरोपला जातांना पाहिलें आहे. १०–३० ला मी झोपीं गेलों.

ता. १ जुलै रोजीं सकाळीं एका बाजूला अरबस्तानचा किनारा आणि दुसऱ्या बाजूला आफ्रिका दिसते आहे. उन्हाळा इतका भासतो आहे कीं अंगावर कपडा धरवत नाहीं. फ्रेंच बाया झग्याच्या आंत घालावयाच्या रंगीबेरंगी, लेसच्या पातळ 'बॉडीसेस' घालून जवळजवळ अर्धनग्न अवस्थेत डेकवर फिरत आहेत.

* * *

## ता. ४ जुलै ते ९ जुलै—

*आबीसिनियाची जिबुती*

ता. ४ जुलै रोजीं दुपारीं जिबुती बंदराला आमची बोट लागणार.

१-३० ला जिबुतीला बोट लागली. भयंकर उकडतें आहे. उष्णतामान १०९° डिग्री आहे. आम्ही तिघेचौघे हिंदी आणि दोघेतिघे फ्रेंच लष्करी अंमलदार मिळून जिबुती पहायला बाहेर पडलों. किनारा बराच लांब होता. किनाऱ्याकडे नेणाऱ्या होडीवाल्याला प्रत्येकीं ३ फ्रँक्स द्यावे लागले. ॲबिसिनीयाची राजधानी आदीस अबाबा ते जिबुती अशी रेल्वे आहे. ॲबिसिनीयाला बंदर नव्हतें. फ्रेंच लोकांच्या या जिबुती बंदरांतूनच ॲबिसिनीयाला जगाशीं दळणवळण ठेवावें लागे. मुसोलिनीनें ॲबिसिनीया गिळण्यापूर्वी जिबुतीहून आदीस अबाबाला जावयाला आठवड्यांतून एक गाडी सुटे. आतां किती सुटतात कुणाला ठाऊक. जिबुती पाहून ॲबिसिनीयन साम्राज्यनाशाच्या शोकान्त इतिहासाचें वर्तुळ मी पुरें केलें म्हणायचें. जातांना ॲबिसिनीयन युद्धांत इटली जिथून सर्व लष्करी सामुग्री नेई तें इटलीचें मसावा बंदर मी पाहिलें; आतां येतांना रास ताफारी जिथून स्वतःला लागणारा माल घेई तें जिबुती बंदर मी पहात आहें. किनाऱ्यापासून शहरांत जावयाला डामरी रस्ता आहे. मात्र जिबुतीच्या रस्त्यांतून चालणें म्हणजे जळत्या निखाऱ्यांतून चालण्यासारखेंच आहे. अगदींच भिकार गांव आहे हें. रस्त्यांतून जातांना एक दोन गांधी टोपी घातलेलीं गुजराती माणसें आमच्या दृष्टीला पडलीं, तेव्हां आम्ही आश्चर्य-चकित झालों. नंतर आम्हाला कळलें, कीं जवळ जवळ २०० हिंदी लोक निरनिराळ्या धंद्याच्या निमित्तानें जिबुतींत आहेत. मुंबईच्या कुठ-ल्याही सामान्य श्रीमंत माणसाच्या बंगल्यापेक्षांही लहान असा पांढरा

चुना दिलेला एक जुनाट बंगला ही जिबुतींतली सर्वांत प्रेक्षणीय इमारत ! या इमारतींत जिबुतीचा फ्रेंच गव्हर्नर रहातो. हायले सेलासी बादशहाचे वडील बादशहा मेनेलिक यांच्या नांवाचा ‘ प्लास मेनेलिक् ’ म्हणून एक चौक आहे. या चौकांतल्या एका दुकानांत थंड बीर घेण्याकरतां म्हणून आम्ही शिरलों. मुंबईतल्या भेंडी बाजारांतलीं मुसलमान चहावाल्यांचीं दुकानें यापेक्षां किती तरी स्वच्छ असतात. टेबलावर माशांचे थवेच्या थवे घवघवत होते. रस्त्यांत धूळ किती तें विचारूं नका. आज रविवार असल्यामुळें कचेऱ्या बंद आहेत. गाडीवाले आणि टॅक्सीवाले यांचा संप चालू असल्यामुळें रस्त्यांत गाड्या दिसत नाहींत. फ्रँकचा भाव एकदम घसरून रुपयाला १० फ्रँक झाल्यामुळें त्यांनीं संप पुकारला म्हणे. सिगारेट्स आणि चित्रांचीं कार्डें घ्या, म्हणून सोमाली पोरें सारखीं आमच्या मागें मागें फिरत आहेत. जिबुतींत अमेरिका, इंग्लंड, बेल्जियम् या देशांचे कॉन्सल आहेत. उन्हाची झळ आणि ती धूळ असह्य होऊन आम्ही ४ वाजतांच बोटीवर परत आलों. बोटीनें रात्रीं १० ला जिबुती सोडलें.

ता. ५ जुलैला आम्ही एडनच्या आखातांत आलों आहोंत. बोट जोरानें हालत आहे.

ता. ६ जुलै रोजीं अरबी समुद्रांत आम्ही शिरलों आहोंत असें वाटतें. अस्मान गाठूं पहाणाऱ्या लाटा उसळत आहेत आणि बोट भयंकर हालते आहे. बहुतेक सर्व उतारू बेजार होऊन आपापल्या केबिनमध्यें पडून आहेत.

मी, आमचा बर्मी मित्र बो टिन् आणि थोडे फ्रेंच लष्करी इफीसर एवढेच काय ते पांचसात जण आज रात्रीं डिनर हॉलमध्यें आहोंत. मला बोट मुळींच लागत नाहीं. आमचा बो टिन् दांडगा गडी आहे. फ्रेंच बोटीवर जेवणाच्या वेळीं फुकट मिळणारी क्लॅरेट् दारू हवी तितकी पितो आणि बोटीवर नाचरंग मजा करतो. एक वात्रट फ्रेंच मुलगी आमच्या बोटीवर आहे. ती सर्वांशीं टिवल्या बावल्या करते. रात्रीं जेवणानंतर टिन्नें ग्रामोफोन लावून आपल्याबरोबर नाच म्हणून तिला विनंती केली. ‘नाहीं’ म्हणून ती दूर गेली. टिन् सरळ गेला, आणि तिच्या दंडाला धरून त्यानें तिला खेंचून आणली आणि नाचावयाला सुरुवात केली ! तो दांडगे-

श्वर आहे, पण स्वभावानें मोठा उमदा आहे. अमेरिकेंत आणि इंग्लं-डांत राहून हस्तकौशल्याचीं कामें शिकून तो रंगूनला घरीं जातो आहे. एका बड्या ब्रम्ही जमीनदाराचा मुलगा आहे तो. त्याचीं राजकीय मतें बेफाम आणि अराजक आहेत. बाप मेला, कीं आपली सर्व जमीन आपण कुळांना वाटून टाकणार, तो म्हणतो !

* * *

## ता. १० जुलै—

ॲम्स्टरडामहून बटेव्हियाला जाणारा मि. व्हॅन हेल्डेन नांवाचा एक तरुण डच गृहस्थ आमच्या बोटीवर आहे. उंच बांध्याचा आणि निळ्या डोळ्याचा, मोठ्या गोड स्वभावाचा माणूस आहे. त्याच्याबरोबर मी आज बोलत बसलों होतों. डच फॅसिस्ट पक्षाच्या सुरवातीच्या सभासदांपैकीं आपण एक आहोंत म्हणून त्यानें सांगितलें तेव्हां मला आश्चर्य वाटलें.हा एवढा चांगला माणूस फॅसिस्ट कसा ? डच फॅसिस्ट पक्षाची त्यानें मला खूप माहिती सांगितली. त्या पक्षाचे ७०,००० सभासद आहेत म्हणे. "ज्यू लोकांचा द्वेष वगैरे तुम्ही शिकवतां कीं नाहीं ?" मी विचारलें. "छे, छे, आमच्या डच् फॅसिस्ट पक्षांत ज्यूद्वेषाला जागा नाहीं." तो म्हणाला. भांडवलवाले आणि मजूर यांचें प्रेमळ ऐक्य कसें करतां येईल, हें तो मला समजावून सांगत होता, आणि तें सर्व भाविकपणें ऐकण्याचें मी ढोंग करीत होतों. मात्र मी एकदोन खोंचदार प्रश्न विचारले त्यांचीं उत्तरें त्याला देतां येईनात. मला तो एक मार्ग चुकलेला ध्येयवादी तरुण वाटला. त्याला इंग्लिश भाषा चांगली येत होती. बटेव्हियांत स्थायिक होण्याचा विचार असल्यामुळें मलाया भाषेचें पुस्तक चोपडी घेऊन अभ्यास करण्यांत तो बोटीवरल्या वेळेचा उपयोग करीत होता. त्याच्या बहिणीच्या नवऱ्याचा बटेव्हियाजवळ कुठल्या तरी गांवीं तंबाखूचा मळा आहे. तेथें ही स्वारी मुक्काम ठोकणार आहे.

उद्यां सकाळीं ६ वाजतां आमची बोट कोलंबो बंदराला लागणार. या सोळा दिवसांच्या बोटीच्या प्रवासानें मी अगदीं विटल्यासारखा झालों आहें, आणि केव्हां एकदां माझ्या प्रिय हिंदुस्थानचा किनारा माझ्या दृष्टीला पडेल, या उत्कंठेनें मी वेडावून गेलों आहे.

* * *

## ता. ११ जुलै–

*आम्ही आतां घरीं आलों आहोंत !*

पहांटेपासून कपडे करून मी तयार आहें. ६–३० ला आम्ही कोलंबो बंदरांत उतरणार.

कोलंबो शहर चिमुकलेंच पण छानदार आहे. इंग्लिश, फ्रेंच, जर्मन, डच, जपानी सर्व देशांच्या बोटी या बंदराला लागत असल्यामुळें या शहरांतल्या घरादारांवर, हॉटेलांवर युरोपियन सुधारणेची बरीच छाप पडलेली दिसते. एखाद्या लहानशा युरोपियन शहरासारखें कोलंबो वाटतें. हिंदुस्थानच्या नाहीं, तरी हिंदुस्थानला लागलेल्या लंकाद्वीपाच्या जमिनीवर पाऊल टाकतांना आम्हा सर्व हिंदी उतारूंना अवर्णनीय आनंद झाला आहे. सूट, नेकटाय, बूट काढून टाकून पायजमे आणि चपला घालून रस्त्यांतून फिरण्यांत आम्हाला मजा वाटते आहे. आम्ही घरीं आलों आहोंत ! उतरल्याबरोबर आम्ही सर्वजण एका दुकानांत गेलों, आणि हिंदुस्थानचें एकमेव वैशिष्ट्य ती पानपट्टी घेऊन चघळावयाला सुरुवात केली ! बो टिन् खुषींत आहे. त्यानें आपला राष्ट्रीय ब्रम्ही वेष परिधान केला आहे; खालीं रंगीत लुंगी, अंगावर काळ्या रेशमाचा लांडा कोट, आणि डोक्याला लाल रेशमी फडकें !

प्रिन्स ऑफ् वेल्स हॉटेलांत आम्हीं जेवलों; आणि नंतर एक टॅक्सी ठरवून कोलंबो शहर पहावयाला बाहेर पडलों. सिनॅमन् गार्डन्स ही मुंबईच्या राणीच्या बागेसारखी एक बाग आहे. ती पहिल्यांदा पाहिली. हिंदी, युरोपियन आणि सिलोनी श्रीमन्त लोकांचे बंगले या बाजूला आहेत. सिलोनला कांहीं युरोपियन छोटें इंग्लंड म्हणतात तें खोटें नाहीं. जिकडे तिकडे हिरवेंगार गवत आणि वृक्षाच्छादित रस्ते दिसतात. रस्त्यांचीं नांवें पाहूनही इंग्लंडची आठवण होते;— हाईडपार्क कॉर्नर, एडिंबरो क्रेसन्ट, वगैरे. म्यूझियममध्यें कँडीचा राजा श्रीविक्रमराजसिंह (१७९६–१८१५) याचें सिंहासन, मुकुट व इतर राजचिन्हें पाहिलीं. हीं विलायतेत होतीं. ती पांचव्या जॉर्ज बादशहांनीं १९३४ सालीं सिलोनला परत दिलीं.

१५ वर्षांपूर्वी सिंहली लोकांनीं बांधलेलें एक प्रचंड बुद्ध देवालय पहावयाला नंतर आम्ही गेलों. सवंग पांढरासा आणि नारिंगी रंग दिलेल्या या देवळांतल्या बुद्धाच्या प्रचंड मूर्ती मला विशेष आवडल्या नाहींत. अगदींच भडक आणि सवंग हा रंग दिसतो, आणि देवाला तो शोभत नाहीं. बुद्धधर्मीयांना मूर्तिपूजा मान्य नाहीं म्हणे. या बुद्धाच्या मूर्तीपुढें मात्र गुढगे टेकून नमस्कार घालणारे किती तरी सिंहली स्त्रीपुरुष भक्त मला दिसले.

माऊंट लेव्हिनियावर असलेलें ग्रँड हॉटेल पाहाण्यासारखें आहे. एका तुटक्या कड्यावर ही इमारत आहे, आणि समुद्राच्या लाटा खिडकी-खालीं असलेल्या खडकावर फेंसाळत असतात.

संध्याकाळीं बाजारांत कांहीं वस्तू लंकेच्या आठवणी म्हणून खरेदी केल्या. येथील काळेकुळकुळीत, भयंकर जबड्याचे, केसांच्या जटांत फण्या लावलेले जातिवंत सिहली लोक पाहिले, कीं ते रावणाचे वंशज असावेत याबद्दल मुळींच शंका वाटत नाहीं. स्वभावानें मात्र सिलोनी लोक अत्यंत चांगले वाटले; आणि बिभीषणाची आठवण झाली !

रात्रीं ८–१५ च्या गाडीनें तालियामानारला जावयास निघालों.

* * *

## ता. १२ जुलै

### *तो जवळ जवळ येत आहे तो माझाच हिंदुस्थान !*

सकाळीं ६ ला तालियामानारला पोहोंचलों. रेल्वेच्या धक्क्याला लागूनच बोट उभी आहे. तालियामानार आणि धनुष्कोडी यांमधलें अंतर इंग्लिश खाडीसारखेंच बरोबर २६ मैल आहे. धनुष्कोडीला बोट लागणार, आणि बोटीच्या धक्क्याच्या दुसऱ्या बाजूला आगगाडी उभी असणार. मला अगदीं बरोबर कॅले-डोव्हर किंवा बुलॉं-फोक्सटनची आठवण झाली. पण कुठें धुक्यानें आणि गारठून टाकणाऱ्या वादळी वाऱ्यानें बेफाम झालेली इंग्लिश खाडी, आणि कुठें एखाद्या सरोवरा-प्रमाणें सकाळच्या कोंवळ्या प्रकाशांत शांत प्रशांत दिसणारा आमचा हा हिंदी समुद्र !

बोट चालूं लागली. क्षणाक्षणाला मी माझ्या प्रिय हिंदुस्थानच्या जवळ जात आहे. या शांत वेळीं बोटीच्या डेकवर उभा असतां नाना विचार माझ्या डोक्यांत उसळत आहेत. आतां हिंदुस्थानच्या प्रिय भूमीवर मी पाऊल टाकणार म्हणून माझें अंतःकरण भरून आलें आहे. तरी मी अवघा ३ महिने या देशापासून दूर होतों. तीस तीस वर्षें दूरदेशांत काढणाऱ्या निर्वासित देश-भक्तांना काय वाटत असेल बरें ? पूर्वी माझ्या डोक्यांत असलेल्या एक दोन कल्पनांना या प्रवासानें चांगलाच धक्का बसला. मला वाटे देश म्हणजे काय—आपण जमिनीवर थोडेंच प्रेम करतों ? आपणाला प्रिय असलेलीं, आपल्या ओळखीचीं, आपल्यासारखींच अनेक माणसें इथें आजूबाजूला आहेत म्हणून हा देश आपणाला आवडतो. हींच माणसें दुसऱ्या कुठल्याही भूभागावर असलीं, तर तो भूभागही आपणाला आवडेल. पण तसें नाहीं याची मला आतां खात्री वाटते. समोर दिसणाऱ्या धनुष्कोडीच्या किनाऱ्यावर माझें कोण आहे ? पण कुठल्याही सोज्वळ, सुंदर, थंडगार युरोपियन शहरांत पाऊल ठेवतांना मला कधींच झाला नाहीं इतका अनन्यसाधारण आनंद या अनोळखी पण केवळ हिंदुस्थान देशाच्या म्हणून राकट, धुळकट भूमीला मी थोड्याच वेळानें स्पर्श करणार या विचारानें मला झाला आहे. छे, छे, देश म्हणजे नुसतीं आपलीं माणसें नव्हे. देश म्हणजे ती विशिष्ट भूमी, तीं झाडें, तीं फुलें, तें वातावरण आणि तीं माणसें. झाडें आपला जीवनरस ज्याप्रमाणें जमिनींतून शोषून घेतात, तसाच आम्ही माणसें देश या शब्दांत सामावलेल्या या सर्व गोष्टींतून आमचा जीवनरस शोषून घेतों, आणि आम्ही जे आहोंत ते 'आम्ही' होतों ! या देशांतून उचलून आम्हाला दुसऱ्या देशांत टाकलें तर उपटून दुसरीकडे लावलेल्या झाडा-प्रमाणें आमची स्थिती होईल. शारीरिक, मानसिक, आध्यात्मिक दृष्टया आम्ही सुकून जाऊं; आणि म्हणूनच समोर दिसणारा तो धनुष्कोडीचा किनारा, आणि त्यावर शांतपणें डुलणारीं तीं माडाचीं झाडें पाहून माझें अंतःकरण क्षणाक्षणाला थरारून येतें आणि त्यांत शब्द घुमतात, कीं जवळ जवळ येतो आहे तो माझाच हिंदुस्थान.

———

## लॉट नं. १ [रु. २०]

| | | | |
|---|---|---|---|
| १ जवाहरलाल नेहरु | ५ | १ आधुनिक भारत | ४ |
| १ म. गांधींची आत्मकथा | २ | १ कॉंग्रेसचा इतिहास | २ |
| १ माझे आवडते लेखक | १ | १ उजळल्या दिशा | २॥ |
| १ काम आणि कामिनी | २॥ | १ साम्राज्य व स्वराज्य | १ |

## नं. २ [रु. १५]

| | | | |
|---|---|---|---|
| १ म. गांधींची आत्मकथा | २ | १ उजळल्या दिशा | २॥ |
| १ मार्ग कुठें आहे ? | १॥ | १ काम आणि कामिनी | २॥ |
| १ पूजन | १॥ | १ करवीराच्या कळ्या | १। |
| १ चौपाटीवर | १। | १ मावळता चन्द्र | १। |

१ झामळ वनांत १।

## नं. ३ [रु. १०]

| | | | |
|---|---|---|---|
| १ महात्मा की मोहात्मा | २॥ | १ मार्ग कुठें आहे ? | १॥ |
| १ पिशाच प्रेम | १। | १ झामळवनात | १। |
| १ चौपाटीवर | १। | १ प्रवाह पतित | १। |

१ चोरटे हल्ले १

## नं. ४ [रु. ५]

| | | | |
|---|---|---|---|
| १ उमज पडेल तर | १॥ | १ लोला व इतर गोष्टी | १॥ |

१ झाशीची राणी २

## नं. ५ [रु. ५]

| | | | |
|---|---|---|---|
| १ भडकल्या ज्वाला | १॥ | १ विवाहानंतर | १॥ |
| १ साम्राज्य व स्वराज्य | १ | १ चोरटे हल्ले | १ |

---

## सागर साहित्य प्रकाशन ११

# उंबराचीं फुलें

कथासंग्रह

लेखक : ह. वि. देसाई, संपादक उषा.

सोल एजंट:— महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४.

पोर्तुगीज कथावाङ्‌मयांतील प्रवाहांची महाराष्ट्रास ओळख करून देणारा पहिला अधिकृत कथासंग्रह

# पोर्तुगालच्या पऱ्या !

भाषांतर

"कारंजाचे तुषार"

कर्ते

व्यं. अ. पै रायकर

ह्या संग्रहांत निवडक पोर्तुगीज ललित लेखकांच्या उत्कृष्ट भाषांतरीत कथा एकत्रित केल्या आहेत.

प्रकाशक : बा. द. सातोस्कर,
सागर साहित्य, मुंबई ४.

# महाराष्ट्र ग्रंथ भांडार

गिरगांव, मुंबई ४



## प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें.

| | | रु. आ. पै |
|---|---|---|
| १ | आजचें स्वराज्य– ले. वा. वा. जोशी, B. A. B. T. (१९३५ च्या कायद्याची समग्र माहिती असलेलें व सामान्य माणसांना विशेषतः कॉंग्रेस कार्यकर्त्यांना अत्यंत उपयुक्त) | ०–६–० |
| २ | काम आणि कामिनी– ले. कु. प्रेमा कंटक (गांधी तत्त्वज्ञानाचा पुरस्कार करणारी एकमेव कादंबरी.) | २–८–० |
| ३ | जीवन–प्रकाशन–मोठयांच्या छोट्या गोष्टी. ले. साने गुरुजी | ०–३–० |
| ४ | सीतास्वयंवर– ले. प्रो. द. सी. पंगू, M. A. | २–८–० |
| ५ | पूजन— ले. वि. स. खांडेकर | १–८–० |
| ६ | करवीराच्या कळ्या (कथासंग्रह) | १–४–० |
| ७ | सांजवात ,, | ०-१०-० |
| ८ | हिंदूंचा आजचा कायदा— ले. र. दि. कुलकर्णी | ०–८–० |
| ९ | मावळता चन्द्र (सामाजिक कादंबरी) ले. बा. भ. बोरकर | १–४–० |
| १० | पुष्पपराग (लघुकथा संग्रह) ले. कु. कुमुदिनी प्रभावळकर | १–४–० |
| ११ | चौपाटीवर (कथा व प्रबंध) ले. डॉ. श्री. वाळिंबे | १–४–० |
| १२ | बेसूर संगीत (सामाजिक कादंबरी) ले.– कु. कुमुदिनी शंकर प्रभावळकर | १–४–० |
| १३ | भडकत्या ज्वाला अर्थात् आगामी महायुद्ध लेखक श्रीकृष्ण रामचन्द्र पोतनीस, एम्. ए. एल्एल्. बी. | १–८–० |
| १४ | साम्राज्य व स्वराज्य– ले. दा. न. शिखरे, एम्. ए. साम्राज्य व स्वराज्य यांतील फरक, ब्रिटिशांचें धोरण या विषयांवर उपयुक्त. | १–०–० |
| १५ | महात्मा कीं मोहात्मा – अनु. वि. वि. दीक्षित, एम्. ए. (अनातोले फ्रान्स यांच्या 'तइस' या अनेक विद्वानांनीं | |

व टाइम्स सारख्या वर्तमानपत्रांनीं प्रशंसिलेल्य फ्रेंच कादंबरीचें भाषांतर ) २-८-०

१६ विवाहानंतर – (सा. कादंबरी) ले. प. स. देसाई १-८-०

१७ उमज पडेल तर– (सा. कादंबरी) ले. ना. ह. आपटे १-८-०

१८ बाभळवनात –( विनोदी लेखसंग्रह ) ले. शामराव ओक १-४-०

१९ पिशाच्च प्रेम– (स्वतंत्र कादंबरी) ले. प. स. देसाई १-४-०

२० उजळत्या दिशा– (सा. का.) ले. वि. द. साळगांवकर २-८-०

२१ प्रवाह पतित– (सा. कादंबरी) ले. गो. कृ. पानसे १-४-०

२२ बाल सुहृद– (विद्यार्थ्यांसाठीं निबंध) ले. गो. रा. चोळकर ०-१२-०

२३ नव्या पतिव्रता– (सा. का.) ले. कै० गणेशशास्त्री फाटक १-८-०

२४ माझे आवडते– लेखक ग. त्र्यं माडखोलकर १ ० ०

२५ चोरटे हल्ले– (विनोदी लघुकथासंग्रह) ले. अनंत अंतरकर १ ० ०

२६ काळे ढग– (सा. का.) ले. प्रो. वि. बा. आंबेकर २ ८ ०

२७ मार्ग कुठें आहे ?– (सा. का.) ले. वि. वा. हडप १ ८ ०

२८ रबरी फुगे– (लहान मुलांच्या गोष्टी) ले. रा. वा. शेवडे ० ३ ६

२९ झाशीची राणी आणि सत्तावन सालच्या बंडाचें ऐतिहासिक कार्य– ले. वि. वा. हडप, प्र. द. वा. पोतदार, बी. ए. २ ० ०

३० धुक्यांतून लाल ताऱ्याकडे– ले. अनंत काणेकर २ ४ ०



